# म रा ठ्यां च्या
# राज्य-कथा


लेखक

गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए.,

रियासतकार



प्रथमावृत्ति : १९४१

केशव भिकाजी ढवळे, श्रीसमर्थ-सदन, गिरगांव, मुंबई.

मूल्य एक रुपया

# निवेदन

इतिहास चित्ताकर्षक व स्फूर्तिदायक करावा अशी पुष्कळांची सूचना असून माझ्याही मनात हा विचार आज कैक वर्षे घोळत आहे. सवडीनुसार मराठ्याच्या इतिहासांतील कित्येक प्रसंग निवडून मी त्यांची कथानकें लिहून काढिली; आणि प्रकाशक श्री. ढवळे यानी वारंवार कळकळ व्यक्त केली म्हणूनच एकवीस गोष्टींचा हा संच तयार होऊन वाचकांपुढे ठेवण्याची मला संधि मिळाली.

लघुकथा, कादंबरी इत्यादींचे अलीकडे एक तंत्र बनलें आहे तें मला अवगत नाही. मी आपल्या मनाने संवाद, भाषणे, स्वगत विचार, जिथे जसे योग्य वाटले तसे दाखल करून एकवीस गोष्टींत दोनशें वर्षांचा संकलित इतिहास सांगितला आहे. त्यातही कित्येक अपरिचित प्रसंग मी मुद्दाम निवडले आहेत. प्रमुख व्यक्तींची चरित्रे व स्वभावभेद तसेच त्यांचे पराक्रम अनुषंगाने मनात सहज ठसावे असा माझा प्रयत्न आहे. कित्येक तत्कालीन पत्राचे व लेखांचे उतारेही परिचयासाठी दाखल केले आहेत. ही माझी अल्प सेवा वाचकांनीं गोड मानून घ्यावी अशी प्रार्थना आहे.

गो. स. सरदेसाई

कामशेत, ता. १५ नोव्हेंबर, १९४१

# अनुक्रमणिका

# १

# मातेचा उमाळा



**यतः शिवगिरेर्मूर्ध्नि जातः स पुरुषोत्तमः**
**ततः प्रसिद्धा लोकेऽस्य शिवइत्यभिधाऽभवत् ॥** §

जुन्नरजवळच्या शिवनेरी किल्ल्यावर शिवाई देवीचें एक लहानसें जीर्ण मंदिर होते. सोमवारचा दिवस आणि त्यांतून शिवरात्र. पहांटेच स्नान आटपून पूजासाहित्य हाती घेऊन जिजाबाई देवीच्या दर्शनास गेली. भक्तिभावाने पूजा आटपून प्रेमानें तिने प्रार्थना केली. किती तरी वेळ ती देहभान विसरून देवीच्या चरणी लीन झाली. अशा ध्यानस्थ स्थितीत तिच्या मनांत खालील विचार उत्पन्न झाले.

"आई भगवती, अजून कशी ग तुला माझी करुणा येत नाहीं! इतके दिवस यातना सोसल्या त्या पुरे नाहींत का तुला वाटत! काय ही माझी हीन स्थिति! चौदा चौकड्यांचें राज्य करणाऱ्या त्या थोर यादवांच्या कुळांतली मी आणि आज माझी ही अन्नान्न दशा. प्रसूतिकाळ समीप आला असतां साधी जागेची सोय सुद्धां मला मिळूं नये, मग नोकर-चाकर किंवा पथ्यपाणी तर बाजूलाच राहिले. माझा ग्रहयोग तरी कसा खडतर, की लग्न देखील प्रेमानें घडून येऊं नये. वडिलांनीं रंगपंचमीस दरबार भरविला. इतरांबरोबर आम्ही दोघे गुलाल खेळलों. दोघेंही नेणती पांच चार वर्षांचीं. सहजगत्या वडिलांच्या तोंडून शब्द गेले, 'काय हा

§ शिवगिरीच्या माथ्यावर त्या थोर पुरुषाचा जन्म झाला, म्हणून त्याचें शिव हें नाव प्रसिद्ध झाले.

जोडा चांगला शोभतो.' मामंजींचा स्वभाव पडला करारी. त्यांनी ते थट्टेतले शब्द खरे करून दाखविले. आमचें हे लग्न म्हणजे केवळ जुलमाचा रामराम. त्या वेळेपासून यवनांशीं राजांचा सारखा संग्राम चालू आहे. रानावनांत भटकण्याची पाळी. सासरे जावयांचें एक दिवस कधी सूत जमलें नाही. शेवटीं उभयतांचे उघड युद्धच जुंपले. तिकडे आड तर इकडे विहीर अशी माझी तिरपीट सुरू झाली. पण आम्हा हिंदी पतिव्रतांना पतिशिवाय दुसरी गति कोणती असणार! त्यांच्या पाठीस यवनांच्या फौजा लागल्या. वडील तर अगोदरच त्या यवनांस मिळालेले. जीव बचावण्यासाठीं पतिराज आश्रयार्थ पळत चालले. सात महिने मला गेलेले. मी कशी त्यांजबरोबर घोड्यावर बसून टिकणार! ते तरी काय कारितात, गेले सडकून पुढें मला तशीच मागें टाकून. बाळ संभाजी मात्र चालला खुशाल त्यांजबरोबर. मी रस्त्यांतच मटकन घालून बसले असतां मागून वडील आले, मला म्हणाले, 'जिजाऊ, चल तूं आमचे वाड्यांत सिंदखेडास'. पण मला तें मान्य करवेना. मी त्यांना साफ सांगितले, 'पतींना सोडून वडिलांचा आश्रय मला नको. हा पहा जवळ शिवनेरी डोंगर आमच्या सत्तेचा आहे. तेथें मला पोंचवा म्हणजे झालें.' आई देवी, तूंच आतां इथें माझी कशी ती वाट लाव."

भोसल्यांचे कुलोपाध्ये ब्रह्मे चाकणास राहत असत. मुरारभट मोठा विद्वान बहुश्रुत पंडित होता. शिवनेरीवर येते वेळींच जिजाबाईनें त्यास निरोप पाठविला, मी येथें जंगलांत एकटी निराधार पडलें असून तुम्ही थोडी सवड काढून भेट द्याल आणि चार उपदेशपर शब्द बोलून माझ्या मनास विसावा आणाल, तर या संकटसमयीं आपले मोठे उपकार मानीन. विपन्न स्थितींत असलेल्या यजमानीणबाईचें असें बोलावणें पोंचल्यावर मुरारिबावा चाकणहून निघाले. जुन्नरास रात्रीं वस्तीस राहून सकाळींच शिवरात्रीची स्नानसंध्या आटपून गडावर येतात तों दरवाजापाशींच कळलें, कीं बाई देवीच्या पूजेस आल्या आहेत.

म्हणून ते तसेच मंदिरांत गेले. तेथे वंदन व कुशल प्रश्न चालत असतां उभयतांचा संवाद झाला तो असा—

**जिजाबाई**—आज अशा ठिकाणीं मला आपला दर्शनलाभ घडला येणेंकरून मनाला केवढा आल्हाद होतो आहे म्हणून सांगूं.

**मुरारिबावा**—बाईसाहेब, आम्ही भोसल्यांचे पिढीजाद अश्रित, आपलें अभीष्ट चिंतन करावें हा आमचा उपाध्यांचा धर्म. आपला निरोप पोंचतांच दर्शनास निघालों. भेट झाली याचा आनंद वाटतो. आपल्या या वनवासाचीं वर्तमानें ऐकून अंतःकरण विदीर्ण होतें ते काय सांगावें ! या यातनांतून ही शिवाई देवीच आपणांस सद्गतीचा मार्ग दाखवील. विपत्ति हीच भावी उदयाची जननी होय यांत तिळमात्र संशय नाही.

**जि०**—बावा, काय सांगू, मागच्या आठवणी मनांत उभ्या राहून केवढा कल्लोळ उठतो तो. एवढें देवगिरीचें राज्य, एवढें विजयनगरचें राज्य आणि ती प्रचंड मंदिरे, या दुष्ट यवनांनीं क्षणमात्रांत धुळीस मिळविलेलीं पाहून अंतःकरणांत कशी कालवाकालव उठते. आम्ही जाधव भोसले सर्व त्या थोर पूर्वजांचेच वंशज ना ! मग तो पूर्वीचा त्यांचा पराक्रम एकाएकीं कसा हो सर्व लोपून गेला ? ह्या आमच्या देशाचें नांव महाराष्ट्र, पण ते राष्ट्र आज किती हीन बनलें आहे पहा. सिंघण, कृष्णदेव, महादेव, रामदेव हे यादव राजे कसे नामांकित झाले आणि त्यांच्याच कुलांत मी ही अभागी जन्मास आलें. त्यांनी महाराष्ट्र भाषेला केवढें वैभव आणिले, त्याची साक्ष ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ देत आहेत. भास्कराचार्य या महाराष्ट्राचा केवढा बहुमोल अलंकार ! जाधवांचे ते थोर विद्वान कारभारी हेमाद्रि पंडित. त्यांचे नांवाचा महिमा अद्यापि सर्वत्र दुमदुमतो आहे. याच महाराष्ट्रांत पूर्वी शालिवाहन, चालुक्य, राष्ट्रकूट, शिलाहार, कदंब अशा क्षत्रिय वंशांनी आपलीं नांवे अजरामर करून ठेविलीं. महाराजाधिराज, सम्राट्, श्रीपृथ्वीवल्लभ, प्रतापचक्रवर्ती, समस्तभुवनाश्रय अशीं दिव्य व सार्थ

बिरुदें ज्यांनीं धारण केली, त्यांची आज अशी दैना कां व्हावी? ठिकठिकाणीं डोंगरांतील प्रचंड खडकांत खोदलेलीं त्यांचीं तीं भव्य लेणीं पाहिली म्हणजे केवढी अजब कामगिरी मनांत येते. यादवांचा सुवर्ण गरुडध्वज ज्या देवगिरीच्या उच्च शिखरावर शेकडों वर्षें फडकला, त्या देवगिरीची आतां यवनांनी आपली दौलताबाद बनविली आहे.

देवी माते, तुला आतां आमची करुणा कधीं येणार? कां तूं आमच्यावर अशी रुष्ट झालीस! यांतून नाहीं का तूं आम्हांस कांहीं तरी सुटकेचा मार्ग दाखविणार! फुकट आम्ही आपणास क्षत्रिय म्हणवून घेतों.

**मु०**—बाईसाहेब, आपण असा उद्वेग करूं नका. मला खात्री आहे, या देवीच्या प्रसादानें आपल्या महाराष्ट्राच्या उदयाचा मार्ग अगदीं समीप येत चालला आहे; आणि तो आपल्याच या कष्टमय जीवनांतून निघणार आहे. आज्ञा असेल तर कालच्याच रात्रीं मला एक साक्षात्कार झाला तो आपणांस सांगतों.

**जि०**—आज्ञा कसची मागतां! आपल्यासारख्या तपस्वी जनांच्या भावना पुढील उदयाचीं चिन्हेंच होत. सांगा काय साक्षात्कार झाला तो.

**मु०**—रोजच्याप्रमाणें पठण व चिंतन करून रात्री जुन्नर येथें एका स्नेह्याचे घरीं झोपीं गेलों. आपल्या भेटीची उत्कंठा व मनांत विचार सारखे आपल्या या गर्भारपणांतील यातनांचे. भक्तांची करुण वाणी ऐकून परमेश्वर कसा धावून येतो आणि पूर्वी जनता गांजून गेली असतां भगवंतांनीं अनेक अवतार धारण करून दुष्टांचा संहार कसा केला, त्या कथा मनांत घोळत होत्या. पहांटेच्या प्रहरी एक दिव्य स्वप्न पाहिलें, ब्रह्मादि देव विष्णूला सांगतात, "देवा, हे सुरशत्रु यवन पीडा देऊं लागल्यामुळें ही भरतभूमि अत्यंत दुःखी झाली आहे. तर आपण या म्लेच्छांचा संहार करून लोकांचें कल्याण करा." अशी प्रार्थना करून ब्रह्मदेवांनीं भगवंतांना सूचना केली कीं, "दिलीप राजाला जशी सुदक्षिणा

तशी ही जिजाऊ साध्वी शहाजी राजांची वीरपत्नी आहे, तिच्या उदरीं तुम्ही मनुष्यजन्म घेऊन म्लेच्छाचा नाश व वर्णधर्माची स्थापना करावी.‡" भगवंतांनी ही विनंती मान्य केल्याचें उत्तर ऐकून मी आनंदांत जागा झालों. केव्हां एकदां आपणास भेटून हें स्वप्न निवेदन करीन असें मला होऊन गेलें.

**जि०**—भगवंतांची आपल्यावर कृपा असेल तर काय नाहीं घडणार? आपले हे स्वप्न म्हणजे मी आपला शुभाशीर्वादच समजते. पतींनीं आतां दुसरा विवाह करून मला सोडलेच आहे. अशा स्थितीत हे भगवति शिवाई, मला एक सुपुत्र देऊन माझे मनोरथ सिद्धीस पोंचव.

असें बोलून जिजाबाईनें देवीला सद्गदित अंतःकरणानें वंदन केले, तोंच देवीवरचीं फुले तिच्या मस्तकावर पडून तिला समाधान वाटलें.

शिवरात्रीचा सबंध दिवस जिजाबाई व मुरारीबावा यांनी निराहार उपोषण करून ईशचिंतनांत घालविला. पारणें सोडून बावा आपल्या गांवीं गेले. यथाकाल जिजाबाईला पुत्र झाला. देवीचेंच नांव मुलास देण्यांत आलें. पुत्रसंवर्धनाच्या उद्योगांत जिजाबाई आपलीं दुःखें पार विसरून गेली. एकदां शहाजी राजांनी येऊन पुत्रमुखावलोकन मात्र केलें, तदुत्तर आठ दहा वर्षें पावेतों युद्धाच्या धामधुमीमुळें बाल-शिवाजीला पित्याचा सहवास घडलाच नाहीं. पहिलीं पांच वर्षें तर अति संकटांत गेलीं. मोगलांनी त्यांस धरण्याची शिकस्त चालविली.

---

‡ देव देवरिपवो वसुंधरां पीडयन्ति यवना भृशातुरं।
तत्कुरुष्व जगतीसमीहतं म्लेच्छवर्गमधुना शृणीहि तं।
साध्वी जिजूर्नाम सुलक्षणास्ते पत्नी दिलीपस्य सुदक्षिणेव।
त्वं शाहपृथ्वीपतिवीरपत्न्यामस्यां समासाद्य मनुष्यजन्म
म्लेच्छापहत्या सुखमारचय्य भूमेः पुनःस्थापय वर्णधर्मान्॥

राजव्यवहारकोशाच्या उपोद्घातांत हे श्लोक आहेत, त्यांचाच आशय वरील वर्णनांत आहे. शिवचरित्रप्रदीप, पृ. १४०.

एकदां तर त्यांनीं जिजाबाईस पकडिले, पण त्या धूर्त बाईनें व्यवधान ठेवून अगोदरच एका दासीबरोबर बालशिवाजीस अज्ञातवासांत दूर पाठवून दिलें, म्हणून तो निभावला. जिजाबाईच्या चुलत्यानें दोन लाख दंड भरून तिची कैदेंतून सुटका केली.

इतक्यांत दुसरेंच एक संकट उभे राहिलें. शहाजीराजे आज आठ वर्षें शहाजहान बादशहाशी शिकस्तीनें लढत होते, पण बादशहाच्या प्रचंड फौजेपुढें त्यांचा निभाव लागेना. अगदीं जिवावर येऊन बेतली. एक तर बादशहा त्यांस पकडून बांधून घेऊन जाणार, किंवा आपणच कोठें तरी काळे करून गेलें पाहिजे. विचार करण्यास देखील फुरसत नाहीं. जिजाबाई चिंतेंत असतां तिचा वडील पुत्र संभाजी एकदम घाबऱ्या घाबऱ्या तिच्या भेटीस आला आणि म्हणतो,—

**सं०**—मासाहेब, राजांनी आपणास निकडीचा निरोप पाठविला आहे.

**जि०**—काय आहे त्यांची आज्ञा ?

**सं०**—त्यांजवर कठिण प्रसंग गुदरला आहे. बादशहा त्यांस आतां या मायभूमींत क्षणभर राहूं देत नाहींत.

**जि०**—मग पुढील विचार काय ठरविला ?

**सं०**—विचार कसचा ! तुम्हीं चिरंजीव आबास घेऊन पुण्यांत राहवें, ही जागीर सांभाळावी. वडील व मी विजापुरच्या शहाकडे नोकरी मिळवून गुजराण करूं.

**जि०**—मिळून इतक्या वर्षांचे कष्ट व्यर्थ जाऊन पुनः मुसलमान सेवेची शृंखला पायांत कायम आहेच.

**सं०**—त्यास आतां इलाज काय ! यांतूनच पुढील मार्ग काढला पाहिजे. मी वडिलांजवळ आणि आबा तुमचेजवळ ही वांटणी कांहीं वाईट नाहीं.

**जि०**—बरें आहे. तुमच्या त्यांच्या विचारास आले तें मला मान्य केलेच पाहिजे. आमचें तुम्हांस सांगणें एकच कीं स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा यांची चिंता मनांत अहर्निश बाळगीत जा. माझा आशीर्वाद तुमचे मस्तकीं आहे. साहेबांचे चरण आपणा सर्वांना कोठेंही तारतील. त्यांना म्हणावे लोभ निरंतर असों द्यावा.

हा बेत शके १५५८ च्या दसऱ्यास अंमलांत आला. शहाजी राजे विजापुरास गेले. जिजाबाई व शिवाजी पुणे शिवापुरकडे राहूं लागली. शिवाजीचे संगोपन हेच त्यांचे मुख्य कर्तव्य बनलें.

शिवाजीची बालपणची दहा वर्षें रानावनांत भटकण्यांत गेली. समवयी सोबती जमवून ऊन, पाऊस, भूक, तहान सहन करीत हिंडण्याची त्यास मोठी हौस वाटे. जुन्नरपासून सातारापावेतोंच्या प्रदेशांत अशी एक नदी, दरी, डोंगर, किंवा किल्ला नसेल की ज्याला त्याचा पादस्पर्श झाला नाही. झाडे, श्वापदें, झोंपड्या, नद्या नाले यांचीच त्याला मुख्य संगत. एकदां बाहेर गेला म्हणजे कोठें आहे, काय करितो, केव्हां येईल अशी चिंता मातुश्रीस सदैव लागलेली असायची. आपण काय पाहिले, काय केले, काय योजलें हें पाहून आल्यावर आईला सर्व सांगितले की त्याला कृतकृत्य वाटे. आईशिवाय दुसरें दैवत त्याला नव्हते. तिलाही हा पुत्र म्हणजे सर्व जीवनाचा आधार व मुख्य प्राणविसांवा वाटे. पशुपक्ष्यांच्या संगतींत राहिल्यामुळें त्याला त्यांचे आवाज हुबेहूब काढण्याची कला साधली. सोंग व बतावणी हें तर प्रसंगांतून निभावण्याचें त्याचें मुख्य साधन बनलें. बहुवेष, बहुभाषा, बहुआचार यांची चटक त्याला या परिस्थितीनें लावली. निसर्गाच्या अफाट व स्वतंत्र परिवारांत त्याची वृत्ति दुर्दम्य व निरंकुश बनली. अंगांत स्वातंत्र्याचे वारें संचारलें.

सुदैवानें दादाजी कोंडदेवासारखा सुज्ञ मार्गदर्शक त्याला लाभला. शहाजी राजांनीं कर्नाटकांत जातांना जिजाबाई व बालशिवाजी यांची

व्यवस्था दादाजीकडे सोंपविली. परिस्थिति, राजकारण, व्यवहार यांचें ज्ञान त्या काळास अनुरूप असें दादाजीने या होतकरू धन्यास करून दिलें. त्यानें पुण्यास वाडा बांधून त्यांच्या राहण्याची सोय केली. दादाजी व जिजाबाई यांनीं रामायण महाभारतांतल्या किंवा पूर्वजांच्या गोष्टी सांगून शिवाजीचे मनांत धर्मप्रेम उत्पन्न केलें. साधुवर्य तुकारामबावांची प्रेमळ कीर्तनें ऐकण्याचा त्यास नाद लागला. मावळांतील लोकस्थिति पाहून त्याच्या मनांत स्वराज्याचे अंकुर उगवूं लागले. ही स्फूर्ति उत्पन्न होण्यास काय कारणें घडलीं ते पुढील गोष्टींत कळून येईल.

## २

# स्फूर्तीचा उगम



**" तुर्कांनीं हिंदु धर्माचा उच्छेद करून म्लेंछमय करावें या दुर्वृत्तीस शहाजीराजे प्रवर्तक झाले, तें देवास न साहे ! " †**

शिवाजीमहाराजांनी स्वराज्यस्थापनेचें प्रचंड कार्य अंगावर घेतले, त्याची मूळ कल्पना मनांत येण्यास काय कारणें झाली, त्यांची संगति खालील संवादांत दाखविली आहे. हा संवाद जिजाबाई, दादाजी कोंडदेव इत्यादिकांशी झालेला काल्पनिक असला, तरी त्यांतील मतलब तत्कालीन आधारांवरून वर्णिला आहे हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. पुणे येथें शिवाजीमहाराजांचा लालमहाल नांवाचा वाडा होता, त्या ठिकाणीं स. १६४० त एके दिवशी तिसरे प्रहरीं त्यांचें बोलणे झालें तें असे—

**शिवाजी**—मासाहेब, खरें सांगा, आज तुम्ही अशा दुःखी कां ? सकाळपासून पाहतों तों तुमचे डोळे सारखे भरलेले व चेहरा अगदी कष्टी दिसतो. नेहमी तुम्ही प्रसन्नवदन, हसतमुख असतां, पण आज एकाएकी असे काय कारण झालें की आपली मुद्रा अशी खिन्न व्हावी ? कांहीं भलतीसलती बातमी तर नाही तुमच्या कानांवर आली ? कालच बाळकृष्णपंत बंगलोरहून येऊन तुम्हांस भेटले. त्यांच्या तोंडून वडिलांची खुशाली ऐकून मलाही आनंद वाटला. मग रात्रीं तुमचें त्यांचें पुष्कळ वेळ बोलणे चाललें. मी लगेच निजून गेलों. सकाळीं उठून पाहतों, तों

† नाना फडणिसांनी सवाई माधवरावांकरिता बनविलेल्या बखरींतील हे वाक्य आहे.

तुमची चर्या साफ पालटलेली. तुम्ही एकट्या दुःख करीत बसलेल्या. मला धीर देखील होईना जवळ येऊन विचारपूस करायला. बोला की असे काय संकट उपस्थित झाले आहे ? मी अद्यापि लहान बाळ आहें असे तुम्हांस वाटते, पण मी कांहीं असा संकटास भिणारा नाही. आपली आज्ञा होईल तर मी प्रत्यक्ष वाघाच्या दरीत सुद्धां शिरेन. तुम्हीच लहानपणापासून मला धीर देत आलां ना ? मग सांगा काय झालें आहे तें.

**जिजाबाई**—बाळ, काय सांगू तुम्हांला ! तुमचे हे गोड धीराचे शब्द ऐकूनच माझे मन हलकं होते पण मला जे दुःख होत आहे तें कोणाच्याही हातून दूर होण्याजोगे नाही. त्यांतून तुम्ही लहान आहां. माझ्या दुःखाचें कारण देखील तुम्हांस या वयांत कळण्यासारखे नाही. बाकी बाळकृष्णपंतांनी तिकडचा समाचार कळविल्यापासूनच मला अत्यंत बेचैन वाटू लागले आहे हे मात्र खरें. एका अर्थानें तुमचा तर्क कांहीं अगदी खोटा नाहीं.

**शिवाजी**—म्हणजे बाबांनी आणखी कांहीं एखादा तुमचा अपमान केला कीं काय ? वडील म्हणून मी त्यांच्या सदैव पाया पडेन, पण मातुश्रींना त्यांनी उगाच दुखविले तर तें नाहीं मला खपणार !

**जिजाबाई**—शिवबा, पतींनी बायकोचा अपमान केला, तर त्यांत कांही मोठेंसे नाही. आमचा धर्मच आहे कीं अपमान सोसूनही पतींना संतुष्ट ठेवावें. माझ्या अपमानाची मला मुळींच क्षिति वाटत नाही. दहा वर्षें झालीं, मी त्यांच्या समागमास मुकल्येच आहे ना ? त्यांनी माझा त्याग केला, दुसरी सवत घरांत आणून नवीन संसार थाटला, त्यांतही मला खंत वाटत नाहीं. त्यांनी आपल्या सुखाचा मार्ग पाहिला, मला त्याचा हेवा नाहीं. देवानें मला तुमच्यासारखा सुपुत्र दिला यांतच माझा संतोष आहे. वीरपत्नी तर मी आहेंच आहें, शिवाय तुमच्याकडून वीरसू म्हणवून घेण्याची आकांक्षा मी ठेवीत आहें. देवाच्या दयेनें तीही

पूर्ण होईल. पण माझा दुःखावेग कांही निराळ्याच कारणानें उत्पन्न झाला आहे.

**शिवाजी**—असें कोणते दुसरे कारण ? पंतांना मी विचारले, पण तेही मला धड कांहीं सांगेनात. त्यांनीं वडिलांची खुशाली कळविली, मला समाधान वाटले. बंगलोरची जागीर शहांनी त्यांस देऊन त्यांचा गौरव केला, हेंही त्यांच्या पराक्रमाचें चीज झालें. संभाजीदादा त्यांचा उजवा हात बनले आहेत, त्यांजवर भार टाकून वडील आतां बंगलोरच्या राजधानींत ऐश्वर्य थाटून इतके दिवस केलेल्या कष्टांचें योग्य फळ पावले यांत तुम्हांलाही नाहीं का समाधान वाटत ? मला जरा मोठा होऊं द्या, म्हणजे पहा मीही तुम्हाला राजमातेचें पद मिळवून देतों की नाहीं तें ! वडिलानीं तिकडे कर्नाटकांत पराक्रम केला तर इकडे महाराष्ट्रांत आम्हांस क्षेत्र काय कमी आहे ? अंगी पराक्रम असेल तर उद्योगास केव्हांही तोटा नाहीं. आपल्या पायांच्या आशीर्वादाने पहा मी एखादें राज्य कसें उठवून देतों तें. बाळकृष्णपंतास देखील मुद्दामच मी अशा ईर्षेनें बोललों की परत जाऊन त्यांनीं या आमच्या इकडच्या उमेदी स्पष्टपणे वडिलांस कळवाव्या. मी असेही ऐकलें की आमचा सावत्र बंधु एकोजी वडिलांचा फार लाडका आहे. त्यांचा सगळा जीवप्राण एकोजीवर. यामुळे तर नाहीं ना तुम्हांला उद्वेग वाटला ?

**जिजाबाई**—हे भलतेंच शिवबा तूं मनांत आणतोस ! सवतीमत्सर वाटण्याइतकी का मी तुला वाटते हलक्या मनाची असेन म्हणून ! उलट पतीचा हा नवीन सुखसोहळा ऐकून मला धन्यताच वाटते. माझ्या दुःखाचे कारण अगदीं वेगळें आहे, तें तुमच्या लक्षांत येण्याजोगें नाहीं. ती कथा मोठी उद्वेगकर आहे. तुमची ऐकायची तयारी असेल तर सांगायला कांही माझी ना नाहीं. मात्र प्रकरण जरा भानगडीच्या राजकारणाचे आहे. कदाचित् माझीही कांहीं गैरसमजूत होत असेल. तेव्हां आतां असे करा, बाळकृष्णपंतांसच येथें बोलावून आणा आणि

दादाजींनाही बोलवा, म्हणजे सर्वांसमक्ष माझ्या बऱ्यावाईट विचारांची शहानिशा होईल.

( लगेच बोलावणें जाऊन दादाजी कोंडदेव व बाळकृष्णपंत हणमंते मुजूमदार आले, तेव्हां जिजाबाईनें आपलें अंतःकरण बोलून दाखविलें ते असें— )

**जिजाबाई**—दादाजीपंत, साहेबांनी विजापुरास गेल्यावर सेनापति रणदुल्लाखानाचे हाताखालीं वागून कर्नाटकांत दोन तीन स्वाऱ्या लागोपाठ केल्या, त्यांत त्यांनीं केवढे दिग्विजय मिळविले त्यांची कहाणी ऐकली का तुम्हीं बाळकृष्णपंतांचे तोंडून ? काल रात्रीं एक प्रहर त्यांचें माझें बोलणें झालें, तेव्हांपासून माझें चित्त बिलकूल ठिकाणावर नाहीं. हे काय पराक्रम म्हणावयाचे कीं कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ झाला म्हणून रडायचें, मला कांहींच सुचत नाहीं.

**दादाजी**—मीही थोडेंबहुत वर्तमान बाळकृष्णपंतांकडून ऐकलें, पण त्या संबंधानें विशेष विचार करण्यास मला अवकाशच मिळाला नाही. शिवाय आम्ही सेवक लोक, लहान तोंडीं मोठा घास घ्या कां असेंही मनांत आलें.

**जिजाबाई**—दादाजी, तुम्हांस असें बोलणें शोभत नाहीं. आम्हांस बरें वाईट सांगण्याचा अधिकार साहेबांनी आपल्याकडे सोंपविला आहे, तो केवळ सेवक म्हणून नव्हे. आपलें वय, आपली कर्तबगारी व अनुभव आणि सर्वांहून जास्त, आपला प्रज्ज्वलित राष्ट्राभिमान या गुणांनी नुसत्या आमच्या कुटुंबाचें नव्हे तर या एकंदर महाराष्ट्राचें संगोपन करणें तुमचें कर्तव्य होय. हें कर्तव्य तुम्ही आज कैक वर्षें आस्थेनें करीत आहां, याबद्दल तर आम्हांस धन्यता वाटते. शिवबा तर सारखा तुमच्या भजनीं राहून केवढ्या पराक्रमाच्या गोष्टी बोलूं लागला आहे. तुम्हीच त्याला रानावनांत हिंडवून देशस्थितीची ओळख करून देतां, त्याजला हाताशीं घेऊन न्यायनिवाडे करितां, शुक्रनीति, विदुरनीति इत्यादींचें सार त्यास

फावल्या वेळी शिकवितां, तुम्हीच त्यास लोहगांवांस जाऊन तुकाराम-बोवांची रसाळ वाणी ऐकण्याची सवय लाविली, असे एक ना दोन किती प्रकार सांगावे. असे असतां तिकडे कर्नाटकांत साहेबांनीं जर उघड उघड धर्मद्रोह व राष्ट्रद्रोह चालविला, आपल्या पराक्रमाचा व शहाणपणाचा उपयोग जर हिंदु राष्ट्र मारण्यांत केला, तर आपणही त्या कथा ऐकून त्यांचे कौतुकच करीत बसायचें कीं काय? बाळकृष्णपंतांचे आख्यान ऐकल्यापासून मला अगदीं वेड लागण्याची पाळी आली आहे. डोक्यांत काहूर उठलें आहे.

**दादाजी**—पंतांनीं आपणांस असे काय विशेष सांगितलें, मला ठाऊक नाहीं. मला आपलें वाटते, येथें आपणांस आपले काम काय थोडें आहे, कीं बाहेरच्या उठाठेवी मुद्दाम अंगावर ओढून आणाव्या.

**जिजाबाई**—दादाजी, तुम्ही असें कसें म्हणतां! पांच बोटें एकत्र उचलतील तरच ना घास पोटांत पडेल? आम्ही इकडे व साहेब तिकडे जें जें काय करूं त्यांचा उद्देश एक नको का असायला? ते तरी कोण परके नव्हत ना! मग त्यांच्या उद्योगास बाहेरच्या उठाठेवी कसें म्हणतां येईल? उद्यां आमचाही ते उच्छेद करूं लागतील तर तें सुद्धां मुकाट्यानें सहन करायचें की काय? बाळकृष्णपंत तरी कोठें स्पष्ट बोलत होते? पण मींच त्यांस प्रत्येक गोष्ट खोदखोदून विचारली, तेव्हां जे प्रकार मीं त्यांजकडून ऐकले ते मला दुःसह वाटतात. पंत पुनः सांगा बघूं साहेबांनीं गाजविलेले ते सर्व पराक्रम. ते येथून गेल्यास तीन वर्षें होऊन गेलीं. या तीन वर्षांत आम्हीं इकडे काय केलें, त्यांनी तिकडे काय केले आणि पुढे एकंदर उद्योगाचा मेळ कसा बसवायचा याचा विचार आपण आज मोकळेपणीं करूं.

**बाळकृष्णपंत**—साहेब ही जन्मभूमि सोडून विजापुरचे नोकरींत गेले. शहाजहान बादशहाशीं त्यांनीं दहापांच वर्षें जो झगडा केला, तो जगजाहीर होता. हिंदूंचा व त्यांच्या धर्माचा पाडाव करणें हेंच

विजापुरच्या सुलतानानें आपलें कर्तव्य ठरविलें. शहाजहानने निजामशाही जिकल्याबरोबर विजापुरच्या राज्यास उत्तरेकडून शह बसला, त्याचा वचपा म्हणून आदिलशहानें कर्नाटकचा प्रदेश जिकून तिकडे इस्लामाची वृद्धि करण्याचा उद्योग आरंभिला. त्या कामीं सेनापति रणदुल्लाखानाची योजना करून शहाजीराजांना त्यांचे हाताखाली दिले. प्रचंड तोफा व युद्धसाहित्य बरोबर घेऊन रणदुल्लाखान व शहाजी बंकापुर लक्ष्मेश्वरमार्गानें पश्चिम कर्नाटकवर चालून गेले. इक्केरी, केळडी, बसवापट्टण, सागर, शिरे, बगलोर, म्हैसूर, श्रीरंगपट्टण, चित्रदुर्ग, कनकागिरी, पेनुकोंडा अशी लहानमोठी अनेक विस्कळित हिंदु राज्ये विजयनगरच्या मांडलिकांचीं त्या बाजूस नांदत होतीं. तुंगभद्रा व कावेरी या नद्यांच्या योगानें हा प्रदेश केवळ नंदनवनासारखा समृद्ध व हिंदुधर्माचें अधिष्ठान बनलेला होता. त्यांत ठिकठिकाणी भव्य पुरातन मंदिरें असून त्या मंदिरांतून कैक शतकांची अगणित संपत्ति भरली होती. शिवाय शेटसावकार, श्रेष्ठी, धनिक आपापले व्यापार-उदीम पूर्वापार चालवून संपन्न बनले होते.

**शिवाजी**—पंत, मग हा सर्व प्रदेश मुसलमानांनी जिकला की काय आणि त्याचें संरक्षण वडिलांनी कां नाही केलें ?

**बाळकृष्णपंत**—तेंच तर मी सांगणार आहें. प्रसंग कसा विपरीत बनला पहा. पाऊणशें वर्षांपूर्वी तालिकोटच्या समरभूमीवर हिंदु-मुसलमानांचा तुंबळ झगडा होऊन विजयनगरचा संहार झाला. मुसलमानांनीं अपरंपार संपत्ति लुटून नेली, तेणेंकरून वर सांगितलेले लहान राजे व जमीनदार निराधार बनले असतां त्यांजवर रणदुल्लाखान चालून गेला. हिंदूंनीं एकजुटीनें त्यास तोंड दिले नाही. कित्येकांनीं तर खासगी वैर उगविण्याकरितां मुद्दाम विजापुरास जाऊन कागाळ्या केल्या आणि मुसलमानांची मदत बोलावली. एकच उदाहरण इक्केरीचे पहा, म्हणजे त्यावरून इतर ठिकाणांची कल्पना येईल.

**शिवाजी**—तुम्ही इक्केरी म्हणतां, तें काय आहे हो, कोठें आहे तो गांव?

**बाळकृष्णपंत**—इक्केरी हे स्थल सह्याद्रीच्या माथ्यावर हरिहरचे बाजूस बेदनूरच्या उत्तरेस दहा कोस होतें. डोंगराळ प्रदेशांत लहान पण समृद्ध राजधानीचे हे शहर सातशें वर्षांपासून नांदत होतें. तेथें वीरभद्रनायक नांवाचा लहानसा सत्ताधीश न्यायाने वागून प्रजापालन करीत होता. श. १५५९ च्या दसऱ्यास रणदुल्लाखान व शहाजी या इक्केरीवर चालून गेले. तोफा चालवून अल्पावकाशांत त्यांनी तट हस्तगत केला, तेव्हां वीरभद्रनायक पळून बेदनुरास गेला. मागें लोकांची दैना काय विचारावी? मुसलमानानी मंदिरें पाडिली, मूर्ती फोडल्या, संपत्ति सर्व लुटून घेतली. धनिकांची घरें जाळून हजारों हिंदूंना बाटवून मुसलमान केलें. अब्रू बचावण्यासाठी हिंदु स्त्रियांनी मुलाबाळांसकट विहिरींत उड्या टाकून प्राण दिले. कित्येकांना मुसलमानांनी भ्रष्ट केलें. हा प्रकार नुसता एकाच शहरांत झाला असें नाहीं. चालून आलेल्या फौजा गांवोगांव तसाच प्रळय उडवीत सर्वत्र संचार करीत गेल्या. लोक निर्धास्त व गाफील होते. नाहीं कोणी पुढारी की जवळ तोफाबंदुका. क्षणमात्रांत त्यांची चंदी उडाली. ज्यांनी मुसलमान होण्याचें नाकारलें, ते तलवारीखाली कटून मेले आणि पुष्कळसे प्राण वांचविण्यासाठी इस्लामी बनले. चार महिन्यांचे अल्पावधीत कर्नाटकचा पश्चिम भाग बेचिराख करून रणदुल्लाखान व शहाजी-राजे हजारों हत्ती, घोडे, उंट अशा जनावरांवर ती अपार संपत्ति †

† चार कोटी होन म्हणजे सोळा कोटी रुपये संपत्ति आणली असा अंदाज आहे. Sarkar's House of Shivaji p. 27, इक्केरीचा पाडाव ता. ३० डिसेंबर, स. १६३७,—Dr. Saletore's paper Ind. Hist. Rec. Comn. 1939; गोविंद वैद्यकृत कंठीरवनरस-विजयं, Half-yearly Journal, Mysore University, **1930.**

लादून विजयानंदानें विजापुरास दाखल झाले. आदिलशहानें स्वत: कृष्णेपावेतों सामोरे जाऊन त्यांचें स्वागत केले आणि या संपत्तीने लगेच विजापुरांत नवीन प्रचंड इमारती बांधण्याचें काम चालू केलें.

**जिजाबाई**—हरहर, काय हा प्रकार. कानांनीं ऐकवत देखील नाही. पंत, तुम्ही या गोष्टी नुसत्या ऐकीव सांगतां कीं प्रत्यक्ष पाहिल्या हो ?

**बाळ०**—मातुश्रीसाहेब, मी आपल्या अन्नावर वाढलो. भोसल्यांच्या मुजूमदारीत आमचें हें हणमंते घराणें पूर्वापार सेवा करीत आहे. शहाजीराजांबरोबर मी स्वत: अहोरात्र हिशेबाचें व इतर लेखन करीत आहे. इक्केरीवर जी संपत्ति पैदा झाली तिच्या याद्या याच हातांनी बनवितांना काय कष्ट पडले ते माझ्या जिवाला माहीत.

**जिजाबाई**—काय हो पंत, तुम्ही साहेबांच्या सन्निध राहून एवढ्या प्रतिष्ठा मिळविल्यात, तर आपणच आपलीं मंदिरें पाडणें, मूर्ती फोडणें संपत्ति लुटून मुसलमानांचे घरांत घालणे, स्त्रियांवर बलात्कार करणे, अशीं कृत्ये करतांना तुमच्या जिवास खंत नाहीं वाटली ?

**बाळ०**—तें कांही आपण विचारूं नये व आम्ही सांगू नये. साहेबांच्या व आमच्या सर्वांच्या बोलण्यांत हाच विषय सारखा घोळतो. पण सेवाधर्म पडला ना ? यत्किंचित् कुचराई दिसली तर हे खान आमच्या गर्दना मारतील की ! डोळे मिटून ही कामे करणें आमच्या नशिबीं आलें, दुसरें काय !

**जिजाबाई**—उगाच नशिबाला बोल कां लावतां ? कोणी तुमच्या डोक्यावर धोंड दिली होती मुसलमानांची सेवा करायला ? श्रम, पराक्रम सर्व तुम्ही करायचे आणि श्रेय द्यायचें स्वराष्ट्राच्या शत्रूंस. त्यांची सेवा न केली तर पोट भरायला जागाच नाहीं की काय ?

**बाळ**—सगळें खरें. समजतें पण उमजत नाही तें हें. आज कैक पिढ्या मुसलमानांची सेवा अंगीं खिळलेली, ते पाश एकदम कसे तुटतात ?

**जिजाबाई**—पण ते तोडण्याचें जर तुम्ही मनातच आणणार नाहीं तर ते आपोआप तुटतील काय? प्रत्येक इसमाने स्वराष्ट्राची व स्वधर्माची सेवा जर यथाशक्ति बजावली नाहीं, तर आपलें परदास्य कसें संपेल? बरें पण साहेबांना तरी आपल्या या धर्मद्रोहाचे मनांतून मोठें भूषण वाटते काय?

**बाळ०**—या विषयाची चर्चा उभ्या छावणीत अहोरात्र चालते. दुसरा विषयच बोलण्यांत नाही. खरे पाहतां आमच्या पन्नास हजार लष्करांत शेकडा नव्वद इसम हिंदुच आहेत. बरेचसे कांहीं सत्ताधारी अंमलदार तेवढे मुसलमान. ते आम्हा हिंदूस मनमुराद राबवितात आणि श्रेय सर्व आपण पटकावितात. वीरभद्र नायकानें आपले वकील शहाजी-राजांकडे पाठवून विनवणी केली, कीं आपण मुसलमानांचे साह्य करून आम्हा हिंदूंचा संहार करूं नका; आपणही हिंदुच, आमचे धर्मबांधव आहां. पण शहाजीराजांचा इलाज चालला नाही. त्यांच्या प्रत्येक हालचालीवर रणदुल्लाखानाची टेहळणी सारखी चालू होती. म्हणून कोणाचे वकील परभारें आले तर त्यांस ते एवढेंच सांगत, कीं तुम्हांस काय कळविणे असेल ते खानसाहेबांस कळवा, आम्ही केवळ त्यांचे ताबेदार.

**जिजाबाई**—दादाजी, ऐका नीट, कसे व्यवहार चालतात ते. बरें पंत, पुढे राजांचा काय विचार बनला आहे?

**बाळ०**—आपण करतों हें बरें नाहीं असें राजांना वाटते, पण विजापुरची नोकरी सोडली तर दुसरा कोठें आधार पाहिजे ना!

**शिवाजी**—मासाहेब, वडिलांना या मुसलमानांचा संताप कसा येत नाहीं? तुम्ही त्यांच्या पराक्रमाचें एवढें स्तोम माजवितां, मग हे असे मूग गिळून स्वस्थ कां बसतात?

**जिजाबाई**—हाच तर मुद्याचा प्रश्न. मला वाईट वाटतें तें हेंच. यांनीं जर समस्त हिंदूंचा पुढाकार घेण्याचें मनांत आणलें तर हे अंगच्या पराक्रमावर हिंदूंचें स्वतंत्र राज्य तिकडे देखील स्थापूं शकतील. पंत, असा कांही प्रकार कर्नाटकच्या प्रदेशांत शक्य आहेसें तुम्हांस वाटते काय ?

**बाळ०**—नाही, मासाहेब, ही गोष्ट संभवनीय नाही. शिरे, बसवा-पट्टण, श्रीरंगपट्टण, अशा सर्व ठिकाणचे सत्ताधीश आपसांत एकमेकांचे अत्यंत वैरी आहेत. हिंदूंचें संघटन होणे दुरापास्त होय. त्यांतून शहाजीराजांसारख्या महाराष्ट्रीयांना तर ते बिलकूल वश होणार नाहींत. म्हणूनच तर मुसलमानांचा जोर चालतो. हल्ली सर्व हिंदु अत्यंत हैराण झाले आहेत. त्यांना त्राता म्हणून कोणी उरलेला नाहीं. उघडपणे बोलण्याची देखील चोरी आहे. सहज मातुश्रींचें दर्शन घेण्यासाठी मी आलो म्हणून एवढे बोलतां आलें. मी आपणास भेटून तिकडच्या हकीकती कळविल्या ही गोष्ट आपण बाहेर प्रगट देखील करूं नये. नाहीं तर माझा व राजांचा काय परिणाम होईल तें सांगता येत नाही.

**जिजाबाई**—म्हणजे ? एकूण खरें बोलण्याची देखील चोरी ना ? मग तुम्हांस साहेबांनीं इकडे पाठविलें तरी कसें ?

**बाळ०**—नाहीं, त्यांनीं नाहींच मला पाठविलें. रणदुल्लाखानाचे स्वारीबरोबर हिशेब सर्व पुरा करण्यासाठीं मी विजापुरास आलों. चिंचवडास आमचें हणमंत्यांचें कुलदैवत. जातगोत सर्व तेथें. जवळ आलों म्हणून जन्मभूमीचे दर्शनासाठीं एक महिन्याची रजा घेऊन मी चिंचवडास आलों. तेथें आल्यावर मनांत आलें, मातुश्रींचे पाय पाहावे, साहेबही विचारतील, इतक्या जवळ गेलांत, मग पुण्यास जाऊन त्यांचा समाचार कां नाहीं घेऊन आलांत ? आपण बालराजांसह सर्व खुशाल आहांत हें पाहून संतोष वाटला. महिना भरत आला, आतां परत जाऊन

साहेबांस इकडची खबर कळवितों. मात्र आजचीं हीं बोलणीं या कानाचीं त्या कानास कळवूं नयेत, एवढी विनंती आहे.

इतका हा संवाद झाल्यावर पुढे काय प्रकार घडला तें आतां सांगूं.

पुण्याकडील मावळच्या रसरशित वातावरणांत जिजाबाई व दादाजी यांच्या प्रोत्साहनानें बालशिवाजीच्या अंतःकरणांत ज्या स्वातंत्र्याच्या ऊर्मी सळसळत होत्या, त्या बंगलोरच्या नरम ऐपआरामांत शहाजीला मानवल्या नाहीत. तिकडे तो लहानसा मांडलिक राजा बनला. अठरा कारखान्यांचे दरबारी ऐश्वर्य त्याने थाटलें. पदरीं गवई, कवी, पुराणिक वगैरे बाळगून त्याने आपला जम आरामप्रियतेवर बसविला. बाळकृष्ण-पतानें परत गेल्यावर त्यास पुण्याकडील खबर कळविली, तेव्हां जिजाबाईच्या प्रखर व मानी तेजाची शहाजीला अटकळ होऊन, सेवाधर्माला विरुद्ध असें वळण बालशिवाजीच्या भावनेला मिळत असेल तर ते वेळींच दाबून टाकावें असे मनांत आणून, त्यानें त्या सर्वांस बंगलोर येथे मुद्दाम आपल्या भेटीस आणविले. शिवाजीचें लग्नही याच संधीस निंबाळकरांच्या मुलीशीं झाले होते, तेव्हां सूनबाईसह मंडळी पुण्याहून शहाजीकडे बंगलोरास गेली. तिकडे त्यांचा मुक्काम चांगला दोन वर्षे झाला.

पण दोघांचेही विचारप्रवाह विरुद्ध दिशांनी वाहत असल्यामुळें त्यांचा मेळ कसा तो मुळींच बसला नाहीं. उलट घालून पाडून बोलणीं, रुसवे व प्रच्छन्न भांडाभांडी यांतच तो सर्व काल गेला. अघळपघळ भाषण पुष्कळ, पण मुद्दा कायम, त्यामुळें जवळच्या मंडळींची त्रेधा मात्र उडे. जिजाबाई मानी व कडक स्वभावाची, तिला नवऱ्याचा सहवास रुचला नाहीं. पहिल्या आठ चार दिवसांत एकंदर रंग ओळखून तिनें यात्रेच्या निमित्तानें बंगलोरांतून पाय काढला. मंदिरें, देवस्थाने दक्षिणेंत विपुल आहेत तीं तिनें स्वतः फिरून पाहिलीं. कार्तिकस्वामी, बालाजी, मदुरामीनाक्षी, श्रीरंगम्, रामेश्वरम्, कांची अशा देवस्थानांच्या दर्शनांत

तिनें मनमुराद कालक्षेप केला. इकडे दादाजीने दरबारी कामें व पुण्याच्या जागिरीचे हिशेब यजमानास समजावून दिले. शिवाजीनें बंगलोरचा बंदोबस्त, कारभार, लष्करी रचना इत्यादि प्रकार पाहून घेतले आणि निरनिराळया कामगारांशीं चर्चा करून अंतःस्थितीचे निरीक्षण केले तथापि पितापुत्रांच्या प्रेमाची वृद्धि मात्र झाली नाही.

शहाजीशिवाजींची वरील हकीकत विजापुरास शहाचे कानांवर थोडीबहुत गेली होती. त्यांजबद्दल शहाचे मन कधीच निर्धास्त नव्हतें. हे मराठे लोक बोलतील एक, करतील एक, अशी चिंता उत्पन्न होऊन शहानें हुकूम पाठवून त्यांस विजापुरास भेटीस बोलाविले. शहाजीला हे इष्टच होते. बालशिवाजीला शहाचे पायांवर घालून पुण्याची जागीर त्याचे नांवानें कायम करून घेण्याचा विचार शहाजीने योजिला. हा उद्देश मनांत बाळगून शहाजी आपल्या दोन पत्न्या, पुत्र व परिवार घेऊन विजापुरास निघाला.

शिवाजी ही जन्मापासून आईच्या तालमींत वागलेली स्वतंत्र विचाराची लोकोत्तर व्यक्ति. वयोमानाने आतां व्यवहारही चांगले समजूं लागले. मनांत निदिध्यास एकच की आपल्या धर्माचा व राष्ट्राचा परसत्तेखालीं अधःपात होत आहे तो बंद कसा करावयाचा. वडिलांस अभिमान वाटतो मुसलमानसेवेचा, ते केवळ त्यांचे आधारस्तंभ, हा प्रकार प्रसंगानुसार तो वडिलांशीं स्पष्टपणे बोले. विजापुरची वाट चालत असतां उभयतांचा बेबनाव जास्तच निकरास पोंचला. त्याचा एक मासला असा—

**शहाजी**—आम्हांस जर शहाची नोकरी करणें प्राप्त आहे, तर ते सांगतील ती कामगिरी उठविलीच पाहिजे. आम्हांला तरी स्वधर्माचा अभिमान नाहीं असें थोडेंच आहे ?

**शिवाजी**—पण नोकरी झाली म्हणून भलतीच कामें करायचीं कीं काय ?

**शहाजी**—आम्ही होऊन स्वधर्माचा उच्छेद करीत नाहीं. त्यांतून सेवाधर्मामुळें कित्येक गोष्टी नाइलाजानें कराव्या लागतात. धन्यास दुखवून आपला निभाव कसा लागेल ? मोगलांशी दहा वर्षे झगडण्यांत आमच्या रक्ताचें पाणी कसें झालें ते तुमच्या मातुश्री चांगलें जाणतात. आतां कोठें शांतपणें सुखाचा घांस मिळूं लागला आहे तो गमावल्यास जायचें कुठें ?

**शिवाजी**—ज्या सेवेंत आपल्याच लोकांच्या मानेवर सुरी ठेवावी लागते, ती सेवा अजिबात सोडूनच दिली तर ?

**शहाजी**—तर काय, शहा आपणास पकडून गर्दन मारील. शहाची सत्ता केवढी आहे ती तुम्हांस एखाद्या जंगलांत बसून कशी कळणार ?

**शिवाजी**—त्या शहाचा उघड प्रतिकार करण्यास आपल्या अंगी पराक्रम नाही की काय ? मुसलमान मात्र पराक्रमी आणि आम्ही कोणीच नव्हे असे आपल्यास कसे वाटतें ? मनांत आणूं तर आपण नाही का राज्ये निर्माण करूं शकणार ? गज्नवी महंमूद, अलाउद्दीन खिलजी इत्यादींनी हिंदूंचा धुव्वा उडवला, ते तरी कोणी अमानुष कोटींतले होते कीं काय ? आम्हींच नि.सत्त्व बनलों म्हणून त्यांच्या दहापांच हजारांपुढें आम्ही हार खात गेलो.

येणेंप्रमाणें वारंवार बोलणीं होऊन परसत्तेची तावेदारी व निर्भेळ स्वातंत्र्य यांचा हा झगडा दिवसेंदिवस ज्यास्तच स्पष्ट होत गेला. त्यांत प्रसंगोपात जिजाबाईनें पुत्राची कड घेतली. शहाजीराजे उगाच अडचणीचा बाऊ करून दाखवितात, आपण मराठे निकरानें वागूं तर मुसलमानांचा प्रतिकार करून स्वधर्माचे रक्षण करण्यास समर्थ होऊं, अशी भावना शिवाजीची बनली. मातेनें त्याचें कौतुक केलें. पुढें

मंडळी विजापुरास दाखल झाली, तेथे मुसलमानांपुढें मान वांकविण्याचें नाकारून शिवाजीनें ताठरपणा दाखविला, तो वाचकांस विदित आहे.

यावरून पितापुत्रांचे उघड वितुष्ट बनलें. त्यानंतर शिवाजीनें विजापुरच्या बाजारांत मुसलमान खाटकांना रोखठोक कंठस्नान घातलें, त्या बनावानें तर तेथे मोठा आकान्त उडाला. आदिलशहानें शहाजीस भयंकर धाक घातला, त्या संकटसमयांत शहाजी, शिवाजी व जिजाबाई यांचा एकान्तांत खालील संवाद झाला--

**शहाजी**—बोला, आतां पुढील विचार काय तो. उद्यां शहा तुम्हां आम्हांस भलतीच सजा करतील, किंबहुना प्राणही घेतील. सबब आपण सर्व जाऊन क्षमेची याचना करूं तरच कदाचित् निभावणूक होईल.

**शिवाजी**—मला हे बिलकूल मान्य नाही. मी मातुश्रीला घेऊन आजच येथून रातोरात निघून जातों. आपण खुशाल शहाकडे जाऊन क्षमा मागावी; पुत्र आमचे आज्ञेंत नाहीं, त्यास आपण वाटेल ती सजा करावी असें त्यास सांगून आपण आपला बचाव करा. आम्हांस सुचेल तो मार्ग आम्ही पाहूं. आमचा संकल्प प्रामाणिक असेल तर तो श्री पार पाडील; आणि तो न सिद्धीस गेला आणि त्या प्रयत्नांत प्राण खर्ची पडले, तरी तेंही कांहीं वावगे नाही. कोणी तरी हें साहस अंगावर घेतलेंच पाहिजे.

असें सांगून शिवाजी मातुश्रीसह तात्काळ विजापूर सोडून निघाला आणि परत येतांच मावळांतलें विजापुरकरांचें मुख्य ठिकाण सिंहगड किल्ला तो त्यानें अल्पावधींत काबीज केला. स्वतः शहाजीने जरी तो मार्ग स्वीकारला नाहीं, तरी पुत्राच्या वीर्यतेजाचें कौतुक करून बंगलोरास गेल्यावर त्या उपक्रमाची योग्य तर्तूदही त्याने करून पाठविली. शिवभारतकार सांगतो—

**ततः कतिपयैरेव गजवाजिपदातिभिः ।**
**मौलैराप्तैरमात्यैश्च ख्यातैरध्यापकैरपि ।**
**बिरुदैश्च ध्वजैरुच्चैः कोषेणापि च भूयसा ।**
**समवेतममुं शाहभूपतिः शोभने दिने ।**
**प्राहिणोत्पुण्यदेशाय पुण्यकारिणमात्मजम् ॥**

[ १०. २५–२७ ]

( नंतर शहाजीराजांनी हत्ती, घोडे, पायदळ, मोठे अमात्य, आप्त, विख्यात अध्यापक, बिरुदे, ध्वज व भरपूर द्रव्य यांसह आपल्या पराक्रमी पुत्राला पुण्यास पाठवून दिले. )

यावरून शिवाजीमहाराजांनीं आपल्या भावी उद्योगाचा मूळ पाया कसा रचिला याची कल्पना होईल.

# ३

# स्वराज्याची झोळी



“ **नीताविवोत्साहगुणेन संपत्** ”—कुमारसंभव
**अर्थ**—संपत्तीचा पिता पराक्रम व जननी नीति.

“ **मालमत्ता सुरतेची आकार करितां सर्व बिशात पांच करोड होनांची आणिली.** ”—सभासद

शिवाजीमहाराजांनीं पहिल्या दहा वर्षांत मावळांतील स्वराज्य पुरें केलें. त्या पुढील दहा वर्षांत मोरे अफझलखान इत्यादिकांची खबर घेऊन आदीलशाहीचा पुष्कळसा प्रदेश आपल्या स्वराज्यांत सामील केला. इकडे याच वेळी दिल्लीस औरंगजेब बादशाह होऊन त्याने प्रथम दक्षिण देश जिकण्यासाठीं आपला मामा शायिस्ताखान यास जंगी फौज देऊन रवाना केलें. अफझलखानास मारल्यावर शिवाजी पन्हाळगडावर विजापुरच्या फौजेशीं लढत असतां, त्यास बातमी आली कीं शायिस्ताखान पुण्यास येऊन खुद्द आमच्या वाड्यांत ठाणें देऊन बसला आहे. तेव्हांपासून तीन वर्षें पावेतों खानानें चहूंकडे आपल्या फौजा पेरून शिवाजीवर असा कांहीं कहर उडवून दिला, की आपले हे नवीन जमत चाललेलें चिमुकलें राज्य आतां टिकणें कठिण अशी भयंकर धास्ती शिवाजीला पडली. या तीन वर्षांत एक दिवस सुद्धां स्वस्थ बसण्यास त्यास निर्भय जागा राहिली नाहीं. जिवाच्या भीतीनें त्यास सारखें तीन वर्षें रानावनांत भटकत राहून भयंकर हाल सोसावे लागले.

पण अडचण आली कीं तिची तोड काढण्यांत शिवाजीची बुद्धि कांहीं तरी अजब करामत करून दाखवी. स. १६६३ च्या फाल्गुनांत शिवाजीनें

पांचपन्नास जिवाचे सोबती बरोबर घेऊन एके रात्री शायिस्ताखानावर पुण्याच्या आपल्या वाड्यांत अकस्मात् छापा घालून त्याचीं बोटें तोडली, मुलास ठार मारिलें आणि नोकरचाकर जखमी केले, तेणें करून खानाची अगदीं दुर्दशा झाली आणि लवकरच औरंगजेबाने त्यास कारभारावरून परत बोलवून घेतलें. आतां पुढें आपला जम कसा बसवावा याचा विचार करण्याकरितां शिवाजीनें जिवाभावाची चार मंडळी एकत्र जमविली, त्या प्रसंगीं विचार ठरला तो असा—

**शिवाजी**—नेताजीराव, येसबा, आतां पुढें काय उद्योग करावा म्हणतां ! खान निघून तूर्त परत गेला खरा, पण त्याचा परिणाम सापाच्या शेपटीवर पाय दिल्याप्रमाणें होणार यांत संशय नाही. हा बादशहा आतां आमचा साफ उच्छेद केल्याशिवाय राहत नाही. तर यास तोड तुम्ही काय सुचवितां !

**नेताजी**—बादशहाची फौज पुनः चालून येण्यापूर्वीच आपण मोगलांच्या राज्यांत चहूंकडे दंगा उडवून दिला पाहिजे. आपणच पुढे उत्तरेच्या बाजूस चढाई करून मोगलांस अटकाव करावा.

**शिवाजी**—तोंडाने या गोष्टी बोलणे सोपें आहे, पण त्यासाठीं फौज किती लागेल, खर्च कसा भागवायचा, तोफा वगैरे साहित्य हाताशी असल्याशिवाय मोगलांपुढे आपला निभाव कसा होईल, याचा कांही विचार तुम्हीं आणला का मनांत ?

**नेताजी**—तोही विचार मी थोडासा मनांत आणला आहे, आपली आज्ञा असेल तर बोलतों.

**शिवाजी**—अहो, यांत आज्ञेची वाट कशास पाहतां ! आपण सर्वांनीं मोकळेपणाने बोलून कांही अजब योजना करावी म्हणून तर मीं मुद्दाम तुम्हांस आज बोलावले. अशांतूनच कांही युक्ति निघेल.

**नेताजी**—माझा तो खंडूजी धुमाळ नाही का. एकदां मी त्याची गोष्ट आपणाशी बोललों होतों. सर्व ठिकाणीं हिंडून नाना प्रकारची

बित्तंबातमी आणण्यांत मोठा पटाईत बघा. कधीं रडत म्हणून परत यायचा नाहीं कीं सबब सांगायचा नाहीं. चोरी बेमालूम करावी अशी त्यानेंच. पाऊस, थंडी, उपास कशाही अडचणी असोत, कांहीं एक न जुमानतां वाघासारखा उड्या टाकीत जातो. आज दोन वर्षें होत आलीं, मीच त्यास मोगलांच्या राज्यांत चहूंकडे हिंडून ठिकठिकाणची बातमी आणण्यास पाठविलें होतें. खानाचीं बोटें तुटलीं ना, त्याच्या दुसऱ्याच दिवशीं तो परत येऊन मला भेटला.

**शि०**—तो धुमाळ वीरवाल्याचा राहणारा असा पातळ काठीचा आहे तोच ना तुम्ही म्हणतां ! मी त्याला चांगला ओळखतो. आतां कोठें आहे बरे तो ? जवळ असेल तर त्यालाच बोलवा इथे. पण खात्री आहेना तुमची कीं तो शत्रूकडे भेदणार नाही अशी. चोरीच्या व पैशाच्या नादास लागलं म्हणजे या माणसांचा कांहीं नेम नसतो. एखादे वेळेस आमचाच गळा कापतील.

**ने०**—खंडूजी त्यांतला नाही महाराज. दादाजीपंतांनीं सिंहगड प्रथम घेतला, त्या वेळीं किल्ल्यावरचा पहिला भेद त्यानें आणला. हा पहा मीच त्याला आंत आणतों. [ खंडूजी धुमाळ येतो ]. खंडूजी, सांग सगळें महाराजांना तूं इतक्या दिवस काय पाहिलेंस तें.

**खंडूजी**—खान जेव्हां लालमहालांत येऊन राहिला, तेव्हां सरनोबत-साहेबांनी मला हुकूम केला, कीं मोगलांच्या मुलखांत चहूंकडे फिरून ठिकठिकाणचा भेद आण.

**शिवाजी**—भेद आणायचा म्हणजे काय करायचं रे ?

**खंडूजी**—मी व माझा धाकटा भाऊ दोघे घरांतून बाहेर पडलो. खाकेंत एक लहानशी पिशवी. खांद्यावर एक घोंगडे, डोक्यास मुंडासें, हातांत बांबूची लांब काठी लोखंडी वळीं मारलेली, एक लगावली कीं डोकें फोडील अशी. वाटेंत कसा प्रसंग येतो कोणास ठाऊक. त्यासाठीं वाटेल तें सोंग घेण्याची तयारी या एका लहानशा पिशवींत. गोसावी,

बैरागी, भिल्ल, कोमटी अशी बतावणी केल्याशिवाय कुठें निभाव लागतो ! गांवांत आलों कीं भिकाऱ्याचें सोंग घेऊन दोघे दोन वाटांनीं अंधारांतून भिक्षा मागत हिडायचें. चौक्या पहारे कुठें कसे आहेत, मोगलांचे अंमलदार कोण गाफील किंवा व्यसनी आहेत, फौज किती आहे, खजिन्याचा बंदोबस्त कसा आहे, सावकार लोक कोण कोठें राहतात, व्यापारउदीम कसा चालतो, अशी झाडून सारी बातमी मिळवून मग चाललों दुसऱ्या गांवास.

**शिवा**—कोणत्या वाटेनें, कोणीकडे कसे फिरून आलांत रे तुम्ही ?

**खंडू०**—पुण्याहून आधीं कल्याणास गेलों. तेथून पुढे जव्हार इद्रगड करीत वासदा नवसरी वरून सुरतेस गेलों. सुरतेत चांगले तीन महिने राहिलो. तिथून पुढे खानदेशात चढून धरणगांव पाहिले. धरण-गांवावरून बऱ्हाणपुरास आलों. मग परत फिरून औरंगाबाद, पैठण, नगर, जुन्नर करीत मी आलो पुण्याला; आणि भाऊ गेला बीड, परिंडा, बेदरकडे आणि तोही आता तुळजापुरावरून बार्शी, पंढरपुर करीत इतक्यांत हजर होईल बघा.

**शिवाजी**—मग इतक्या प्रांतांत कोणता भाग तुम्हांस पैसा मिळवायला व बादशहाचें नाक कापायला सोयीचा वाटतो रे ?

**खंडूजी**—जितकें लांब जावें तितका बदोबस्त कमी. बेदर, विजापूर, औरंगाबाद, बऱ्हाणपूर, खानदेश इकडच्या भागांत मोगलाच्या फौजा सारख्या फिरतात. गोवा कारवारकडे पोर्तुगीझ लोक बलवान आहेत. बंदोबस्त नाही व पैसा मुबलक असें शहर एक सुरत आम्हांस आढळलें. तिथें एक लहानसा तट आहे, पण सावकार लोक सगळे बाहेर राहतात. सुरतेसारखी उतार पेठ व धनिक व्यापारी या दक्षिण देशांत कोठेच नाहीं बघा. एक एक व्यापारी दहावीस कोटींचा मालक. शिवाय सुरतेस बादशहाचीं मोठमोठीं जहाजें आहेत. बादशहाला मक्केचा शोक फार. हिंदुस्थानचे मुसलमान तेथून सारखे यात्रेसाठीं जात येत असतात.

त्यांच्या जवळही रगड पैसा रहातो. इनायतखान म्हणून सुरतेस मोगली सुभेदार आहे, नुसता अफू खाऊन पडलेला असतो. जवळ कांहीं हजार पांचशें देखील शिपाई नाहीत. मला वाटते महाराजांनी मनांत आणलें तर सुरतेंतून मोठी कमाई मिळेल. रस्ते व आडवाटा आम्हीं सर्व नीट पाहून ठेविल्या आहेत. मग जशी महाराजांची मर्जी. [ खंडूजी बाहेर जातो ].

**शिवाजी**—नेताजीराव, माहिती तर खूप आणलीत. पण एवढें प्रचंड काम आपणास झेपेलसें तुम्हांस वाटते? किंवा नसतें संकट ओढून आणल्यासारखें होईल. शिवाय आपलेच लोक काय म्हणतील याचा कांही विचार नको का मनांत आणायला !

**नेताजी**—लोक काय म्हणणार, मी समजतो हिंदु प्रजा सर्व आपणांस दुवा देईल. आज तीन वर्षें बादशहाने आमचा कसा उच्छेद चालविला आहे तो सगळे लोक जाणतात. आमच्या घरांत आम्ही चोर होऊन गेलो. मग आम्ही जायचें कुठे आणि राहयचें कोठें. बादशहाचा आपला आतां उघड सामनाच चालू झाला आहे. एक असा फटकारा त्यास लगावून द्यावा कीं सर्व जग वाहवा करील. सुरतेंत दोन दिवस राहिलो म्हणजे पुरे. चार दोन कोटींची मत्ता सहज हातास लागेल. सुरतेवर चाबूक मारला, की बादशहाची आपल्या या पुण्यावरली पकड लगेच ढिली पडेल. पैसा हातास आला म्हणजे फौज व तोफा बनवून आपण बादशहाशी उघड युद्ध पुकारूं. ये म्हणावें पुनः कसा आमच्या या घरावर अग्नि फिरवायला.

**शिवा०**—अहो, पण असा दरवडा गरीब प्रजेवर राजरोस घालणे न्यायनीतीस शोभणारें नाही. उगाच नसती हाकाटी,—

**नेताजी**—यांत न्यायनीति कसली ! आपले कैक पिढ्यांचे पुणे, आपण आपल्या खर्चानें बांधलेला हा लालमहाल, आपले हे गडकोट

सर्व कांहीं बादशहानें व्यापले, तेव्हां त्याची नीति कुठें राहिली ? दुष्टाशीं वागायचें म्हणजे जशास तसे हाच न्याय.

**शिवा०**—बरे पण सुरतेवर जायला तयारी कांहीं थोडीथोडकी नाहीं पुरणार ! आपण तर बोलून चालून दरिद्री. या मावळ्यांचे ढुंगणाला लंगोटी देखील भरपूर मिळत नाही.

**नेताजी**—महाराज मावळ्यांना नेसायला बाहेरची लंगोटी नसेल, मोठमोठे पायजमे व दुशाला अंगावर नसतील, पण त्यांची छाती जर पारखून पाहिली तर एक मावळा दहा मुसलमानांस भारी आहे. मी आज वीस वर्षे या मावळ्यांच्याच जिवावर मोगलांस सारखे पाणी पाजतों आहे. सुरतेचा पैसा आणून मग आपण या मावळ्यांची शरीरें सुंदर कपड्यांनीं झांकून काढूं. आणखी दुसरी एक कल्पना मला सुचते. महाराज, गेल्या वर्षी आपले वडील शहाजीराजे देशीं आले. आपण पुत्रधर्म आचरून त्यांच्या डोळ्यांचे पारणे फेडिलें. सर्व प्रदेश हिंडून पाहिला, तेव्हां मी आपल्याबरोबर होतो. राजे आपणांस काय बोलले, आठवत असेल.

**शिवा०**—काय बोलले सांगा, तुमचा रोख नाहीं मला कळत.

**नेता०**—ते म्हणाले, शिवबा, तुम्हांला राहायाला ही पुण्याची मैदानी जागा नाही कामाची. विजापुर नगरकडून केव्हां शत्रूची धाड पुण्यावर येईल नेम नाही. मोऱ्यांचा तो रायरी डोंगर तुमच्या राजधानीला आमच्या मतें फार उपयोगाचा होईल. पन्नास वर्षे जरी शत्रु खाली येऊन बसला तरी त्याचा वर इलाज चालायचा नाहीं.

**शिवा०**—हो मला आठवते ही वडिलांची सूचना. पण रायरीचा रायगड बनवायला खर्च काय लागेल याची आहे का कांहीं कल्पना. राजधानी म्हटली कीं सर्व कारखाने अष्टाधिकार आले, नुसती एक वाटच करायची म्हटली तर पन्नास लाख पुरणार नाहीत. मग तट बांधणें, इमारती तयार करणे यासाठीं पाण्यासारखा पैसा लागेल.

**नेता०**—तेंच तर मी सांगतों. सुरतेंत पैसा आहे. आपणाला तो हवा आहे. एकदां युद्ध सुरू झालें की शत्रूजवळ आहे नाहीं तें सर्व आपलें. यालाच युद्धनीति म्हणतात. बादशहा नाहीं का खंडणी घेत ? आपण तरी ही स्वराज्याची झोळीच समजूं. सोयीनें लोकांस सांगूं, हे स्वधर्माचें व स्वराष्ट्राचें काम आहे, त्यास सर्वांनी हातभार लावावा. बऱ्या बोलानें लोकांनी दिलें तर ठीक, नाहीं तर जबरदस्ती आहेच. अंगांत पराक्रम असेल तर सर्व कांही प्राप्त होतें. आम्हां मराठ्यांजवळ पैसा नाहीं, पण पैशाहून जास्त मौल्यवान जो पराक्रम तो आपल्या अंगांत भरपूर आहे, बुद्धि देखील पराक्रमाला साजेशी मुबलक आहे.

**शिवा०**—नेताजी तुम्हीं फार खोल विचार केलेला दिसतोय ! पण सुरतेवर जायला किती लोक बरोबर घेतले पाहिजेत ? उगाच फजिती पदरांत घेऊन परत नाहीं यायचें !

**नेताजी०**—महाराज, मी तरी लहानपणापासून आपल्या बरोबरच सर्व शिकलो ना. मुख्य गुरु ते पुण्यश्लोक दादाजी व आशीर्वाद आपल्या मातुश्रीदेवींचा. तोच आशीर्वाद आपल्या अंगांतलें चिलखत. मला वाटतें चार दोन हजार निवडक स्वार सुरतच्या उद्योगास बस्स आहेत. माणसें चांगलीं पारखून घेतली म्हणजे झालें. आपण ऐकत नाहीं का, तो महंमूद गज्नवी, तो मलीक काफूर, तो बाबर असे जेव्हां बाहेरून आपल्या देशावर धाड मारीत आले, तेव्हां त्यांच्या फौजा देखील दहा पांच हजारांच्या आंतच होत्या, पण त्या लाखों हिंदूंस भारी झाल्या. तोच कित्ता आपण पुढें ठेवला कीं भागलें. निकरानें धावून येणारे पांच दरवडेखोर हजार पांचशेंना भारी होतात हें आपण रोजरोज डोळ्यांनीं पहात आहों.

**शिवाजी**—बस्स तर. झाला आमचा निश्चय. आतां चंपाषष्ठी नजीक येत आहे.* मी मातुश्रींना सर्व सांगून त्यांचा आशीर्वाद घेतों,

* ता. २६ नोव्हेंबर, स. १६६३ रोजी.

भवानीदेवीचा प्रसाद मिळवितो. सर्वांनीं कल्याण येथें छावणीत जमायचें, तेथून शुभमुहूर्तावर पुढें प्रयाण करूं. मात्र आपले हे सर्व बेत तुम्ही व मी या दोघांशिवाय बाहेर षट्‌कर्णी होतां उपयोगी नाही. जा, माणसांची निवड कसोशीने करा. रामराम.

एक महिन्याच्या अवधींत कल्याणवर छावणी पडून प्रयाणाची सिद्धता झाली. मात्र बाहेर सर्व जाहिरात विजापुरावर चालून जाण्याची केली. सुरतच्या बाजूस जाण्याचे कोणाच्या ध्यानीमनीहि नाही. ता. ३१ डिसेंबर, स. १६६३ रोजीं सर्वांना ताकीद मिळाली, की "उद्यां सकाळी भल्या पहांटेस स्वारी निघणार. महाराज जातील त्यांचे मागोमाग सर्वांनीं निमूटपणे वाट चालायची." खंडूजी धुमाळ मुख्य वाटाड्या महाराजांबरोबर तयार झाला. ठरल्याप्रमाणे स्वारी निघाली. जो तो आश्चर्य करतो, महाराज इकडे उत्तरेच्या बाजूस कोणीकडे चालले. पण सर्व प्रकार अत्यंत मुकाट्याने सुरू झाला. दररोज सुमारें पंचवीस कोसांची मजल करून तारीख ३ जानेवारीस सायंकाळीं मुक्काम सुरतेअलीकडे पंधरा कोसांवर गणदेवी येथें पडला. लगेच महाराजांनीं आपले दोन विश्वासू वकील सुरतेस पुढे रवाना केले. त्यांजबरोबर एक पत्र तेथच्या सुभेदारास, आणि व्यापारी लोकास व धनिकास कळविण्यासाठीं एक जाहीरनामा दिला, त्यांतील मतलब येणेंप्रमाणें—

"बादशहांनीं आमच्या घरादारांचा उच्छेद केल्यामुळें त्यांजबरोबर आतां आमचें उघड युद्ध जुंपलें आहे. युद्धाचा खर्च भागविण्यासाठीं द्रव्य पाहिजे, ते ठिकठिकाणच्या धनिकांकडून जमविण्याचे आम्हीं ठरविले आहे. सुरतेंतून आम्हांस पन्नास लाख रुपये पाहिजेत. परवांच्या दिवशीं दोन प्रहरीं आम्ही सुरतेस दाखल होऊं, त्या वेळीं ही रक्कम आणून रोख भरावी, म्हणजे कोणासही यत्किंचित् तोसीस न देतां रक्कम घेऊन आम्ही परत जाऊं. सुरतसारख्या संपन्न नगराला पन्नास लाख रुपयांची आमची ही अल्प मागणी सर्वथा कस्पटासमान होय.

ही रक्कम सर्वांनीं आपसांत जमवून आम्हांस खुषीनें आणून पोंचवावी आणि स्वराज्याचा उद्योग आम्हीं आरंभिला आहे त्यास हातभार लावून आमच्यावर प्रेम ठेवावें. परतु रक्कम न देतां आम्हांस विरोध करण्याची दुर्बुद्धि धारण केल्यास, मग मात्र आम्हांस जबरदस्ती करावी लागेल तर त्याची जबाबदारी आम्हांवर नाहीं. आमचा कज्जा बादशहाशी आहे, गरीब रयतेशी बिलकूल नाही. आमच्या या स्वराज्याच्या झोळींत प्रत्येकाने भिक्षा घालून आम्हांस एकदिलाने साह्य करावें, एवढीच आमची सुरतकरांस विनंती आहे."

शिवाजीच्या वकिलांनी आपलें काम यथायोग्य पार पाडिलें. त्यानी सुरतच्या बऱ्हाणपुर दरवाज्यावर महाराजांचा जाहीरनामा लावला आणि नगरशेट वगैरे सावकारांस स्वतः जाऊन तो समजावून दिला. इनायत-खानास भेटून त्यांनी महाराजांचे पत्र दिले आणि सर्व प्रकार स्पष्टपणें कळविले की, "व्यक्तिशः आपणास त्रास देण्याची महाराजांची इच्छा नाहीं. महाराज येथे येतांच आपण त्यांस भेटावे आणि सौम्योपचाराने त्यांचा संतोष करावा." पण शिवाजीची परवा त्या बिचाऱ्याला कां वाटावी ! तो बादशाही अंमलदार आपल्या गुर्मीत. बेसावध माणसाचा ताठा सहजासहजीं उतरत नसतो. त्याच्याजवळ फौज तर नव्हतीच; पण जो काय तनखा मिळे, तो सर्व खिशांत टाकून लुंगेसुंगे हजार पांचशे इसम जेमतेम त्यानें ठेवलेले होते. महाराजांच्या वकिलांस तर त्यानें धुडकावून लाविलें आणि आपला एक इसम त्यांजबरोबर देऊन जबाब कळविला, "आम्ही तुम्हांस ओळखीत नाहीं. भलताच आचरटपणा कराल तर तुम्हांस योग्य शासन करण्यांत येईल." असें कळवून तो भित्रा सुभेदार शहराच्या बचावाची कांहीं एक पर्वा न करितां स्वतः जीव बचावण्यासाठीं आपण किल्ल्यांत जाऊन लपून बसला.

हें उद्दामपणाचें उत्तर ऐकून महाराजांस संताप आला. ठरल्याप्रमाणें बुधवार ता. ६ जानेवारी, स. १६६४ रोजीं ते सुरतेस दाखल झाले.

एक ल्हानशी राहुटी स्वत:साठीं ठोकून सभोंवार पांच हजार स्वारांचा तळ पडला. लगेच शहरांत ठिकाठिकाणी माणसें पाठवून त्यांनीं धनिकांस भेटीस बोलावलें. सुभेदारासही दरडावणीचा निरोप कळविला. कोणी आले, कोणी आले नाहींत. कित्येकांस महाराजांनी पकडून आणून जवळ अटकेत ठेविलें. पण रकम देण्याची गोष्ट कोणी बोलेना. जो तो म्हणे आम्ही गरीब, आमच्या जवळ पैसा नाहीं. महाराजांनीं कित्येकांच्या घरांवर जप्त्या पाठवून त्यांचें द्रव्य आणण्याचा हुकूम फर्माविला.

ता. ७ उजाडली. इनायतखानास हे प्रकार कळले, तेव्हा त्याने निराळाच डाव आरंभिला. त्यानें दोन तीन दांडगे इसम निवडून त्यांस बोलणें करण्याच्या निमित्तानें शिवाजीच्या भेटीस पाठविलें. तिसऱ्या प्रहरीं महाराज सावकारांशीं दंडाच्या वाटाघाटी करीत बसले असतां खानाचे इसम त्यांच्या भेटीस आले. प्रथम त्यांनीं खूब बतावणीच्या गोडगोड बाता मारल्या आणि मग म्हणाले, “ आपणांस कित्येक गुप्त गोष्टी कळविण्याची आम्हांस आज्ञा आहे. आपण जरा बाजूस चलावे म्हणजे सर्व सांगूं. ” शिवाजीमहाराज सावध तर खरेच पण अशा प्रसंगास माघार घेणारे नव्हते. ते त्या वकिलांसह जरा दूर गेले. लगेच एकानें हातांत लपवून आणलेल्या खंजीरानें त्यांच्या पाठींत जोराचा वार केला. जखम होऊन रक्त आलें. महाराज किंचित् बाजूला कलंडले. जवळ मंडळी होतीच, त्यांनीं धावत येऊन त्या मारेकऱ्यांस जागच्या जागीं बांधलें. निमिषमात्रांत सर्व प्रकार बनला. सुदैवानें जखम विशेष मारक झाली नाहीं. लगेच उठून महाराज कामास लागले.

आतां मात्र त्यांनीं खरा रुद्रावतार धारण केला. आपण समजुतीनें वागत असतां हा सुरतचा सुभेदार मित्रेपणानें खुनाचें निंद्य कृत्य करतो, तर याचें प्रायश्चित्त आतां सर्वांनाच पुरेपूर भोगायला लावलें

पाहिजे, असा विचार ठरवून त्यांनी आपल्या लोकांना ताकिदी देऊन शहरांतील मोठमोठ्या प्रसिद्ध इमारतींस व बाजारांस आग लावण्याची आज्ञा केली. शुक्रवारी सकाळचा देखावा मोठा भीषण बनला. शहरांत चहूंकडे आगीचा कल्लोळ सुरू झाला. लोक सैरावैरा धावत सुटले. शिवाजीच्या लोकांनी घरें फोडून व खणत्या लावून अगणित संपत्ति लुटून आणिली. ता. ९ रोजीं नानाप्रकारच्या संपत्तीचे ढीग महाराजांच्या मुक्कामावर जमा झाले. इतक्यांत बातमी आली कीं मोगल फौज सुरतेच्या बचावास धावून येत आहे. लगेच मोतीं, जवाहीर, सोनें, चांदी इत्यादि मोलवान सामान उंट, घोडे वगैरे जनावरांवर लादून आणि फुटकळ सामान लोकांस बहाल करून ता. १० रोजी सकाळींच महाराजांनीं सुरतेचा मुक्काम सोडून स्वदेशीं प्रयाण केलें. निर्धास्तपणें ही सर्व लूट त्यांनी रायगडावर आणून दाखल केली. नक्की किती ऐवज आला त्याचा थांग लागत नाहीं. पण निदान पांच कोटी होन म्हणजे पंधरा कोटी रुपयांचें वित्त त्यांच्या हातास लागले असा अंदाज दाखल आहे.

हां हां म्हणतां सुरतेच्या हल्ल्याची बातमी सर्व हिंदुस्थानभर पसरून चहूंकडे मोठी खळबळ उडाली. बादशहाचें तर नाकच कापल्यासारखें झालें. पुढें दहा पांच वर्षें पावेतों सुरतेचे लोक व व्यापारी मुठींत जीव घेऊन वागूं लागले. नुसत्या सुरतेचाच हा प्रकार नव्हे, तर मोगलांच्या ताब्यांतील सर्व मोठ्या शहरांना व ठाण्यांना शिवाजीचें नांव ऐकून कंप सुटूं लागला. शिवाजीनें मात्र आपल्या तर्फेनें माणसें पाठवून लोकांना जाहीर आश्वासन दिलें, की 'बादशहाचें आमचें आतां युद्ध सुरू झालें आहे, तरी गरीब रयतेस, मुलांबाळांस किंवा स्त्रियांस आम्ही बिलकूल उपसर्ग देणार नाहीं. मात्र त्यांनीं आमच्या विरुद्ध भलतेच खटाटोप करूं नयेत. आम्ही स्वधर्माच्या व स्वराष्ट्राच्या बचावाकरितां झगडत आहों. मुसलमानांशीं देखील आमचा दावा नाहीं. मात्र बादशहा आमच्या धर्माचा उच्छेद करितात, त्याचा

प्रतिकार आम्हीं निकरानें करूं. मुसलमानही आमचे बंधुच आहेत. त्यांनीं आपला धर्म पाळावा, आम्हीं आपला पाळावा, त्या कामीं कोणीं कोणास हरकत करूं नये. आमच्या मुलखाचे आम्ही स्वामी आहो. आमच्या या उद्योगास सर्वांनीं यथाशक्ति हातभार लावावा.' उत्तरोत्तर शिवाजीचें हें उच्च ध्येय लोकांस जाहीर होऊन त्याजबद्दल सर्वत्र आदर उत्पन्न झाला. सुरतेस देखील जर त्याच्या खुनाचा प्रयत्न सुभेदारानें केला नसता, तर तेथें जे जाळपोळीचे कित्येक अत्याचार घडले तेही न घडतां, शिवाजी अल्प संतोषानें परत गेला असता. मात्र सुरतेच्या पैशानें रायगडची राजधानी शिवाजीनें अल्पावकाशांत सजवून आपल्या राज्याचा पाया भक्कम केला, यांत संशय नाही. §

शिवाजीमहाराजांनीं एका मागून एक अशीं अनेक अद्भुत कृत्यें केल्यामुळे लोकांस वाटूं लागले कीं यांस ईश्वर साह्य आहे. कोणी म्हणत तो सैतान आहे. कोणास वाटे त्यांस पंख आहेत म्हणून पाहिजे तेव्हां पाहिजे त्या ठिकाणीं त्यांस जातां येतें. कित्येक तर असेंही म्हणत कीं देवीनें त्यांस अदृश्यतेचा वर दिल्यामुळें ते कोणास दिसत नाहींत, उलट त्यांस मात्र सर्व दिसतें. पण विचारी माणसास हे तर्क पटणार नाहीत. शिवाजीमहाराज तुम्हांआम्हांसारखे मनुष्यच होते. त्यांचीं सर्व कृत्यें मानवी कोटीचीं होतीं. साहस व पराक्रम या गुणांच्या जोरावर मनुष्य या भूतलावर अनेक अद्भुत कृत्यें करीत आला आहे, आणि पुढेंही करील. ज्या माणसाला किंवा राष्ट्राला पराक्रम नाहीं त्याला या जगांत जिवंत राहण्याचा हक्कच नाहीं, असें एक सुज्ञ ग्रंथकार सांगतो तें सर्वथा खरें आहे.

§ कवि भूषण म्हणतो, "सुरत जाळून शिवाजीने बादशहाच्या छातीवर असा अग्नि पेटवून दिला कीं त्याच्या धुरानें साऱ्या पातशाहीला काळें कुट्ट काजळ फासलें गेलें."

# ४

# नाम—माहात्म्य



" **Shivaji has died so often that some begin to think him immortal.** " *The Surat Factors.*

**शिवाजी मरण पावल्याची बातमी इतक्या वेळां आली आहे कीं पुष्कळांना तो अमर आहे असेंच वाटतें.** " सुरतेच्या इंग्रजांचे लेख.

शिवाजीमहाराजांचें अवतारकार्य एवढें व्यापक होतें की त्याचें योग्य आकलन अद्यापि बिनचूक होऊं शकत नाहीं. त्यांनीं स्वराज्य स्थापिलें, हिंदु धर्माचें संरक्षण केलें, अत्यंत बिकट सकटांतून स्वातंत्र्याचा मार्ग कसा काढावा याची शिकवण आपल्या राष्ट्रास दिली, इत्यादि प्रकार सर्वत्र महशूर आहेत आणि ते सिद्ध करणारे त्यांच्या चरित्रांतले नानाविध अद्भुत प्रसंग आपण मोठ्या आवडीनें वर्णितो. शिवाजीसारखी थोर विभूति क्वचित् काळीं हजार पांचशें वर्षांत निर्माण होते, त्यामुळें त्यांच्या संबंधानें शत्रुमित्रांच्या ठिकाणीं भिन्न प्रकारच्या भावना उत्पन्न होत असतात. शिवाजीमहाराजांना अत्यंत प्रेमादराने पूज्य मानणारे जसे असंख्य लोक आहेत, तसेच त्यांचा उत्कट द्वेष करणारेही लोक कांहीं थोडे नाहींत. अशा प्रकारचा विरोध कां उद्भवतो हें कळण्यासाठीं त्यांच्या कृतींतील कांहीं गमतीच्या गोष्टी पुढें सांगतों.

शिवाजीच्या वेळीं स्वधर्माची आस्था आपल्या समाजांत तीव्रपणें वावरत होती. धर्मासाठीं प्राण देण्यासही लोक सहज तयार होत. औरंगजेब बादशहाच्या अमदानींत हिंदु लोकांस स्वधर्माचरणाचे बाबतींत

दुःसह जाच होऊं लागला, म्हणूनच महाराजांना त्याचा प्रतिकार करण्याचे अवसान आलें. लोकांच्या या मनःस्थितीचा उपयोग शिवाजीनें आपल्या कार्याकडे चतुराईने करून घेतला. मुसलमान धर्माशीं शिवाजीचा बिलकूल द्वेष नव्हता. त्याच्या सेवेंत हिंदु व मुसलमान दोनही समाज सारख्याच भावनेनें वागत होते. शिवाजीनें मुसलमानांना कधीं त्रास दिला नाही. परधर्मातील लोकांस आपल्यांत आणण्याची इच्छा हिंदूंना कधी नव्हती. प्रत्येकाला आपापल्या मर्जीप्रमाणे धर्माचरण करण्याची पूर्ण स्वतंत्रता असावी एवढेंच शिवाजीचें म्हणणें होतें. शिवाजीनें औरंगजेबाच्या जुलमाचा निषेध केला, तितकाच गोवें येथील पोर्तुगीझांनी कोंकणपट्टींतील हिंदूंवर केलेल्या अनन्वित छळाचाही प्रतिकार त्यानें केला. गोव्यापासून चौल, वसई, दमणपर्यंतच्या किनाऱ्यावर आज देखील जी पुष्कळशी लोकसंख्या एतद्देशीय क्रिस्त्यांची आढळते ती पोर्तुगीझांनीं बाटविलेल्या हिंदूंची बनलेली आहे. या किनाऱ्यावर क्रिस्ती मंदिरें व त्या धर्माचे अवशेष विपुल दिसून येतात. गोवें येथे पोर्तुगीझांनीं 'इन्क्विझिशन' म्हणून जी धर्मसभा स्थापन केली, तिचा मुख्य व्याप परधर्मी लोकांस बाटवून किंवा त्यांचा भरपूर छळ करून आपल्या क्रिस्ती धर्माचें महत्त्व देशांत वाढवावें हाच होता. या बाबतीत शिवाजीनें या गोंवेकरांस सडकून नरम आणिलें, त्याची वर्णनें तत्कालीन पाश्चात्य लेखकांनीं केलेली भरपूर उपलब्ध आहेत. मुसलमानी कट्टरांचा शिवाजीनें उच्छेद केला तितकाच कर्मठ क्रिस्ती पाद्र्यांचाही केला.

शिवाजीच्या नुसत्या नावावर आपद्ग्रस्त लोकांची सुटका कशी होई त्याची एक मजेदार गोष्ट उपलब्ध आहे. एक इंग्रज गृहस्थ गोव्यास गेला असतां सहजगत्या आपल्या प्रॉटेस्टंट पंथाची महती सांगून त्याने कॅथोलिक पंथाची निंदा केली. त्यावरून तेथील धर्माधिकाऱ्यांनीं त्यास पकडून तीन वर्षें कैदेंत डांबून ठेविलें आणि 'बोललेले

शब्द परत घेऊन क्षमा माग म्हणजे तुला सोडूं ' असा तगादा लाविला. परंतु त्या गृहस्थानें ती गोष्ट साफ नाकारली म्हणून त्याचे त्या पाद्र्यांनीं नानाप्रकारे हाल केले. शेवटीं त्यांनी त्याला असा धाक घातला की ' अमुक दिवशीं आमचा मोठा समारंभ आहे, त्यापूर्वी तुम्ही क्षमेची याचना करून आपले शब्द परत घेतल्याचे लिहून द्या; नाही तर त्या दिवशीं शहरांतील भव्य मंदिरासमोर अग्निकुंड पेटवून त्यांत तुम्हांस जिवंत जाळूं. ' परंतु तो इंग्रज तसा लेख लिहून देईना, उलट त्याने मरणाची तयारी केली. मंदिराजवळ अग्निकुंड पेटलें. लोकाचे थवे हा अपूर्व समारंभ पाहण्यास जमले.

दरम्यान त्या गृहस्थाच्या कित्येक मित्रांनीं त्याची सुटका करण्याचे प्रयत्न चालविले होते. इंग्रज ईस्ट इंडिया कंपनीचे व्यापारी सुरत मुंबई वगैरे ठिकाणी होते त्यांस त्याने आपली करुण कहाणी लिहून कळविली. तेव्हां कंपनीचें एक जहाज कांही थोडे नाविक बरोबर घेऊन गोव्यास आले. पण पोर्तुगीजांच्या लष्करी बंदोबस्तांतून व हजारों लोकांच्या घोळक्यांतून त्या इंग्रज कैद्यास सोडविणें हें काम सोपें नव्हते. जहाजावर फक्त दहा पांच नाविक होते आणि त्यांजपाशी चार दोन बंदुका व तलवारी यांपलीकडे दुसरीं हत्यारे नव्हतीं. अशा अडचणींत शिवाजीच्या केवळ नांवाचा उपयोग करून त्यांनीं त्या आपल्या संकटग्रस्त दोस्ताची सुटका कशी केली पहा.

दहापांच मंडळी जहाजावरून खालीं उतरली आणि गांवांतले कांही दहावीस रिकामटेकडे माणूस बरोबर घेऊन शिवाजीच्या नांवाच्या आरोळ्या ठोकीत ते आवेशाने मंदिराकडे धावत चालले. " शिवाजी फौज घेऊन आला, पळा पळा, आपले जीव वांचवा, " असें मोठ्यानें ओरडत हा दहावीस माणसांचा तांडा रस्त्यानें धूम ठोकीत चाललेला पाहून गोव्यांतील लोकांची भयंकर त्रेधा उडून गेली. जो तो सैरावैरा

पळूं लागला. हां हां म्हणतां ही वार्ता पाद्री धर्माध्यक्ष वगैरे जे दाढीवाले निःशस्त्र धर्मगुरु मंदिरापुढें जमले होते, त्या असंख्य लोकांचे कानावर येऊन आदळल्याबरोबर त्यांची जी गाळण उडाली, तिचें वर्णन करणे अशक्य आहे. 'शिवाजी आला' या दोन शब्दांनींच सर्व काम भागलें. अग्निकुंड जागच्या जागीं राहिले. उपाध्ये व भिक्षु आपापला जीव बचावण्याकरितां धूम ठोकून पळून घरांत जाऊन लपले. इंग्रज खलाशांनीं धावत येऊन त्या कैद्याचे हातपाय बांधले होते ते सोडून त्यास घेऊन परत लगोलग जहाज गांठले. एकदां जहाजावर आल्यावर ते नाबडतोब जहाज चालू करून सहज सुरक्षितपणें आपल्या बंदरांत परत आले. केवळ शिवाजीच्या नांवाचा दरारा त्या वेळीं केवढा बसला होता, याची यावरून कल्पना होते. 'स्वधर्मसंरक्षक' या नांवाची सार्थकता लोकांस शिवाजीनें किती पटविली होती हें यावरून स्पष्ट होतें.

दुसरी एक गोष्ट शिवाजीनें एका इंग्रजाला प्राणांतिक संकटातून कसें सोडविलें त्याची अशीच नमुनेदार आहे. इंग्रज, डच, फ्रेंच इत्यादि हिंदुस्थानांत वावरणाऱ्या अनेक पाश्चात्य लोकांशीं शिवाजीनें ओळखीचें, मित्रत्वाचें व देवघेवीचे नाते जोडलें होते. हातीं घेतलेल्या उद्योगांत केव्हां काय प्रसंग येतो याचा अंदाज नसल्यामुळें, त्यास अशा परस्थांशीं मुद्दाम संधान ठेवून ठिकठिकाणची शत्रुमित्रांच्या हालचालींची बातमी चहूंकडून कसोशीनें आणावी लागे. त्यासाठीं त्याचे वार्ताहर देशभर फिरत असत. आगऱ्यांतून सुटून गेल्यापासून औरंगजेबाची तर शिवाजीवर अत्यंत करडी नजर होती. मात्र स्वतः बादशहाला शिवाजीवर चालून जाण्याची छाती झाली नाहीं. बाकीचे सर्व उपाय त्यानें शिवाजीस पकडण्याचे केले. पुढें शिवाजीनें उघडपणें राज्याभिषेक समारंभ करून स्वतंत्र सिंहासन स्थापिलें, तेणेंकरून बादशहाचा क्रोध कसा अनावर झाला त्याचें वर्णन एक तत्कालीन कवि येणेंप्रमाणें करितो—

**सरित्पतीचें जल मोजवेना ।**
**माध्यान्हिचा भास्कर पाहवेना ।**
**मुष्टींत वैश्वानर बांधवेना ।**
**तैसा शिवाजी मज जिंकवेना ।**

सुरतकर इंग्रजांनीं आपले कांहीं वकील नजराणे देऊन आग्रा येथे बादशहाच्या भेटीस पाठविले. आगऱ्यास मुक्काम असतां त्यांतल्या एका इंग्रजाचे घड्याळ बिघडलें तें दुरुस्त करणारा तेथें कोणी आहे काय याचा तपास करितां, तेथे राहत असलेल्या एका फ्रेंच गृहस्थानें त्याचें तें घड्याळ दुरुस्त करून दिलें, त्यावरून त्यांची ओळख झाली. हा फ्रेंच घड्याळजी आग्रा येथें बादशहाच्या नजरकैदेंत होता. त्यानें आपली करुण कहाणी सहज बोलतांना या इंग्रज गृहस्थास कळविली ती अशी– 'मी आज दहा वर्षें येथे बादशहाच्या कैदेंत आहें. पूर्वी मी पांडिचरी येथें फ्रेंच वसाहतीत असतां व्यापाराच्या कामासाठीं रायगडावर शिवाजीचे भेटीस गेलो, तेव्हांपासून महाराजांची माझी जानपछान सुरू झाली. पुढें स. १६६६ साली शिवाजीमहाराज आगऱ्यास बादशहाचे भेटीस गेले असतां मीही तेथें असून केव्हां केव्हां त्यांचे भेटीस जात असें. आग्रा येथें बादशहानें शिवाजीस अटक केली, तींतून ते कसे निसटून गेले हें तुम्हांस ठाऊकच आहे. पुढें बादशहानें लगेच चौकशी करून पुष्कळांना संशयावरून पकडून कैदेंत घातलें. त्या धामधुमीत बादशहाला माझाही संशय येऊन मला पकडून त्यानें नाना प्रकारें छळ चालविला. त्याला वाटलें कीं मीच शिवाजीला पळून जाण्याला मदत केली. अशीं दहा वर्षें गेलीं. अद्यापि बादशहानें मला आगऱ्यांतून बाहेर जाण्यास मोकळीक दिलेली नाहीं. नुकती कोठें शहरांत फिरण्याची परवानगी मिळाली आहे; तथापि दररोज मला कोतवालाकडे जाऊन हजिरी द्यावी लागते. यांतून परमेश्वर कधी माझी सुटका करील ती खरी.'

त्या फ्रेंच गृहस्थाचें तें भाषण ऐकून या इंग्रजाला त्याची अत्यंत कींव उत्पन्न झाली; आणि कसेंही करून त्याची येथून सुटका करण्याचा विचार त्यानें चालविला. इंग्रज वकिलांचें जे काम बादशहाकडे चालू होतें, त्यांत कित्येक मागील कागद त्यानें पाहण्यास मागितले. ते कागद सुरतेस होते, ते कोणी तरी स्वतः जाऊन आणण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. त्यासाठीं त्या इंग्रजानें सुरतेस जाण्याची परवानगी मिळविली आणि सर्व सिद्धता झाल्यावर एके दिवशीं सायंकाळचे सुमारास तो इंग्रज व तो फ्रेंच गृहस्थ आगऱ्यांतून बाहेर पडले. फ्रेंच गृहस्थानें आपला वेष पालटला; आणि घोड्यांवर बसून ग्वालेर, झांशी, उज्जन या मार्गानें ते प्रवास करीत सुरतेकडे चालले. त्या दिवशी हा फ्रेंच गृहस्थ हजिरीस आला नाहीं, त्याबरोबर तो पळून गेला ही बातमी दुसरेच दिवशीं बादशहास समजली. लगोलग त्याने सुरतच्या मार्गावरील अंमलदारास हुकूम सोडले की एक फ्रेंच व एक इंग्रज असे दोन गृहस्थ पळून जात आहेत, त्यांस असतील तेथें पकडून परत पाठवावे. त्या दोघांनाही वाटेंत हा हुकूम कळला, तेव्हां त्यांची पांचावर धारण बसली आणि पुढें दिवसा प्रवास न करितां ते रात्रीचेच केव्हां घोड्यावर तर केव्हां पालखींत बसून लपत छपत व बादशहाचे अंमलदारांस चुकवीत अत्यंत विवंचनेंत मार्ग कंठूं लागले. अशा प्रकारें ते एके दिवशी उज्जनच्या मुक्कामास येण्यापूर्वी ताजपुरच्या गढीजवळ त्यांस बिकट प्रसंग प्राप्त झाला तो प्रकार असा—

उज्जन–भोपाळ रेल्वेवर हल्ली ताजपुर नांवाचें स्टेशन लागतें, तो प्रदेश अत्यंत डोंगराळ असून वाटा अगदीं निरुंद व अवघड आहेत. ताजपुरच्या गढीवर खोजाबक्ष नांवाचा बादशहाचा अंमलदार या दोघां युरोपियन प्रवाशांस पकडण्यासाठी अगदीं टपून बसला होता. गढीच्या खडकाखालूनच मुख्य वाट असून ती सहज वरील तोफांच्या व बंदुकांच्या माऱ्यांत होती आणि तिजवर खोजाबक्षानें अहोरात्र टेहळणी

ठेवली होती. ताजपुरच्या नाक्यावर आपणास पकडणार अशी बातमी आगाऊच या दोघांस लागल्यामुळे ते अत्यंत भयभीत होत्साते विवंचनेंत पडले होते. खोजाबक्ष हा पूर्वी बादशहाचे नोकरीत कल्याणचे बाजूस कैक वर्षे वागलेला असून, शिवाजीच्या व त्याच्या कित्येक चकमकी झडलेल्या असल्यामुळें ते एकमेकांचे पक्के दुष्मन बनले होते. दक्षिणेंत असतां खोजाबक्षास पकडण्याचे प्रयत्न शिवाजीनें अनेकवार केले, पण ते साधले नाहींत.

ताजपुरच्या आसमंतात ते प्रवासी येतात तोच त्यांस एक वृद्ध ब्राह्मण भिक्षेकरी भेटला आणि त्यांजपुढें हात पसरून 'मी ब्राह्मण तीन दिवसांचा उपाशी आहें, कांहीं तरी भिक्षा घालून मला अन्न द्या ' असे विनवूं लागला. फ्रेंच गृहस्थाला वाटले हा भिक्षेकरी इकडील प्रदेशाचा माहीतगार असावा आणि ब्राह्मण असल्यामुळें बादशहाचा मिंधा नसून कदाचित् हा आपणास एखादी गुप्त वाट दाखवूं शकेल, सबब त्यास वश करण्याच्या हेतूनें त्यानें त्या ब्राह्मणाच्या हातावर दोन मोहरा ठेविल्या. त्याबरोबर त्या ब्राह्मणानें त्या गृहस्थाच्या तोंडाकडे बारिक नजर टाकून म्हटलें,—

**ब्रा०**—कां राव, इकडे कोणीकडे ?

हे शब्द ऐकतांच तो फ्रेंच गृहस्थ चपापल्यासारखा झाला. पण तसे बाहेर न दाखवितां बोलला, " छे बुवा, मी नाहीं तुम्हांस ओळखीत. कोठची बरें तुमची माझी ओळख ! "

**ब्रा०**—अहो असे काय म्हणतां ! तुम्ही रायगडावर शिवाजीच्या भेटीस नव्हतां का आलां ! तिथे मीच तुमच्या बरोबर होतों.

**फ्रें०**—हां आतां ओळखलें. तुम्ही शिवाजीचे हेर. तुमचें नांव वेंकटिराव खरें ना !

**ब्रा०**—बरोबर, मीच तो शिवाजीचा हेर वेंकटिराव.

**फ्रें०**—बरें झालें, तुमची आज येथे अचानक गांठ पडली. पण कां हो, तुम्ही शिवाजीस सोडून कधीं जात नाहीं. जिथें तुम्ही तिथें शिवाजी, असें असतां तुम्ही इकडे या ताजपुरच्या बाजूस कोणीकडे आलां ? खुद्द शिवाजीच इकडे आला आहे कीं काय !

**ब्रा०**—अलबत, हें काय विचारतां ! महाराजांची स्वारी येथे नजीकच तीन चार मजलांवर आहे.

**फ्रें०**—कां बरें, महाराज या बाजूस कसे ! पुनः बादशहाचे भेटीस आगऱ्यास जातात कीं काय ?

**ब्रा०**—नाहीं. पुनः भेट कशास हवी, एकदां झाली तेवढी पुरे. हल्लीं त्यांना इकडे येण्याचे प्रयोजन निराळेंच आहे. वास्तविक ते आतां इकडे यायचे नव्हते. गोवळकोंड्याचे स्वारीस ते निघाले असून लवाजमा सर्व तिकडे चालू झाला आहे. इतक्यांत एक निकडीचें प्रकरण उद्भवलें. महाराजांचा एक विश्वासू नोकर जवळचा आप्त होता, त्यास खोजाबक्षानें ठार मारिलें, तेव्हां त्याची आई रडत महाराजांकडे येऊन म्हणाली, या उन्मत्त खोजाबक्षाचा प्रथम चांगला समाचार घ्या आणि मग दुसरीकडे कोठे जाणें तिकडे जा, तरच तुमची ती स्वारी फत्ते होईल. नाहीं तर मी तुम्हांस पुढें पाऊल टाकूं देणार नाहीं. बाई निकरावर आली. पुत्रवत्सल मातेचा शब्द त्यांच्यानें मोडवेना. त्यांनीं लगेच आपल्या कामगारांस फर्माविलें, 'मी असाच ताजपुरावर जाऊन लगोलग परत येतों, तुम्ही पुढें गोवळकोंड्याची वाट चालूं लागा.' असें म्हणून तत्काळ महाराज ताजपुरावर निघाले. मी खोजाबक्षाचा माग काढीत हेराचे कामासाठीं या जंगलांत हिंडत आहें. या गढीवर खोजाबक्ष निर्धास्त आहे. आतां जाऊन महाराजांस भेटून पुढील बेत ठरविणार.

**फ्रें०**—वेंकटिराव, तुम्ही आज आम्हांला देवच भेटलांत हो. काय सांगूं तुम्हाला. आम्ही या क्षणीं त्या दुष्टाचे तावडींतून कसे निभावतों या पंचायतींत आहों. तर महाराज आमचा बचाव करतील अशी कांही युक्ति सांगा. त्यांची आमची गांठ पडूं शकेल काय ?

**ब्रा०**—अलबत, कां नाही पडणार ! पण ताजपुरास पोचण्यापूर्वीच तुम्ही त्यांस गांठले पाहिजे.

**फ्रें०**—पण आम्ही कोठे कसे त्यांस भेटावे हे सांगाल की नाही ?

**ब्रा०**—असे करा. तुमच्याबरोबर ही बरीच मंडळी आहेत त्यांना या मोठ्या हमरस्त्याने जाऊं द्या. तुम्ही दोघे मात्र ही अशी एक समोर बिकट आडवाट जंगलांतून आहे, तिनें सहज जाऊं शकाल. तिकडेच तुम्हांस महाराज भेटतील. मी ही आतां त्यांचेकडेच चाललो. उद्यां बहुधा महाराज या खोजाचें कंदन करतील. बरे येतों, रामराम.

ब्राह्मणानें दाखविलेली ती वाट जरी अडचणीची होती तरी तिजवरच खोजाबक्षाचा पहारा अगदी कडक होता. अंधार पडण्याच्या सुमारास हे दोघे घोड्यावरून चाललेले स्वार पाहतांच त्यांजवर गढीतून बंदुकाचा मारा झाला. खुद्द त्यांस गोळ्या लागल्या नाहीत, पण त्या फ्रेंच गृहस्थाचा घोडा घायाळ होऊन पडला. त्याबरोबर त्या इंग्रज व्यापाऱ्यानें आपला घोडा त्यास देऊन सांगितलें, “ तुम्ही आतां एकदम निसटून शिवाजीकडे जा, मी असाच हलके हलके पायी येतों.”

याप्रमाणें तो फ्रेंच गृहस्थ सुटून गेला, पण त्या इंग्रजाला मात्र गढींतील लोकांनीं धावून येऊन पकडलें आणि खोजाबक्षासमोर आणिलें. खोजानें त्याला मारहाण करून त्याची हकीकत विचारली, पण तो कांहींच सांगेना, तेव्हां तसाच त्यास उपाशीं एका भुयारांत त्यानें कोंडून ठेविलें आणि धाक घातला, कीं उद्यांपर्यंत सर्व हकीकत न

सांगितल्यास तुमचा कडेलोट करूं. अशा विवंचनेत त्या इंग्रजानें ती रात्र अत्यंत कष्टांत काढली.

इकडे तो फ्रेंच गृहस्थ घोड्यावर बसून निघून गेला, तो तसाच जाऊन महाराजांस भेटला. पहांटेच्या अंधारांत महाराज बरोबरचे दोनतीनशें निवडक स्वार घेऊन गढीवर चालून आले. तेथील बंदोबस्त यथातथाच असून शिवाजी इकडे येईल अशी कल्पनाही नसल्यामुळें ते अगदी बेसावध होते. अकस्मात् खोजाबक्षावर झडप घालून त्यास मराठ्यांनीं ठार मारिलें. तो फ्रेंच गृहस्थ बरोबर होताच. त्यानें तपास काढून आपल्या इंग्रज सोबत्याला भुयारांतून बाहेर आणिलें. महाराजांनीं तें खोजाबक्षाचें शीर बादशहाकडे नजर पाठविलें आणि स्वतःचे स्वार बंदोबस्तास देऊन त्या दोघां युरोपियनांची रवानगी सुरतेस केली. थोड्याच अवकाशांत ते सुरतेस पोंचून तेथून पुढें कांहीं कालानें ते स्वदेशीं युरोपास गेले आणि मग त्यांनी आपल्या हकीकती लिहून जगजाहीर केल्या.

या हकीकती नवीन आहेत, त्यांस मराठी कागदपत्रांचा आधार नाहीं. तथापि संकलित अर्थानें त्या प्रमाण मानण्यास प्रत्यवाय नाहीं. शिवाजीमहाराजांचा सर्वच जीवनक्रम इतका चमत्कृतिपूर्ण आहे, कीं कांहीं थोड्या ठोकळ प्रकरणांपलीकडे त्यांच्या नानाविध हालचाली आपणास बहुधा अज्ञात आहेत. ताजपुर नर्मदेच्या उत्तरेस आहे. इतक्या लांबीवर शिवाजी त्या धांदलींत आला असेल कीं नाहीं अशी शंका येणें साहजिक आहे. कदाचित् महाराज प्रत्यक्ष नसले आले, तरी त्यांचा एखादा सरदार त्या कामगिरीवर आला असेल. महाराजांचें नांव धारण करून त्यांचे अनेक साथीदार देशभर संचार करून अनेक पराक्रम करीत हें सुप्रसिद्ध आहे. तेव्हां ताजपुरच्या या प्रसंगांत अशक्य असें कांहीं नाहीं. इतकेंच नव्हे, तर अशा बाह्य हकीकतींवरून महाराजांच्या एकंदर उद्योगाची आज आपणांस कल्पना करितां येते.

शिवाजीमहाराज अत्यंत दक्ष होते, त्यांची दृष्टि सर्व बाजूंस फिरत होती, त्यांच्या विश्वासू हेरांचा संचार सदैव चहूंकडे चालू असे. आगाऊ संपूर्ण माहिती मिळवून अकस्मात् शत्रूवर घाला घालण्यांत महाराजांचें नैपुण्य अनुपम होतें. महाराज गरीबांचे कनवाळू आणि बायाबापड्यांचें भलें करण्यासाठीं स्वत: संकटांत उडी घेण्यास सदैव उत्सुक असत. हे प्रकार आपणास या वरील गोष्टींत कळून येतात. त्यांच्या पराक्रमाची वार्ता देशभर कशी पसरली होती हेंही यांत दिसून येतें. महाराजांचें एकंदर जीवन किती लोकोत्तर होतें याची खात्री झाल्यामुळें आपला त्यांजबद्दलचा आदर द्विगुणित होतो.

# ५

# प्रायश्चित्तानें नवा जन्म



**स एव शिवसेनानीर्नेता नाम प्रतापवान्**
**योत्स्यते भृशमस्माभिरभिमानभृतां वरः ॥**

शि. भा. २४-३२

नेताजी पालकराचें नांव शिवाजीमहाराजांचा एकनिष्ठ सेवक म्हणून मराठी इतिहासांत प्रसिद्ध आहे. महाराजांनीं बालमित्र जमवून स्वराज्याचा उद्योग चालू केला, त्या वेळेपासून नेताजी त्यांजबरोबर होता. धाडस, कल्पना, हूल दाखवून शत्रूस गोत्यांत आणण्याची कला हे त्याचे गुण राष्ट्रसंवर्धनाचे कार्यांत विशेष उपयोगास आले. महाराजांच्या आरंभाच्या हालचालींत तो केवळ त्यांचा उजवा हात बनला होता. अष्ट प्रधानांच्या नेमणुका एकेक होऊं लागल्या, त्यांत महाराजांनीं नेताजीस पहिला सरनोबत नेमिलें. अफझलखान प्रकरण, शायिस्ताखानावरील छापा, पुरंदरचें युद्ध इत्यादि प्रकरणांत नेताजी महाराजांबरोबर होता. पण एकदां दोघांचा बेबनाव होऊन तो महाराजांची नोकरी सोडून गेला तो प्रकार असा—

पन्हाळ्यावर युद्ध चाललें असतां एके दिवशीं रात्रीं महाराज गडावरचे पहारे बरोबर जागून कामें करताहेत कीं नाहीं हें पाहण्यास गेले. एक असामी त्यांस गैरहजर दिसला. दुसऱ्या दिवशीं महाराजांनीं त्याची एक महिन्याची गैरहजिरी मांडावी असा हुकूम केला. हा इसम नेताजीचा मेहुणा होता. नेताजीला कळतांच त्यानें महाराजांस

भेटून विनंती केली, आमचे मेहुण्याचा एवढा गुन्हा माफ करावा. महाराज म्हणाले, 'नेताजी, आमचा हुकूम फिरणार नाहीं. वास्तविक अशा गुन्ह्यास याहून जास्तच कडक शिक्षा देणे योग्य झालें असतें.' नेताजीने पुष्कळ रदबदली केली, पण ती महाराजांनीं मानली नाही. तेव्हां नेताजी म्हणाला, 'जिथे आमच्या शब्दास एवढाही मान नाही, त्या धन्याची नोकरी आम्हीं काय म्हणून करावी! हाच आमचा रामराम.' असें म्हणून नेताजी चालता झाला. महाराजांनींही त्याची परवा ठेविली नाहीं. 'अभिमानभृतां वरः' म्हणजे नेताजी मोठा मानी होता असें परमानंद सांगतो.

महाराजांवर ह्या वेळीं मोठा कठिण प्रसंग आला होता. मीर्झा राजा जयसिग व दिलेरखान चालून आले. त्यांनीं महाराजांचा प्रदेश व किल्ले काबीज केले. महाराज त्यांस शरण गेले आणि बादशहाचे भेटीस आगऱ्यास जाण्यास सिद्ध झाले. लगेच जयसिगानें विजापुरावर मोर्चा वळविला. उघड युद्ध सुरू होऊन विजापुरच्या सुलतानाची तारांबळ उडाली. इतक्यांत त्याला कळलें कीं नेताजी शिवाजीवर रुष्ट होऊन दुसरा धनी पाहत आहे. विजापुरकरांनीं लगेच त्यास भलें मोठें बक्षीस देऊन आपल्या पदरीं घेतलें. नेताजीनें विजापुरचा बचाव अशा चातुर्यानें केला, कीं नेताजी म्हणजे प्रतिशिवाजी, तो ज्या पक्षांत आहे त्याजवर युद्ध करून आपला निभाव लागणार नाहीं अशी जयसिंगाची खात्री झाली.

अशा स्थितींत जयसिगानें आपले दूत नेताजीकडे पाठवून त्यास कळविलें, तुम्ही मोगलांचे नोकरींत या, म्हणजे आमच्यासारखीच तुमची बडेजाव बादशहा करतील. ती विनंती मान्य करून नेताजी जयसिगास भेटला. बादशहानें त्यास मोठें बक्षीस व पंच हजारी मनसब करून जयसिंगाचे हाताखालीं नेमिलें. दक्षिणदेश जिंकायचा तर शिवाजीच्याच तोडीचा गनिमी कावा खेळणारा सेनानी जवळ असल्याशिवाय आपला

उद्योग सिद्धीस जाणार नाही असा विचार करूनच बादशहा व जयसिंग यांनीं मुद्दाम नेताजीस जवळ आणिलें. उभयतांस मोठा आनंद झाला.

इकडे शिवाजीमहाराज बादशहाचे भेटीस गेले, तेव्हां उभयतांचा बेबनाव होऊन अटकेंत पडल्यावर मोठ्या शिताफीनें महाराज जेव्हां कैदेंतून निसटून गेले, तेव्हां बादशहाचे डोक्यांत नवीनच कल्पना आली, कीं शिवाजी काय किंवा नेताजी काय, या गुलामांनी हा कपटनाटकाचा प्रयोग मुद्दाम आम्हांस गोत्यांत आणण्यासाठीं चालविला आहे. यांजवर क्षणभर सुद्धां विश्वास ठेवणें घातक होय. असें मनांत येऊन बादशहानें जयसिंगास निकडीचा हुकूम पाठविला कीं तुमचे जवळ नेताजी पालकर आहे त्यास ताबडतोब आमचेकडे पाठवा; आम्हांस त्याची अत्यंत जरूर आहे. त्यास चांगली लालूच दाखवून रवाना करा, बिथरूं देऊं नका. हुकमाप्रमाणें जयसिंगानें नेताजीस बादशहाकडे रवाना केलें. दिल्लीस दाखल होतांच बादशहानें त्यास सक्त कैद दाखवून शिवाजीचा पत्ता लावून दे अशी निकड चालविली. बादशहाला जयसिंगाचाही वहीम आला. जयसिंग, त्याचा पुत्र रामसिंग, कवीन्द्र परमानंद हे सर्व अंतस्थपणें शिवाजीचे साथीदार आहेत असें त्याच्या मनाने घेतले. जयसिंगास तर त्यानें नोकरींतून दूर केलें. लवकरच तो मरण पावला आणि यातनांतून सुटला.

नेताजी दिल्लीस पोंचतो तों अफगाणिस्तानांत बंडावा माजला तो मोडण्यासाठीं बादशहाने महाबतखानास रवाना केलें. पहाडी युद्धांत निष्णात असा कोणी कल्पक इसम महाबतखानास पाहिजे होता. म्हणून बादशहाने नेताजीस विचारले, " तुम्ही मुसलमानी धर्म स्वीकारा, म्हणजे तुम्हांस मोठी मनसब देऊन अफगाणिस्तानांत पाठवूं, नाही तर आजच येथे कडक शासन करूं." काय करतो बिचारा नेताजी ! जीव सर्वांसच प्यारा आहे. त्यानें बादशहाची सूचना मान्य केली आणि मुसलमानी दीक्षा घेतली. बादशहानें त्याचें नांव महंमद कुलीखान असें

ठेविलें. एका मुसलमान स्त्रीशीं त्याचा विवाह केला आणि मोठ्या सन्मानानें अफगाण युद्धावर रवाना केलें. §

आठ वर्षे अफगाणिस्तानांत खपून नेताजीनें मोठा लौकिक मिळविला. त्यामुळें बादशहाची त्याजवर बहाल मर्जी झाली. दरम्यान दक्षिणेंत शिवाजीमहाराजांनी मोगलांशी प्रचंड युद्धें खेळून आपले राज्य स्वतंत्र बनविलें आणि यथाविधि राज्याभिषेक करवून 'गोब्राह्मण प्रतिपालक सिंहासनाधीश्वर महाराज छत्रपति' असा आपल्या नांवाचा जाहीर पुरस्कार केला. हें वर्तमान जेव्हां बादशहास कळलें तेव्हां त्याच्या मनाचा संताप केवढा झाला असेल याची कल्पनाच केली पाहिजे.

नंतर सुमारें दोन वर्षें गेलीं. महाराज दक्षिण दिग्विजयाची तयारी करीत असून त्यासाठीं विजापुरावर शह बसवीत होते. इकडे बादशहानेंही आपला सेनापति बहादूरखान यास विजापुरचें राज्य जिंकण्यास रवाना केलें, तेव्हां विजापुरकरांची तारांबळ उडून कठिण प्रसंग जाणून त्यांनीं शिवाजीचें साह्य मागितलें. शिवाजी त्या वेळीं पन्हाळ्याचे बाजूस होता. एके दिवशीं सकाळीं त्याचे भेटीस एकदम एक अपरिचित मुसलमान गृहस्थ आला, त्याचें व महाराजांचें खालीलप्रमाणें संभाषण झालें—

**शि०**—कोण तुम्ही? तुमचें नांव काय? कां आलां आहांत?

**म०**—मी एक औरंगजेब बादशहाचा दूत आहें. माझें नांव महंमद कुलीखान. आपलें नांव ऐकून पदरीं नोकरी मागण्यास आलों आहें.

**शि०**—तुमचा आवाज ओळखीचा दिसतो. पूर्वी आपण कधीं भेटलों होतों काय?

**म०**—आहे थोडीशी पूर्वीची ओळख. अपराध माफ होईल तर सांगतो.

§ एल्यट व डासन याचे ग्रंथात हा प्रकार वर्णिला असून तो स.१६६७ च्या फेब्रुवारींतला आहे.

**शि०**—नेताजी पालकरासारखे तुम्ही दिसतां, पण हें मुसलमानी नांव व वेष, ही लांब दाढी, हें काय गूढ ?

**म०**—( गहिंवरानें महाराजांचे पाय धरून ) तोच मी महाराज आपला नेताजी. मूर्खपणा करून या पायांस अंतरलों, त्यामुळें फार कष्ट भोगले, अत्यंत पश्चात्ताप झाला, अशा स्थितींत तारतील तर हेच पाय तारतील असा निश्चय करून दर्शनास आलों. दर्शन झाल्यानें आतां केवढें समाधान वाटतें म्हणून सांगूं.

**शि०**—थोडी बहुत वेडीवाकडी बातमी तुमच्या संबंधानें आमच्या कानांवर आली होती, पण खरा प्रकार कसा समजणार ! अफगाणिस्तानांत होतां ना तुम्ही ?

येथे नेताजीनें महाराजांवर रुसवा करून गेल्यानंतरची आपली कहाणी सांगितली, तेव्हां त्यांनी विचारलें, ' मग तुम्ही असे एकटेच इकडे कसे येऊं शकलां ? '

**ने०**—आपण राज्याभिषेक केल्याचें ऐकून बादशहाचें मन अत्यंत अस्वस्थ झालें. त्यांनीं दिलीरखानास जवळ बोलावून पुष्कळ विचार केला. खानानें त्यांस कळविलें, शिवाजीसारखाच दक्षिण प्रदेशाची भरपूर माहिती असलेला कोणी तरी विश्वासु सेनानी हाताशी असेल तरच शिवाजीला जिकतां येईल. त्यावरून बादशहांना या महंमदकुलीचें स्मरण होऊन त्यांनीं मला जवळ बोलावून विचारलें, ' खान, तुम्ही आतां सर्वस्वीं आमचे प्यार आहां; जर शिवाजीमहाराजांस पकडून आणण्याचा आमचा मनोरथ सिद्धीस न्याल तर मागाल तें बक्षीस देऊं. ' त्यावर मी विनंती केली, ' हजरत, मजवर आपला भरंवसा असेल तर मागतों तें साहित्य द्या म्हणजे मी आपली कामगिरी मनाजोगती करून दाखवितों.' लगेच बादशहांनीं दिलीरखानास बोलावून आम्हांस जरूर तें सर्व सामान देऊन दक्षिणेंत रवाना केलें. दिलीरखानाबरोबर आम्ही मोठ्या तयारीनें चालून आलों. तो बहादुरखान पेंडीचें गुरूं, नालायक ठरून परत गेला.

आतां सर्व मुखत्यारी दिलीरखानाकडे आहे. येथून जवळच आज खानाचा मुक्काम आहे.

**शि०**—एकूण आज तुम्ही आम्हांस पकडून खानाचे हवालीं करणार तर!

**ने०**—आपल्यासारख्या थोर विभूतीला अपाय करण्याची ताकद कोणा मानवाची आहे! प्रत्यक्ष बादशहा देखील आपलें नांव ऐकून कांपूं लागतो, मग माझी काय प्राज्ञा!

**शि०**—मग तुम्ही बादशहाचे नोकर आमचे भेटीस कां आलांत?

**ने०**—दिल्लीहून निघाल्यापासून मनास चैन कसें ते बिलकूल नाहीं. महाराजांस पकडून देण्याचा विडा उचलून मी निघालों खरा, पण मन सारखे जिवास खात आहे. शेवटी काल मनाचा निश्चय केला की आतां तारणार मारणार सर्व आपण. हे प्राण आपल्या सेवेस अर्पण केले. काल खानास कळविलें, 'महाराज कोठें कसे आहेत त्याची माहिती काढून आणतों, मग पुढील विचार ठरवूं.' पहांटेच उठून निघालों तो हा आपल्यासमोर आहें. इतःपर हा देह आपला आहे.

**शि०**—शाबास! नेताजी. तुमच्यासारखे राजभक्त आम्हांस लाभतात यावरून आपल्या मराठी राज्याचे भाग्य जोरांत आहे असे आम्हांस वाटतें. पण तुम्ही आतां मुसलमान आम्हां हिंदूंची सेवा कशी करणार!

**ने०**—तीच तर मोठी पंचाईत उभी राहिली आहे. यास उपाय आपणच काय तो काढूं शकाल.

**शि०**—प्रायश्चित्त घेऊन स्वधर्मांत येण्याची खुशी असेल तर तसा प्रयत्न करतां येईल. पण तुमची आतां बायको मुले मुसलमान आहेत ना, त्यांची काय वाट?

**ने०**—त्यांची नको काळजी. ती मंडळी दिल्लींत एका नातेवाइकाकडे आहेत. त्यांचें नांव टाकलें म्हणजे झालें. आतां वय झालें. संसारपाशाही

तुटले आहेत. आपल्या सेवेचें पुण्य पदरीं पडले म्हणजे इहलोकची सर्व कमाई झाली.

असे बोलणें झाल्यावर अल्पावकाशांतच महाराजांनीं शास्त्रीपंडित जमवून नेताजीस प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून घेतलें. 'आषाढ व. ४ शके १५९८ (ता. १९ जून, स. १६७६) राजश्री नेताजी पालकर यांनीं प्रायश्चित्त घेतलें. शुद्ध झाले.' असा लेख जेधे शकावलींत आहे.

नेताजीनें पुढें शिवाजीचे सेवेंत उर्वरित आयुष्य वेचलें. शिवाजीचे पश्चात् त्याने संभाजीची सेवाही मोठ्या निष्ठेने केली. अकबर म्हणून जो औरंगजेबाचा पुत्र बापाविरुद्ध बंड करून संभाजीचे आश्रयास आला, त्याच्या तजविजीसाठीं संभाजीनें नेताजीसच नेमून दिलें. मुसलमानी भाषा, दरबारी रिवाज व जगाचा अनुभव नेताजीस भरपूर असल्यामुळें त्या शहाजाद्याची तैनात सांभाळण्यास त्याच्या इतका दुसरा लायक इसम संभाजीस मिळाला नसता. पुढें लवकरच नेताजी मरण पावला.

६

# भीषण भवितव्यता



**महाराष्ट्रो जनपदः तदानीं तत्समाश्रयात्**
**अन्वर्थतामन्वगमत् समृद्धजनतान्वितः** ॥ शि० भा० १. ०-३२ †

'जया अंगीं मोठेपण, तया यातना कठीण' असें साधुसंत म्हणत आले तें सर्वथा सत्य होय. थोर पुरुषांच्या बाबतींत ही गोष्ट हमेशा प्रत्ययास येते. पराक्रमाचीं कृत्यें करितांनाच त्यांना नाना प्रकारच्या विवंचना ग्रासीत असतात, पण त्यांना मरण देखील सुखाचें येतें असें नाही. थोरामोठ्यांचे अंत विशेष उद्वेगकर झाल्याची उदाहरणे कांहीं थोडी नाहींत. या संबंधांत शिवाजीमहाराजांचा अंतसमय चटकन डोळ्यांपुढे येतो.

महाराष्ट्रांत स्वराज्य निर्माण करितांना त्यांनी वयाच्या बाराव्या वर्षापासून एकसारखे अतोनात कष्ट केले. एका क्षणाची त्यांस उसंत मिळाली नाहीं. विजापूरकर आदीलशहा व दिल्लीकर मोगल या दोन प्रबळ सत्तांशीं त्यांनीं आजन्म झगडा करून प्रतिकूल परिस्थितींतून आपलें कार्य यशस्वी करून दाखविलें, आणि 'सिंहासनाधीश्वर छत्रपति महाराज' असे बिरुद धारण करून यथाविधि राज्याभिषेक समारंभ सिद्धीस नेला. अशा प्रकारें हिंदुपदपातशाहीचा पाया घालून आतां त्यावर इमारत उभी करणार तोंच महाराजांचा आयुष्यतंतु एकाएकीं तुटला. परमेश्वरानें त्यांस भरपूर आयुष्य न देतां तें त्यांचा दुष्मन औरंगजेब यास दिलें, हाही एक योगायोगच म्हटला पाहिजे. त्यामुळें पुढील इतिहासाचा ओघ निराळा बनला.

---

† शिवाजीमहाराजांच्या आश्रयाने या देशाचे महाराष्ट्र नांव सार्थ बनलें. लोक समृद्ध झाले.

समस्त महाराष्ट्राच्या सद्भावना महाराजांच्या पाठीशी उभ्या होत्या, त्यांचा कांहीं एक उपयोग अखेरसमयी झाला नाही. गुडघीच्या विकारानें त्यांचा अंत झाला असें कांही लेखक सांगतात, तें कदाचित् निमित्त कारण असेल, पण अंत:करणांतला मुख्य हृद्रोग निराळा होता. हें नवीन उभारलेलें राज्य आपल्या पश्चात् कोण कसे सांभाळील हीच विवंचना त्यांच्या मनास सारखी खात होती. शेवटच्या वर्ष सहा माहिन्यांत या चिंतेनें ते अत्यंत खंगून गेले. भावी कालच्या निराशेने त्यांचें जीवन दुःसह बनलें. हजारों अडचणींना त्यांनी पायांखालीं तुडविलें, पण घरांतील सांसारिक यातना त्यांना दूर करितां आली नाहीं.

त्यांना दोन पुत्र झाले. वडील संभाजी अनेक गुणांनीं संपन्न व होतकरू होता. शौर्य, सौंदर्य, धाडस इत्यादि त्याचे गुण वडिलांपेक्षांही जास्त होते. लहानपणापासून उत्तम शिक्षण देऊन महाराजांनीं त्याची निगा विशेष दक्षतेनें ठेविली. मोठमोठे पंडित, पुराणिक यांचा व राजकारणी पुरुषांचा भरपूर सहवास संभाजीस मिळाला. प्रत्यक्ष शिवाजीबरोबर तो आगऱ्याच्या कैदेंत होता. त्यानंतर मोठ्या फौजेचें अधिपत्य स्वीकारून तो कांहीं वर्षे औरंगाबादेस मोगल छावणींत राहिला. संस्कृत व हिंदी भाषा त्यास चांगल्या समजत. मग मराठी लेखन हिशेब वगैरेंत तो निष्णात होता हें सांगणें नकोच. बापाचें एवढें उदाहरण सदैव डोळ्यांपुढें असण्याचें भाग्य थोड्याच पुत्रांना लाभलें असेल.

संभाजी वीस एक वर्षांचा झाला, तेव्हां तो थोडाबहुत व्यसनाधीन होऊन त्याचे दुर्वर्तन प्रसंगानुसार दृष्टोत्पत्तीस आल्याने महाराजांच्या अंतःकरणास मोठा धक्का बसला. एक दोनदां स्वत: बोलून त्यास ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न त्यांनीं केला, पण त्याचा उपयोग न होतां उलट मुलाचा उच्छृंखलपणा वाढत चालला आणि लोकांच्या कागाळ्या आल्या, त्यावरून महाराजांनीं त्यास संगमेश्वरच्या बाजूस शृंगारपूरच्या अवघड जागीं बंदोबस्तानें अटकेंत ठेविलें. ही कठोर शिक्षा त्या मानी

संभाजीस अतिशय झोंबली. बायको येसूबाई सदैव जवळ राहून नवऱ्याची काळजी वाही.

मुलाचा असा बंदोबस्त करून महाराज दक्षिण दिग्विजयाच्या उद्योगास सावत्रबंधूच्या समजुतीसाठीं तंजावरकडे गेले. तिकडे सुमारें दीड वर्ष राहिल्यावर परत येऊन पाहतात तों औरंगजेबाचा सरदार दिलीरखान कडेकोट तयारीनें चालून येत असल्याचें वर्तमान त्यांस कळलें. विजापुरचें राज्य देखील जिंकून घेण्याची तयारी खानानें केली. त्या संकटांत आपण येऊन आमचा बचाव करावा अशी विनवणी विजापुरच्या सुलतानाने शिवाजीस कळविली, ती मान्य करून महाराजांनीं मोठ्या फौजा जमविल्या, आणि विजापुराकडे प्रयाण चालविलें. उभयतांनीं मिळून दिलीरखानाचा समाचार घ्यावा अशी मोठी धूर्ततेची योजना महाराजांनीं ठरविली. इतक्यांत एका हेरानें घाबऱ्या घाबऱ्या येऊन त्यांस कळविलें.–

**हेर**—महाराज, वाईट बातमी, काय सांगूं ? मला तोंडानें उच्चारतां सुद्धां येत नाही. घात झाला, घात झाला !

**महा०**—अरे बोल ना लौकर काय ते. उगाच असा घुटमळूं नकोस.

**हेर**—मी हा आतां बहादुरगडाहून धावत आलों. आपले पुत्र संभाजीमहाराज तेथे जाऊन दिलीरखानास सामील झाले आणि ते दोघे आतां मोठ्या निकरानें महाराष्ट्रावर भूपाळगडच्या बाजूनें चालून आले. मला या सगळ्या गोष्टी सांगण्यास सुद्धां अवघड वाटतें.

**महाराज**—अरे, या क्षणी दुःख किंवा भीड कांहीं उपयोगाची नाहीं. जें काय खरें वर्तमान असेल तें इत्थंभूत सर्व मला सांग. ही वेळ पुत्राची गय करण्याची नव्हे. योग्य इलाज ताबडतोब केले नाहींत, तर आजपर्यंत केलेला उद्योग संपला म्हणून समजावे. सांग काय झालें तें बिनदिक्कत.

**हेर**—युवराजांचा तो हुजऱ्या जिवाजी नाही का. तो अक्षी त्यांच्याबरोबर असतो. त्यालाच समक्ष भेटून मी सर्व कांहीं काढून घेतलें. मी

सांगतो यांत तिळमात्र संशय नाहीं. जिवाजीला सुद्धां फार वाईट वाटते. पण बिचारा करील काय! युवराजांच्या जिवास जपणारा तेवढाच एक प्राणी त्याजवळ आहे. बाकी सर्व मुसलमान, त्या खानाचे हस्तक, त्यांचे जाळे सभोवार आहे.

**महा०**—अरे पण संभाजी शृंगारपुरास होता ना! तेथून तो कधीं कसा निसटला?

**हेर**—आपली स्वारी तंजावराकडे गेली नाही का! तेव्हां युवराजांनीं आपले कांही लोक दिलीरखानाकडे पाठविले, त्यांजबरोबर खानाचे कांही लोक रामदासी गोसावी बनून सज्जनगडावर आले. आपला हुकूम तंजावराहून आला. की युवराजांना समर्थांचे सेवेस त्या गडावर पाठवावे, म्हणजे त्यांच्या समागमांत तरी ते कांही निवळले तर!

**महा०**—हो मीच समर्थांना सूचना पाठविली की संभाजीला आपण आपल्या सेवेस लावा, म्हणजे तरी त्याला कांहीं उपरति होईल.

**हेर**—बरोबर. आपली सूचना होतांच समर्थांनीं आपले शिष्य शृंगारपुरास पाठवून युवराजांना आपल्याजवळ आणिले.

**महा०**—मग तेथे त्याच्यांत कांही फरक नाहीं का पडला?

**हेर**—फरक कसचा, उलट त्यांना आपल्या स्थितीची जास्तच खंत वाटूं लागली. प्रत्यक्ष समर्थांची देखील ते भीड ठेवीनासे झाले. समर्थ त्यांस जवळ घेऊन पुष्कळ बोध करीत, पण युवराजांचें मन सदा सतापाने व्यापलेलें. समर्थांचे कांहीं शिष्य भिक्षाटनास जाऊं लागले, त्यांचे मार्फत आपले कांही मुसलमान सेवक युवराजांनीं दिलीरखानाकडे पाठवून बोलणें केले. आंतला सुगावा त्यांनीं कोणास लागूं दिला नाहीं. खान काय विचारतां, एका पायावर तयार. त्याने घोडे माणसें वगैरे साहित्य व पैसा पाठवून सर्व तयारी करून दिली. साताऱ्याचे आसपास सिद्धता होऊन सज्जनगडावर युवराजांस गुप्त इशारा मिळतांच ते तेथून पौष

शु. १० शके १६०० रोजीं जे निसटले ते बहादुरगडाकडे जाऊन खानास भेटले.

**महा०**—त्यांची बायको व मुलगी कोठें आहे, त्यांची खबर काय ?

**हेर**—दुःखांत सुख एवढेंच की पतिनिष्ठ येसूबाईनीं त्यांस क्षणभर सोडलें नाहीं. त्या त्यांजबरोबरच आहेत. या कठिण प्रसंगांत जर कांहीं आशेचा किरण असेल तर तो एवढाच.

**महा०**—मग काय ? खानाने शंभूचा मोठा बडेजाव केला असेल !

**हेर**—बडेजाव काय सांगावा महाराज ? खानाने दोन मोठे सरदार सामोरे पाठवून त्यांस सन्मानाने आपल्यापाशीं आणिलें. खानाचा मुक्काम करकंब येथे होता. संभाजीस आणून खानानें त्यांचा दरबारांत मोठा सत्कार केला. सप्तहजारी मनसब त्यास देण्याची शिफारस खानानें बादशहाकडे केली आहे. आतां आपण मराठ्यांचा लगोलग पाडाव करणार, त्यांचा मोहराच आपल्या हातीं आला अशी आनंदाची घमेंड त्यास झाली आहे. प्रथम विजापुरावर चालून जाऊन मग मराठ्यांवर चाल करावी असा त्यांचा रोख दिसतो.

**महा०**—बरें ! पण हल्ली त्यांचा मुक्काम कोठे आहे आणि उद्योग काय चालला आहे ?

**हेर**—करकंब येथे दोन चार दिवस खानाची व संभाजीमहाराजांची पुष्कळ वाटाघाट झाली. आपल्या सर्व गुप्त गोष्टी युवराजांनीं खानास कळविल्या. कोणकोणत्या किल्ल्यावर द्रव्याचा ठेवा कसा किती आहे, कोठचा बंदोबस्त ढिला आहे, कोणा सरदारांचे कबिले किल्ल्यांवर आहेत, अशी झाडून सारी माहिती खानाने युवराजांकडून मिळविली. भूपाळगडावर मोठमोठ्यांचे कबिले व गुप्त द्रव्य आहे तें हस्तगत करण्यासाठीं प्रथम त्यांनीं त्याच गडावर चाल केली.

**महा०**—पण भूपाळगडावर त्यांची डाळ काय शिजणार ! फिरंगोजी नरसाळा आहे ना तेथें आमचा इतबारी किल्लेदार !

**हेर**—काय सांगावें महाराज ! फिरंगोजींनीं कसून शिपाइगिरी चालविली. पण समोर संभाजीमहाराज उभे आहेत असें पाहतांच त्यांनीं आपला हात आवरला. ज्या धन्याचें अन्न खाल्लें त्याजवर गोळा टाकण्याचें पातक कोण करील? फिरंगोजींनीं खानास शरण जाऊन बेधडक किल्ला त्याचे स्वाधीन केला.

**महा०**—काय सांगतां काय हें ! भूपाळगड गेला म्हणतां? मोठा घात झाला. अगणित संपत्ति त्या गडावर मीं गुप्त ठेविली होती. मोठमोठ्या घरंदाज मंडळींचीं बायकामुलें तेथें सुरक्षित म्हणून मींच मुद्दाम ठेवलीं होतीं. हर हर काय हा प्रसंग ! हे मुसलमान आतां या निराश्रित बायकांस बाटवून आपल्या घरांत घालतील आणि त्यांचे शिव्याशाप माझ्या माथी. हिंदु धर्माचें रक्षण करण्याची प्रौढी मी बाळगतों आणि प्रत्यक्ष माझ्या पुत्राने मला अशी काळोखी लावावी, मग मी जगून तरी उपयोग काय? त्या फिरंगोजीला काय वेड लागलें? संभाजीवरच गोळा टाकून हा कांटा त्यानें कां नाहीं कायमचा काढून दिला ! संभाजी मेला असता तरी मला संतोषच वाटला असता. बस्स फिरंगोजीलाच मी शिक्षा करणार. राज्य करणाऱ्याला ही दयामाया कांहीं कामाची नाहीं. बरें मग !

**हेर**—हल्लीं खान व संभाजी विजापुरास आहेत असें ऐकतों. अशीही बातमी आहे कीं संभाजीस तावडतोब आमच्याकडे दिल्लीस पाठवून द्या असा गुप्त हुकूम बादशहाकडून खानास आला आहे. खान बाहेरून युवराजांस पुष्कळ गोंजारतात, पण आंतला कावा कोणीं सांगावा ! युवराज तर भोळे सांब. आंत बाहेर कपट चाललेलें त्यांस उमगतच नाहीं. बादशहा तरी पक्का वस्ताद आहे. त्यास वाटत असेल की महाराजांचे हे चिरंजीव त्यांच्याच सारखे धूर्त व आंतल्या गांठीचे असून

मुद्दामच आपण त्यांस हें फितुरीचें सोंग घेऊन खानाकडे पाठविलें असेल. खानावर देखील त्या बादशहांचा विश्वास बिलकूल दिसत नाही. आंत काय चाललें असेल कोणास ठाऊक ?

**महा०**—पण तुम्ही याचा इलाज हल्ली काय चालविला आहे ?

**हंर**—आमची टेहळणी युवराजांवर सारखी आहे. बादशहा कसा घात करील, याची त्यांस प्रतीति आणून देण्याचा उद्योग आम्ही भरपूर चालविला आहे. वडिलांकडे परत जाऊन पायां पडून माफी मागण्यांत कांही एक लांछन नाही, अशी त्यांची समजूत घालण्याची खटपट आम्ही चालविली आहे. पण सर्व प्रकार आपल्या कानांवर घालण्यासाठीं मी मुद्दाम आपल्याकडे आलो. आपली आज्ञा होतांच मी परत त्याच कामावर जाणार. प्रसंग तर येऊं नये तो आला. आता युक्तीनें तो निभावणें यांतच आपला तरणोपाय.

**महा०**—शाबास. तुम्ही सर्व कांहीं योग्य तेच करीत आहांत. मी हा विजापुरावरच निघालों आहें. या वेळी विजापुरचा बचाव करण्यांत आपला निभाव आहे. तुम्ही कसेंहि करून संभाजीस फुसलावून खानाचे छावणींतून बाहेर काढून आमच्याकडे घेऊन या. जा आतां बिलकूल विलंब करूं नका !

बादशहाच्या हुकूमाप्रमाणे संभाजीला पकडून दिल्लीस पाठविण्याचा घाट दिलीरखान रचूं लागला असतांच, शिवाजीची मंडळी त्यास सोडवून परत आणण्याची खटपट करूं लागली. शिवाजीची फौज विजापुरावर होती, तिनें विजापुरच्या बचावाची शिकस्त करून दिलीरखानास तेथून हुसकून दिलें. तेव्हां पन्हाळा काबीज करण्याच्या इराद्यानें खान व संभाजी पश्चिमकडे वळले. वाटेंत त्यांचा मुक्काम तिकोट्यावर झाला. या ठिकाणीं चहूंकडचे श्रीमान् सावकार आपलें वित्त घेऊन गुप्तपणें राहिले होते, त्यांजवर ही मुसलमानांची धाड अकस्मात् येऊन कोसळली. त्यांनीं शेंकडों लोकांची कत्तल केली. स्त्रियांनी अब्रू बचावण्यासाठीं मुलांबाळांसह

विहिरींत जीव दिले. दिलीरखानानें हजारों लोक पकडून कैद केले. त्यांसह खानाची स्वारी तेथून अथणीवर आली. तेथील हिंदूंस पकडून प्रत्येकापासून भला मोठा दंड त्यांस सोडण्यासाठीं घेण्याचा उपक्रम खानाने चालविला. भर रस्त्यांत मुसलमान गोवध करूं लागले. खानाच्या छावणीत संभाजी आहे ही बातमी लोकांस कळून त्यांनी त्यांची विनवणी केली, 'आपण शिवाजीमहाराजांचे पुत्र; आम्हां हिंदूंवर हा कहर चाललेला आपणांस कसा पाहवतो!' या गोष्टी ऐकून संभाजीचे मन विटले. त्याने जाऊन खानाची चांगली खरडपट्टी काढिली, ती तो थोडाच ऐकून घेणार! त्यानें उत्तर केले, 'तुम्हांस या बाबतींत ढवळाढवळ करण्याची बिलकूल गरज नाहीं. आम्हीं पाहिजे तें करण्यास मुखत्यार आहो. तुमचा खर्च आम्हांस चालवावा लागतो. शिवाय फौजेला पगार पोचला पाहिजे. मग पैसा कोठून आणावा!'

अशा प्रकारे उभयतांची खूब बाचाबाची झाली. खानाचा पहिला नूर साफ पालटून गेला आणि हा आतां आपणांस पकडून बादशहाकडे रवाना करणार अशी संभाजीस कुणकूण लागली. अपमान सहन करण्याचा संभाजीचा स्वभावच नव्हता. त्याने मनाशी ठरविलें कीं खानाच्या कचाट्यांतून निसटल्याशिवाय आतां गत्यंतर नाहीं. आजूबाजूस शिवाजीचे लोक फिरकत होते, त्यांची बातमी ठेवून आणि येसूबाईला पुरुषाचा वेष देऊन कांहीं अल्पसेवकांनिशीं संभाजीनें मोगलांचा सहवास सोडला आणि लांब दौडी मारीत पन्हाळ्याचा किल्ला गांठला. तो दिवस ४ डिसेंबर, स. १६७९ होय.

पुत्र आल्याची बातमी महाराजांस रायगडावर कळून ते लगोलग सडे पन्हाळ्यावर गेले. तेथें एक महिना पावेतों त्यांनी व त्यांच्या सेवकांनी परोपरी संभाजीची समजूत घालण्याचा शक्य तो प्रयत्न केला. शेकडो माणसें कामास लावून त्यांनीं आपल्या एकंदर कमाईची मोजदाद केली.

किल्ले, तोफा, दारूगोळा, धान्य, कापड जवाहीर अशा तमाम सामानाच्या याद्या करून एक पुरुष आपल्या हयातींत काय कमाई करूं शकतो, याचा प्रत्यक्ष दाखला महाराजांनीं पुत्रास समजाविला. पण त्या व्यसनासक्त तरुणाच्या मनास उपतिष्ठा कशी ती बिलकूल झाली नाहीं. स्वभाव बहुधा उपदेशानें कधी सुधारत नाही.

महाराजांच्या मनास मोठा धक्का बसला. त्यांस अत्यंत अशक्तता प्राप्त झाली. जीर्णज्वर येऊन क्षुधा गेली. त्यांनीं अन्नपाणी सोडले. आभाळ फाटल्यासारखें होऊन ते मोठ्या आस्थेनें पन्हाळ्यावरून श्रीसमर्थांच्या भेटीस सज्जनगडावर गेले. तेथें त्यांनीं एक महिना वास केला. मनांतली वांछा एकच कीं समर्थांनीं आपला हा हृद्रोग दूर करावा. समर्थांचें अंतःकरण महाराजांची ही अवस्था पाहून अत्यंत विव्हळ झाले. महाराष्ट्राचे आनंदवनभुवन बनविणारा, दिगंतकीर्ति करणारा हा थोर पुरुष अशा विपन्न स्थितीस पोंचलेला पाहून कोणाचें अंतःकरण द्रवणार नाही ! पण हीं सांसारिक दुःखें दूर करण्याचें सामर्थ्य कोणा मानवांत आहे ! समर्थ झाले म्हणून ते तरी या प्रसंगास काय तोड काढणार ! महाराज बेहोष झाले. गुरुशिष्यांची अवस्था समसमान झाली. उभयतांसही पुढील **भीषण भवितव्य** कळून चुकले.

पुढें राज्यभार कोण संभाळणार हीच काय ती उभयतांची विवंचना. समर्थांनीं इहलोकचा वेदान्त महाराजांस परोपरीनें समजाविला, पण मुख्य प्रश्नाची तोड म्हणून निघेना. संभाजीचा उपद्व्याप जगजाहीर होताच. दुसरा पुत्र राजाराम केवळ दहा वर्षांचा. त्याची मातुश्री सोयराबाई विशेष कजाख. घरांत सर्वांस आळा घालील असें दुसरें माणूस नाहीं. प्रधान, सेनानायक, सेवक लोक मोठीं कामें केलेले पुष्कळ होते, पण सर्वांस धाकांत वागवून कारभार हांकणारा कोणी नाहीं. गुरुशिष्यांनीं पुष्कळ भवति न भवति केली. तो मनु कांहीं हल्लीच्या लोकशाहीचा नव्हता. नाहीं तर सज्जनगडावरच सर्व मंत्रिमंडळ जमवून पुढील व्यवस्था

कांही तरी ठरवितां आली असती. शेवटी सद्गदित अंतःकरणानें समर्थांनीं महाराजांस स्वगृहीं जाण्यास निरोप दिला. त्या वेळच्या त्या करुण देखाव्याचें चित्र कोण काढूं शकेल ?

त्यानतर बरोबर साठाव्या दिवशीं चैत्र शु. १५, शनिवार, ता. ३ एप्रिल, स. १६८० रोजी रायगडावर महाराजांचें देहावसान झालें. या साठ दिवसांत त्यांचें दुखणें दिवसेंदिवस बळावत गेले. राजारामास गादी देण्याविषयीं सोयराबाईचे प्रयत्न चालू झाले, त्यामुळें महाराजांस कांहीं सुचेनासें झालें. एखादी व्यवस्था पुढील कारभाराची मनांत निश्चित करून त्यानीं जाहीर केली नाहीं. बहुतेक प्रधान व अमलदार बाहेर आपापल्या कामांवर होते. महाराजाच्या प्रकृतीचें मान फारसें कोणास माहीत नव्हते. इतक्यांत त्यांना गुडघीचा विकार झाला तेव्हां आपला अंतसमय आला याची जाणीव महाराजांना झाली. आपण आतां या दुखण्यांतून उठत नाहीं अशी खात्री वाटून त्यांनी एकंदर व्यवहारांची निरवानिरव सुचली तितकी केली, आणि राज्यसंरक्षण करण्याविषयीं जवळच्या मंडळींस कळकळीनें बजाविलें. शेवटीं परमेश्वर स्मरण करून त्यांनीं कृतार्थ अंतःकरणाने मर्त्यदेह सोडून दिला.

हा मृत्यु एका प्रकारे अत्यंत शोचनीय वाटतो. अकबर, औरंगजेब, नेपोलियन इत्यादि पुरुषांचे अंत असेच शोचनीय झालेले मनापुढें उभे राहतात आणि ईशेच्छेवर भार टाकून मनाचें सांत्वन करणें एवढेंच आपणा मानवांचें कर्तव्य उरतें. मात्र ‘ तनू त्यागितां कीर्ति मागें उरावी ’ हा उपदेश शिवाजीप्रमाणें फारच थोड्यांनी पाळलेला अनुभवास येतो.

# ७

# भग्न मनोरथ



**यथा श्रीमत्पूज्यमहाराजैरयमेव यवनाधमो दिल्लीश्वरः कृतः यशोगृहीतं तथैव श्रीमद्भिरपि अकबरसाहाय्येन यशो ग्राह्यं ॥**

अर्थ—संभाजी रामसिंगास लिहितो, " ज्याप्रमाणें आपले पूज्य वडील महाराजा जयसिह यानीं या यवनाधम औरंगजेबाला दिल्लीश्वर बनविण्याचे यश संपादिले, त्याचप्रमाणें आपण देखील या अकबराचे साह्य करून यश संपादन करावे. वडिलांनी केलें तेंच आपण करा."

जगाच्या व्यवहारांत एक गोष्ट स्पष्ट दिसते की यशासारखा त्राता नाही व अपयशासारखा मारता नाही. पहिल्याचें उदाहरण शिवाजी-महाराज व दुसऱ्याचें त्याचेच पुत्र संभाजी. अपयश आल्यामुळें संभाजीचें नांव इतिहासांत इतके हीन बनले आहे कीं त्यांचे अंगीं कित्येक चांगले गुण होते हें सांगितलें तर कोणास खरे देखील वाटणार नाहीं. संभाजीला संस्कृत भाषा चांगली येत होती. त्या भाषेंत त्यांनी काव्ये केलेलीं असून सुंदर राजकारणी पत्रेंही त्यांनीं लिहिलेलीं आहेत. त्यांनीं अनेक प्रसंगांत अप्रतिम शौर्य प्रगट करून खुष्कीवर व समुद्रावर पराक्रम गाजविले. त्यांनीं लिहिलेलीं कित्येक संस्कृत पत्रें जयपुर संस्थानच्या दप्तरांत अलीकडे सांपडलीं असून मासला म्हणून एकाचें मराठी रूपान्तर पुढें देतों. संस्कृत भाषा सहज कोणास समजत नसल्या-मुळे मुद्दाम औरंगजेबास पदच्युत करण्याचें गुप्त कारस्थान संभाजीनें या पत्रांत महाराजा रामसिहास कळाविलें आहे.

'राजमान महाराज श्रीरामसिंहवर्म महाशयांप्रति स्नेहाभिलापी श्रीशंभुराजवर्म नृपतीचीं खास वचनें निवेदन करून विशेष लिहिण्यांत येतें ऐसाजे, इकडील कुशल जाणून आपलेकडील कुशल कळवावें. आपण पूर्वी लिहिलें ते आमच्या ध्यानांत आहे, कीं दिल्लींद्रांशीं विरोध करू नये, उलट त्यांचें महत्त्व पालन करावें. तदुत्तर सुलतान अकबर इकडे आले. मागाहून बादशहाही आले. त्यांजबरोबर आपले पुत्र कृष्णसिंह होते.

कृष्णसिंहांनीं अकबर सुलतानाशीं कांहीं संधान ठेविलें त्यावरून त्यांची कशी अवस्था झाली † ते आपणांस कळल्यावर आपला पूर्वीचा विचार बदलला आणि कांही नवीन विचार मनांत योजून आम्हांस पुनः आपले गौरवपूर्ण पत्र आले. त्यांत आपण मजकूर कळविला, कीं आपण आपल्या देशांत अकबर सुलतानास आश्रय दिला ही आपण फार चांगली गोष्ट केली. आम्हांस हे कृत्य पसंत आहे. आपण हिंदु आहों. आम्हांस जी आज्ञा आपण कराल ती आम्ही अवश्य पार पाडूं. असे आपलें पत्र आलें ते वाचून संतोप झाला, तरी आपणास आतां आमचें असें कळविणे आहे की या कामांत आपणच पुढाकार घेतला पाहिजे. या यवनाधम औरंगजेबाचा जो एवढा बडेजाव चालला आहे तो आम्हांस बिलकूल सहन होत नाहीं. औरंगजेबाची अशी समजूत झाली आहे कीं आम्ही हिंदु लोक स्वधर्मशून्य बनलों आहों, आम्ही फुकट क्षत्रिय म्हणवून घेतों. श्रुतिस्मृतींनीं सांगितलेले वर्णाश्रम धर्म व प्रजापालनादि राजधर्म यांचा औरंगजेबानें उच्छेद चालविला आहे तो आम्हांस बिलकुल पाहवत नाहीं.

† रामसिंहाचा पुत्र कृष्णसिंह औरंगजेबाचे फौजेत नोकरीवर होता. तो सुलतान अकबरास साह्य करतो असा संशय बादशहास येऊन त्याने त्यास परिंड्याजवळ तारीख १० एप्रिल, सन १६८२ रोजीं ठार मारले. त्यास अनुलक्षून हा उल्लेख आहे.

अशा स्थितींत आतां आम्ही पैशाची, देशाची, किल्ल्यांची वगैरे क्षिति मनांत न बाळगतां त्या दुष्ट यवनाशीं निकरानें झगडा सुरू केला आहे. आज दोन वर्षे झालीं, अकबर व दुर्गादास यांस आम्ही आमचे जवळ ठेवून घेतलें आहे. औरंगजेब बादशहाचे सेनानायक इकडे वावरतात त्यांपैकीं कित्येकांना आम्ही ठार केले असून कित्येकाना कैदेंत घातलें आहे. कित्येकांनीं दंड भरून आपली सुटका करून घेतली. कित्येकांना आम्हींच दया दाखवून सोडून दिलें; आणि कित्येक तर लांच भरून निसटून गेले. असे या बादशहाचे सेनानायक केवळ कुचकामी बनले आहेत. आतां असा समय आला आहे की त्या प्रत्यक्ष यवनाधमाला कारागृहांत घालून मंदिरस्थापनादि आपले धर्म पुनः सर्वत्र चालू करावे. असा संकल्प योजून तदनुसार आम्हीं प्रयत्न चालू केले आहेत, ते आपणास परभारें कळत असतील; आम्हीं काय लिहून कळवावे ! आपल्या-पुढें आम्ही तर अल्पवयी आहों. स्वधर्मप्रेम, शौर्य इत्यादि आपले गुण आम्हीं पूर्वी पाहिले व ऐकले आहेत. आपण तर सप्तांगराज्यसंपन्न आहा, यास्तव औरंगजेबास पदच्युत करण्याचे जे साहस आम्ही अंगीकारिले आहे त्या कामीं आपणही जर उत्तरेतून जोर धराल आणि साह्य कराल तर काय होऊं शकणार नाही ! आपण जर या प्रयत्नांत मन घातलें नाहीं, तर आमच्या एकट्याच्यानें ही गोष्ट साध्य न झाल्यास स्वधर्मत्याग करून स्वस्थ बसणे आम्हांस प्राप्त होईल. असा प्रकार आपणास तरी कसा मानवेल ?

बुंदीचे राजे दुर्जनसिंह हाडा यांनी आमच्या सूचनेवरून बादशहाशी कसा निकराचा झगडा चालविला आहे हें आपण नजीक असल्यामुळें आपणास चांगलेच माहीत आहे. ते व आपण एकमतानें उत्तरेतून बादशहास शह दिल्यास, आम्ही इकडून जें करीत आहों त्यास चांगलाच दुजोरा येईल. आम्ही शक्य तो उद्योग चालविला असून अकबर व दुर्गादास यांस गुजरातमार्गें उत्तरेंत रवाना करण्याची योजना ठरविली

आहे. तरी त्या कामीं आपणही शिकस्त करून होईल तितकें साह्य करावें. इराणचे शहा अब्बास यांनींही अकबराचे साह्य करण्याचें आश्वासन लिहून पाठविले आहे. पण आपण योजलेल्या उद्योगांत यवनांचे साह्य घेणें श्रेयस्कर नाहीं. त्याचा पुरस्कार सर्व हिंदूंनींच करणे विहित आहे.

बाकी मजकूर श्रीमत् कविकलश यांच्या व जनार्दन पंडितांच्या पत्रांवरून आपणास विदित होईल. तसेंच मुद्दाम या कामासाठीं आम्हीं आमचे विश्वासु वकील प्रतापसिंह पाठविले आहेत, ते समक्षच सर्व निवेदन करतील. शिवाय आमचे कित्येक खास हेर तिकडे रवाना केले आहेत त्यांजकडूनही आपणास सर्व प्रकार समजतील. तदनुसार योग्य दिसेल तें आपण करावे. निरन्तर कुशललेखन करून आनंदवीत असावें. सुज्ञाप्रति बहुत काय लिहिणे. ”

अशा प्रकारचीं आणखीही संस्कृत पत्रें संभाजी महाराजांनीं उत्तरेकडील राजपुतांस पाठविलेलीं सांपडतात. त्यांवरून त्याच्या जबरदस्त कारस्थानाची आपणास कल्पना करतां येईल. जरी त्यांचे प्रयत्न सिद्धीस गेले नाहींत, तरी स्वदेश व स्वधर्म यांच्या संरक्षणार्थ त्यांनीं कसा प्रचंड झगडा केला आणि त्या झगड्यापायीं आपले जीवित व राज्य सर्व त्यांनीं कसें पणास लावलें ही गोष्ट मनांत आणली, म्हणजे त्यांची नुसती निंदा न करतां थोडा बहुत प्रशंसेचा अंश त्यांस देणें आपलें कर्तव्य होय असें वाटल्याशिवाय राहत नाहीं.

कसें झालें तरी औरंगजेबाच्या मानानें संभाजीचें सामर्थ्य अगदींच तोकडें होते. पुत्र अकबर दक्षिणेंत येऊन संभाजीस सामील झाला, आतां हे दोघे एक होऊन आपणास दगा देतील अशी खात्री पटून स्वतः औरंगजेब आपली सर्व प्रचंड फौज, तोफखाना व अपरिमित द्रव्य घेऊन दक्षिणेवर चालून आला. तरी एवढ्या प्रचंड तयारीनेंही बादशहाचा उद्योग सहजासहजीं सफळ झाला नाहीं. विजापूर व गोवळकोंडा या राज्यांतून

संभाजीस साह्य मिळतें असें दिसल्यावरून बादशहानें प्रथम तीं राज्यें जिंकलीं आणि मग आपला मोर्चा संभाजीवर फिरविला. अशा रीतीने तब्बल आठ वर्षे झगडून व आपलें अमोघ सामर्थ्य उपयोगांत आणून, शेवटीं बादशहाने संभाजी व त्याचा एकनिष्ठ सहायक विद्वान पंडित प्रधान कवि कलश यांस संगमेश्वर येथे पकडून तुळापुरास आपल्या छावणींत आणिले.

पुढें संभाजीला काय शिक्षा करावी याचा विचार बादशहा मनांत करूं लागला. त्याच्याशीं समक्ष बोलण्याचा प्रसंग बादशहानें मुद्दाम आणला नाहीं. रूहुल्लाखान म्हणून त्याचा निकटवर्ती विश्वासु कारभारी होता, त्यास त्याने संभाजीच्या भेटीस पाठवून त्याचा आशय काढून घेतला. हा खान व संभाजी यांचा जो संवाद झाला तो इतिहासकारांनीं लिहून ठेवलेला मोठा उद्बोधक आहे; त्यावरून संभाजीचा मानी स्वभाव व स्वधर्मनिष्ठा निदर्शनास येते. तो संवाद असा—

**खान**—संभाजीराजे, आम्हांस शहानशहा हजरतांनी आपल्या भेटीस पाठविले आहे.

**संभाजी**—काय आहे त्या यवनाधमाचे म्हणणें ? हे आम्ही तयार आहों काय सांगाल तें ऐकण्यास.

**खान**—आज आपणावर कसा प्रसंग गुदरला आहे हें आपण जाणतां. इतके दिवस आपण बादशहांशी कसें निंद्य वर्तन केलें, किती घोर गुन्हे केले हेंही आपल्या लक्षांत असेलच. हे सर्व ओळखून आपण बऱ्या बोलानें बादशहाचा संतोष कराल तर ते आपणांस जीवदान देतील. त्यांजवर अतिप्रसंग करण्याची पाळी आपण आणूं नये.

**संभाजी**—केवळ जीव जगविण्याकरतां राष्ट्रद्रोहाचें पातक करण्यास हा सिंहाचा बच्चा कधीं कबूल होणार नाहीं. आम्ही स्वतंत्र राजे आहों. आज दैवदुर्विपाकानें या गतीस पोचलों असलों तरी बादशहा आपल्या

थोरपणास उचित तेंच करतील तर आम्हीही त्यांचा मनोदय सांभाळूं. पण अपमान मात्र कधींही सहन करणार नाही. सांगा बादशहांचे काय म्हणणे आहे तें.

**खान**—बादशहाचे असे फर्मान आहे कीं आपण आपल्या सर्व किल्ल्यांची सोडचिठी स्वहस्तानें लिहून द्यावी. आपला सर्व खजिना गुप्त व प्रकट कोठे कसा ठेविला आहे तो दाखवून द्यावा; आमचे कोणकोण अमलदार आपणाकडे गुप्त संधान ठेवीत होते त्या सर्वांची नांवनिशी लिहून द्यावी, आणि आपण मुसलमानी धर्म स्वीकारून बादशहाची सेवा करावी म्हणजे ते आपणास जीवदान देतील.

**संभाजी**—एकूण या यःकश्चित् जीवाची एवढी मोठी किमत बादशहा आमचेकडून घेणार काय? ज्या शिवाजीमहाराजांनी स्वधर्माच्या सेवेनें आपलें जीवितसाफल्य केलें, त्यांच्या प्रत्यक्ष पुत्राने स्वधर्मत्याग करून आपल्या कुलास कायमचा डाग लावून घ्यावा काय? हा जीव केव्हां तरी जायचाच आहे तो आणखी कांही काल वांचण्यापेक्षां आजच गेलेला काय वाईट! बादशहांनीं कळविलेली एकही गोष्ट आम्हांस मान्य नाहीं. त्यांना काय करायचे असेल तें खुशाल करून घ्यावें.

**खान**—राजेसाहेब, आपण विचार करा. अशा उतावळेपणानें आपलें बरें होणार नाहीं. इस्लाम धर्म स्वीकारण्यांत आपणांस कांहीं एक लांछन नाही.

**संभाजी**—खानसाहेब, कशाला सांगतां त्या तुमच्या हीन धर्माची महती? आमची मंदिरें पाडणे, मूर्ति फोडणे, संपत्ति लुटणें, विवाहित बायका पळवून आपल्या घरांत घालणे, गाईचा वध करणे, कांहीं एक अपराध नसतां लोकांस नाहक बाटवून जबरदस्तीनें मुसलमान करणें, अशा अनन्वित गोष्टी जो धर्म शिकवतो तो धर्मच नव्हे. या तुमच्या धर्माची महती आम्हांस बिलकुल वाटत नाहीं. तो धर्म आम्ही अत्यन्त अधम व निंद्य समजतों, असें जाऊन बादशहास सांगा. मृत्यु किंवा

हालअपेष्टा यांस भिऊन हा संभाजी जिवाची पर्वा बिलकुल धरीत नाहीं. तो दुष्ट धर्म स्वीकारून कायमची अधोगति मिळविणें आम्हांस मान्य नाही. तथापि बादशहा जर आपली कन्या देऊन आम्हांस आपला जावई करीत असतील, तर कदाचित् आम्ही आपल्या सूचनेचा विचार करूं. असे करण्यांत बादशहांचेच कल्याण आहे.

**खान**—राजे, काय हे आपले उच्चार! अशी इस्लामाची निंदा करून बादशहांस जास्त चिडविण्याने आपण आपला घात मात्र करून घ्याल. शान्तपणे विचार करून काय तें उत्तर द्या. रागाच्या आवेशांत भलतेंच बोलूं नका. या संकटसमयी आम्ही आपणांस जो उपदेश करतो तो केवळ आपल्या हिताचाच म्हणून करतों.

**संभाजी**—बस्स झाला तुमचा हा पोक्त उपदेश! आम्ही बोलत आहो ते पूर्ण विचार करूनच बोलतो. इतकेंच नव्हे तर तुम्ही बादशहाचे कारभारी केवळ तोंड देखलें बोलून बाहेर चाललेला खरा प्रकार त्यांस कळवीत नाही. तुम्ही अन्नाचे मिंधे बनलां आहां. तुम्हांस छाती नाहीं होणार आमचा निरोप बादशहास आहे तसा कळविण्याची. तुम्हांस जर सत्याची चाड असेल तर आम्ही जे शब्द बोललों ते सर्व जसेच्या तसे कांही एक फरक न करतां बादशहाचे कानावर घाला. मला समक्ष बोलूं द्याल तर मी स्वतःच त्यांची तोंडावर चंदी उडवीन.

**खान**—बरें आहे. आपले दुर्दैवच ओढवलें त्यास आमचा तरी उपाय काय? सबसे जीव प्यारा हें तत्त्व आपण ओळखीत नाहीं, त्यास आम्ही जास्त काय सांगणार! घेतों आपली रजा. अल्ला आपलें भलें करो!

असें म्हणून रूहुल्लाखान परत गेला. संभाजीनें बजावल्याप्रमाणें वरील संभाषण जसेंच्या तसें बादशहास कळविण्यास खानाला धैर्य झालें नाहीं. आशय तेवढा त्यानें बादशहाचे कानावर घातला. त्याचा परिणाम काय झाला तो इतिहासास महशूर आहे. ज्या जिव्हेनें

संभाजीनें बादशहाची व इस्लामाची निन्दा केली ती जिव्हाच त्यानें प्रथम छाटून टाकविली आणि नानाप्रकारें हाल करून त्यानें संभाजी व कवि कलश यांचा क्रूरपणें वध करविला. हा प्रकार फाल्गुन व॥ ३० शके १६१०, ता. ११ मार्च स. १६८९ रोजीं भीमाइंद्रायणींचे सगमाजवळ घडला.

संभाजीनें अखेरपर्यंत आपल्या शूर बाण्यास साजेसेंच वर्तन केले. हे त्याचे शेवटचें धाडस इतिहासांत अनुपमेय म्हणून चिरंतन गाजत राहील. या धाडसाचा प्रयोग जो जिवन्तपणीं संभाजीमहाराजांस करून दाखवतां आला नाहीं, तो त्यांनी मरणसमयीं प्रकट केला, त्याचा परिणाम असा झाला कीं आपला छत्रपति मारल्याबद्दल बादशहाचा पुरेपूर सूड घेण्याचा चेव महाराष्ट्रास उत्पन्न झाला. गांधील माशांप्रमाणें मराठे लोक बादशहावर तुटून पडले. अठरा वर्षे बादशहाशी झगडून त्यांनीं त्याला सर्वस्वी नागविलें, तेव्हां मोठ्या विपन्न स्थितींत त्याला इहलोकची यात्रा संपवावी लागली. संभाजीच्या आत्मत्यागाचा हा परिणाम होय.

८

# विपरीत शेवट



**" फौजेनिशीं जाऊन साहेब काम करावें. राजश्री स्वामींजवळ मुद्दे घालूं नयेत. मर्यादेनें राहावें, बे इमानी करूं नये "**

शंकराजी पंताच्या संताजीस उपदेश, जे० श०

फाल्गुन व० अमावास्या ता० ११ मार्च, स. १६८९ रोजीं बादशहानें तुळापुरच्या छावणीत संभाजी महाराजांचा क्रूरपणें वध केला. त्या वेळीं राणी येसूबाई, पुत्र शाहू व दीर राजाराम यांच्यासह रायगडावर होती. पुढे बादशहानें रायगडास वेढा घातला, त्यांतून निभावण्याचे चिन्ह दिसेना, तेव्हां येसूबाईनें संताजी घोरपडे यास भेटीस आणून विचारलें.—

**येसू**—संताजी, काय हा आम्हांवर दुर्धर प्रसंग दुर्दैव सर्व बाजूंनी कसें हात धुऊन पाठीस लागले आहे. माणसाने सहन तरी किती म्हणून करायचे! हद्द झाली संकटपरंपरेची. छत्रपतींना बादशहानें पकडून नेऊन त्यांची कशी दशा केली त्या गोष्टी कानांनीं देखील ऐकवत नाहींत. त्या थोर शिवाजीमहाराजांच्या कुटुंबाची अशी वाताहत व्हावी ना! भाळीं लिहिलेले टळत नाही हेंच खरे. ईश्वरी संकेतापुढें आम्हां मानवांचा पाड कसा लागणार! वाटतें या रायगडाच्या कड्यावरून उडी घेऊन प्राणत्याग करावा. पण हा कांही माझ्या एकटीचा प्रश्न नाहीं. माझा बाळ शाहू लहान आहे त्यास निराधार सोडून जाणे अवघड वाटतें. तशांत आतां रायगडास वेढा पडला. कोण्या वेळीं काय प्रसंग उद्भवेल नेम नाही. राजाराम साहेब सपरिवार येथें

आहेत. जर का किल्ला शत्रूचे हातीं पडला तर छत्रपतीच्या कुटुंबांतलें एकही माणूस जिवंत राहणार नाही. संताजीराव, काल जेव्हां तुम्ही बादशहाच्या खास तंबूचे सोन्याचे कळस आणून येथें हजर केले, तेव्हां-पासून तुमच्या शौर्याचे व धाडसाचें अप्रतिम कौतुक वाटलें आणि मनांत आले, तुमच्यासारखे वीर पदरी असल्यावर अजूनही कांहीं मार्ग पुढील निभावणुकीचा निघेल. केवळ हताश होऊन बसणे योग्य नाही. म्हणून विचारते तुम्ही, रामचद्र पंत, धनाजीराव वगैरे मिळून काय बेत योजला आहे तो प्रथम सांगा बरें! बादशहाच्या छावणीची हवाल काय आहे?

**संताजी**--काय सांगूं मासाहेब! संभाजीमहाराजांच्या वधाचा पूरेपूर सूड घेण्याचाच प्रसग आला होता. पण त्या बादशहाचे ताले मोठे सिकदर खरे. विठोजी चव्हाण व मी चार सोबती बरोबर घेऊन ऐन मध्यरात्री बादशहाच्या तंबूवर अचानक छापा घातला. वारापाऊस, विजांचा गडगडाट असा कांहीं चालू होता की पायांखालीं वाट देखील दिसत नव्हती. सर्वांच्या हातांत चांगले धार लावलेले सुरे होते. तंबूला दोऱ्यांचे तणावे होते ते भराभर कापून काढतांच धाडकन तो भव्य तंबू जमीनदोस्त झाला. आंत बादशहा व त्याचे साथीदार होते ते सर्व मरून गेले असें आम्हांस वाटले. तंबूवर लावलेले सोन्याचे कळस होते ते काढून घेऊन तसेच आम्ही तडक परत सर्व खुशाल मुक्कामावर आलो. पायांखालची वाट, आम्हांस कांहीं एक अडचण झाली नाही. चार दिवसांनीं वर्तमान समजलें, की त्या रात्रीं बादशहा आपल्या मुलीच्या मुक्कामावर भोजनास गेलेला तेथेच शयनास राहिला होता. तंबूंत असलेलीं कांहीं नोकर माणसे दगावली, पण तो स्वत: आमच्या हातून जिवंत सुटला. तथापि आम्ही हिंमत सोडली नाहीं. आमच्या छत्रपतींना मारून त्यानें मराठ्यांचें जें नाक कापलें आहे त्याचा वचपा भरपूर घेतल्याशिवाय आतां हे चवताळलेले मराठे स्वस्थ बसणार नाहीत, याची आपण खात्री ठेवा.

**येसू॰**—तुमचे हे धीराचे शब्द ऐकून आमचें मन किती हलके होतें म्हणून सांगूं. पण मला तुम्हा लोकांचा तितकासा भरंवसा वाटत नाहीं. तुमचे स्वार्थसाधु मराठे अल्प फायद्याकरितां आपल्याच लोकांचे गळे कापण्यास चुकणार नाहींत. मी ऐकतें की माने, निंबाळकर, थोरात, घाटगे वगैरे किती तरी मंडळी बादशहाचे नोकरींत जाऊन आपल्याच राज्याचे शत्रु बनले आहेत.

**संता॰**—मासाहेब, हा प्रकार कांहीं आजचाच नाही. पण हा दोष सर्वथा सरदारांचाच नव्हे. तो बादशहाच असा जहांबाज आहे की हजारो युक्त्या करून तो आमच्यावर घाला घालीत आहे. पण त्याचे नोकरींत गेलेली ही मंडळी सर्वथा त्यास वश झाली असें आपण समजूं नका. त्यांचे छावणींत राहून तेथें सडकून भेद करण्याचा उद्योग या मंडळींनीं चालविला आहे. लहान मोठी बातमी ते आम्हांस तेथून लगोलग कळवितात. बादशहाच्या सरदारांशीं ओळखी काढून त्यांचीं मनें फिरवितात. आपणास कल्पना नाहीं सर्व लोक हल्लीं बादशहावर कसे उलटले आहेत ते. संभाजीमहाराजांवर जो त्यानें अतिप्रसंग केला त्याचा परिणाम अगदी उलट झाला आहे. सर्व लोक बादशहालाच नांवें ठेवतात. एकही इसम मनापासून त्याची नोकरी करण्यास खूष नाहीं. राजपूत राजे व सैनिक सर्व मराठ्यांस सामील होण्यास आज तयार आहेत. त्यांचे जीव व जागिरा बादशहाचे हातांत, एवढ्याचमुळें त्यांस बादशहावर उघड शस्त्र उचलतां येत नाहीं. पण ते योग्य संधीची वाट पाहत आहेत. मुसलमान देखील त्याजवर अत्यंत रुष्ट आहेत. कोणालाच बादशहाचा विश्वास येत नाहीं.

**येसू**—तें असो. पण आतां पुढें आपण काय योजना करावी, कसें वर्तन ठेवावें म्हणजे या बादशहाचा पाडाव होऊं शकेल असें तुम्हांस वाटतें ?

**संताजी**—यार्चीच वाटाघाट पंत व मी कालपासून सारखी करीत आहो. आमचे विचारास असें येतें, की कांही तरी नवीन साहस आपण अंगावर घेतले पाहिजे. बादशहाचे सामर्थ्य प्रचंड आहे. हातांत पैसा, फौजा, तोफा यांचा पुरवठा भरपूर आहे. त्या सर्वांचा मारा या लहानशा पुणें व कोकण प्रांतावर तो करूं शकतो. या रायगडावर देखील आपला निभाव कसा लागेल याची आम्हांस चिंता वाटते. निदान सगळ्यांनीं एकाच ठिकाणीं बसून राहणें ठीक नाहीं. मला वाटतें राजाराममहाराजांनीं कांहीं सरदार घेऊन बाहेर पडावे. तसाच प्रसंग आल्यास लांब जिजीच्या किल्ल्यावर जाऊन राहवें. म्हणजे बादशहाची फौज तिकडे पांगली जाऊन महाराष्ट्रावरचा शह ढिला पडेल. आम्ही मराठे लोक गनिमी काव्यांत भले निपुण आहो. एकदां आम्ही रानोमाळ दौडा मारूं लागलों म्हणजे बादशहाच्या अवजड सैन्याचा व तोफांचा आमच्यावर कांहीं एक परिणाम होणार नाहीं. उलट आम्ही चोरटे छापे घालूनच त्यास दमवून सोडूं.

**येसू०**—तुमची सल्ला योग्य दिसते. मग आतां विलंब नको. शुभस्य शीघ्रम्, करा पुढची तयारी.

वरील बेत ताबडतोब अंमलांत आला. राजाराम कुटुंबासह बाहेर पडून जिजीस गेला. मागें रायगड किल्ला मोगलांनीं हस्तगत करून येसूबाई व सात वर्षांचा मुलगा शाहू यांस कैद करून बादशहाजवळ दाखल केलें. बादशहानें त्यांस आपले छावणींत बंदोबस्तानें ठेवून राजारामाचे पाठीवर फौजा रवाना केल्या. राजाराम जिजीवर राहत होता त्या किल्ल्यास जाऊन मोगलांनीं वेढा घातला. संताजी व धनाजी हे दोघे मुख्य सरदार आपले अनेक साथीदार बरोबर घेऊन पूर्वपश्चिम समुद्रापर्यंत हजारआठशें मैलांच्या टापूंत सारखे फिरत राहून बादशहाची दैना उडवूं लागले. संताजीची युक्ति बरीच सफल झाली. राजारामानें संताजीचा गौरव केला. त्यांत खालील मजकूर लिहिलेला आढळतो,—

" तुम्हांस प्रांताचे बंदोबस्तास ठेवून आम्ही कर्नाटकांत गेलों तेव्हां शत्रूनें धामधूम बहुत करून सर्व देश दुर्ग काबीज केले. राज्यांत कांहीं अर्थ उरला नाहीं. आमचे पुष्कळ सरदार इमान सोडून शत्रुपक्षास सामील झाले. तुम्ही मात्र धन्याच्या पायाशी एकनिष्ठा धरून फौज जमवून शेखनिजाम, सर्जाखान, रणमस्तखान, जाननिसारखान वगैरे बादशहाचे मोठमोठे सरदार बुडविले. जागोजाग शत्रूस अडवून आपला देश सोडविला आणि स्वराज्यसंरक्षणासाठीं असाध्य श्रम केले. औरंगजेबास दहशत लाविली. यास्तव मिरज प्रांताची देशमुखी तुम्हांस बहाल केली आहे. या प्रांताचे देशमुख औरंगजेबास मिळाले त्यांस दूर केले असे. "

संताजीने अल्पावकाशांत बादशहास अत्यंत जेरीस आणिले. शत्रूकडील हालचालींची बातमी पुरेपूर ठेवून त्यांस हटकून गोत्यांत आणण्याचें कसब संताजीइतके दुसऱ्या कोणास साधलें नाही. याचें एक मजेदार उदाहरण प्रत्यक्ष घडलेले सांगण्यासारखे आहे. स. १६९५ च्या दसऱ्यास रामचंद्रपंताने संताजी धनाजी वगैरे सरदारांस पन्हाळ्यावर जमवून जिंजीचा वेढा उठवून राजाराममहाराजांस तेथून सोडवून आणण्याची एक जंगी मसलत रचली, आणि तींत निरनिराळ्या सरदारांस ठरीव कार्यभाग वांटून दिले. त्या सर्वांवर देखरेख ठेवून कार्यभाग घडवून आणण्याचें काम संताजीकडे होते. तो विजापूर प्रांतांतून बादशाही प्रदेशाचा विध्वंस करीत तुंगभद्रेकडे चालून गेला. मराठ्यांचे हे बेत बादशहास समजले तेव्हां त्यानेही संताजीस अडविण्याची शिकस्त चालविली.

तुंगभद्रेजवळ कासीमखान नांवाचा बादशहाचा शूर व विश्वासु सरदार मराठ्यांचे पारिपत्यास नेमलेला होता, त्यानें बादशहास कळविलें, संताजी आमचेवर चालून येत आहे, आमचेजवळ पुरेशी फौज नाहीं तरी आणखी चांगली फौज आमचे साह्यास ताबडतोब पाठवावी. बादशहाने प्रसंग आणीबाणीचा आहे हें ओळखून लगेच

आपल्याजवळचा एक मोठा तरुण व शूर भरंवशाचा उमराव खानाजादखान म्हणून होता त्यास निवडक फौज, माणसें व भरपूर युद्धसाहित्य देऊन कासीमखानाचे मदतीस तुंगभद्रेकडे रवाना केलं. तो त्वरेनें संताजीचे पाठीवर चालून गेला. संताजीचे हेर बाहेर फिरत होते, त्यांनीं या मोगल सरदारांच्या हालचाली कोठें कशा चालल्या आहेत ते येऊन संताजीस कळविले.

खानाजादखान सारखा प्रतिष्ठित व थोर उमराव आपले साह्यास येतो याबद्दल कासीमखानास धन्यता वाटून, त्याच्या थोरपणास उचित असा विशेष सत्कार करण्याची इच्छा कासीमखानास झाली. त्यासाठी त्याने भपकेबाज तंबू, चांदी सोन्याचे मोलवान सामान वगैरे मुद्दाम वेलोरहून आणवून चित्रदुर्गनजीक एक भव्य उतारा व छावणी खानासाठीं बनविली. याची बरोबर आगाऊ माहिती काढून संताजीनें आपल्या सेनेच्या तीन टोळ्या करून एकदम तिहींकडून मोगल छावणीवर दिवस उगवतांच अचानक हल्ला केला. कासीमखान खानाजादखानास सामोरा जाऊन मुक्कामावर आणतो तों सर्व छावणी लुटून उध्वस्त झालेली त्यास आढळली. तो तसाच रागारागाने संताजीवर चालून गेला. मागाहून खानाजादखानही त्याची साथ करण्यास धावला. पण संताजीने दोघास वेगवेगळे गांठून त्यांची दुर्दशा उडविली आणि त्यास अन्नपाणी मिळूं न देतां त्यांची उपासमार चालविली. जवळच दुडेरी नांवाची लहानशी गढी मोगलांची होती, तिच्या आश्रयास हे दोघे खान गेले. लगेच संताजीनें गढीस वेढा घालून बंदुकांच्या गोळ्यांनी त्यांचा फन्ना उडविला. उभयतां खानांचे प्राण व्याकुळ झाले. कासीमखानास अफूची सवय होती. तीन दिवस पावेतों अफू न मिळाल्याने कासीम खान तडफडून प्राणांस मुकला; आणि आपले प्राण वांचवावे अशी याचना खानाजादखानानें संताजीकडे केली. त्याबरोबर संताजीनें वीस लाख रुपये दंड व जवळचें सर्व मोलवान सामान घेऊन खानास मोकळे केलें आणि त्याची प्रवासाची व्यवस्था करून

त्यास आपला लष्करी लवाजमा देऊन बादशहाकडे पोचविलें. त्या प्रसंगीं संताजीने बादशहास मुद्दाम निरोप कळविला तो असाः " हे आपले प्रमुख उमराव आमच्या हस्तगत झालेले सुखरूप परत पाठविले आहेत. नाइलाजास्तव त्यांची मानहानि करणें आम्हांस प्राप्त झालें. युद्धच आहे. क्षमा करावी." या निरोपाबद्दल त्या वृद्ध बादशहास संताजीची कशी चीड उत्पन्न झाली असेल त्याची कल्पना केली पाहिजे.

यानंतर हिमतखान नांवाचा दुसरा बादशहाचा सरदार संताजीवर चालून आला. त्यास व त्याचे पुत्रास संताजीनें युद्धात ठार मारिलें. या कृत्यांनीं संताजीचा अद्वितीय पराक्रम सर्व देशभर गर्जू लागला. बादशहास भयंकर दहशत बसली आणि संताजीचा कांटा काढल्याशिवाय आपली धडगत नाहीं असें त्यास वाटूं लागलें.

नागोजी माने म्हसवडकर हा एक प्रमुख मराठा सरदार बादशहाचे पदरीं असून त्यास संताजीची चांगली माहिती होती. संताजीचें वास्तव्य शंभु महादेवाच्या डोंगरांत म्हसवडचे बाजूस असल्यामुळें उभयतां एकमेकांस चांगले ओळखून होते. अनेक कारणांवरून त्या उभयतांचे आपसांत वैमनस्य होतें. हें ओळखून बादशहाने नागोजी मान्यास कळविलें, " कसेंही करून संताजीला मारून त्याचें शीर आणून आम्हास दाखवाल तर आम्ही तुम्हास मोठी जागीर बक्षीस देऊन तुमचा गौरव करूं. " ही कामगिरी पत्करून माने संताजीच्या नाशास उद्युक्त झाला.

संताजीचा स्वभाव अत्यंत कडक व भाषण फार ताठर असे. त्यामुळें हाताखालचे लोक त्याजवर पुष्कळसे नाराज असत. केलेला हुकूम बरोबर पाळला नाहीं तर तो कडक शिक्षा केल्याशिवाय राहत नसे. शिवाय यत्किंचित् त्याचा कोणी अपमान केला तर तो त्यास कधीं सहन व्हावयाचा नाहीं. धनाजी जाधव, परशुरामपंत प्रतिनिधि, रामचंद्रपंत अमात्य इत्यादि मंडळींशीं त्याचे खटके वारंवार उडत. पराक्रम असणाऱ्या

माणसाचे अंगीं एक प्रकारचा दिमाख, आत्मप्रौढी व क्रोधावेश पुष्कळदां असतात. तसाच प्रकार संताजीचा होता. त्यांतून रामचंद्रपंत त्याची मर्जी संभाळून वागे आणि पंतालाच तो थोडाबहुत वचके. पण वर्षानुवर्ष संताजीचा मुक्काम कर्नाटकांत वेलोर जिंजीकडे होता तेव्हां त्यास धाक्यांत ठेवणारे त्या बाजूस कोणी नव्हते कासमखान व खानाजादखान यांचा पाडाव केल्यावर तो जिंजीस जाऊन राजाराम छत्रपतींस भेटला. त्या भेटीत त्यांचें खालील संभापण झाले—

**राजा**०—या संताजीराव, काय विशेष खबर आहे ?

**संताजी**०—चित्रदुर्गजवळ जो मोठा रणसग्राम झाला त्याची हकीकत आपण ऐकलीच असेल.

**राजा**०—पुष्कळशा गोष्टी आमच्या कानांवर आल्या. कासमखानास तुम्ही हालअपेष्टा करून मारले हें आमच्या मतें चांगले झालें नाही.

**सं**०—मराठ्यांचा तो पक्का वैरी कासमखान मृत्युमुखी पडला याबद्दल आपणास संतोप वाटला पाहिजे. त्या खानाने आजपावेतो आमचे कसे हाल केले, कितीकांचे नाहक बळी घेतले, आपणास व आपल्या राज्यास कसें गोत्यांत आणलें, ते सर्व आपणास माहीत नाहींसे दिसते. नाहीं तर आपण या कृत्याबद्दल आपल्या या सेनापतीची वाहवाच केली असती.

**राजा**०—यांत विशेष वाहवा ती कसली ! आपले सर्वच सरदार राज्याच्या कामांत सारखे खपत आहेत. ते सर्व आपल्या या यशांत संविभागी आहेत.

**सं**०—एकूण आम्ही असे अहोरात्र कष्ट सोसून जिवाचीं काडे करतों त्याची कदर आपल्याकडून–प्रत्यक्ष आमच्या छत्रपतींकडून अशीच व्हावी ना ! या जगांत खऱ्याचा वाली कोणी नाहीं हें आज चांगलें प्रत्ययास आलें.

**राजा॰**—संताजीराव, खरेच बोलायचे तर तुम्हांस आपल्या मर्दुमकीचा फाजील गर्व झालेला दिसतो. तुमचा चढेलपणा उतरविण्यास आम्हांस विलंब नाही लागणार !

**सं॰**—धन्यास धनीपणा संभाळायची ताकद नसली कीं सेवक लोकांचे नष्टचर्य उद्भवले असेच समजलें पाहिजे. आज इतकीं वर्षें यातना सहन करून छत्रपतीच्या गादीची सेवा केली ती सर्व फुकटच ना ! रायगडावरून काढून आम्ही आपणांस या जिजीत आणून ठेविलें म्हणूनच आपले हे छत्रपतिपद आज टिकले आहे.

**रा॰**—बस झाले ! तुमचे हे बेफामपणाचे शब्द ऐकून घेण्याची आम्हांस बिलकुल इच्छा नाही.

**सं॰**—ठीक आहे. आमचा हाच शेवटचा रामराम !

अशा प्रकारें राजाराम छत्रपति व सेनापति संताजी यांची उघड बाचाबाची होऊन तिजमुळे शत्रूचें मात्र चांगले फावले. राजारामानें संताजीचें सेनापतिपद काढून त्याचे जागीं धनाजीची नेमणूक केली. संताजी आपले पद सोडीना, तेव्हां धनाजीची व त्याची कांचीजवळ मोठ्या निकराची लढाई झाली. धनाजी पराभव पावून पळून गेला. धनाजीचे हाताखालीं अमृतराव निंबाळकर हा एक आगलाव्या गृहस्थ संताजीशीं लढत असतां पकडला गेला. संताजीने त्यास संतापाच्या भरांत हत्तीवरून खालीं लोटून ठार मारलें. प्रकरण चिडीस गेलें. या अमृतराव निंबाळकराची बहीण राधाबाई ती नागोजी मान्याची बायको.

राधाबाई महा खटपटी व्रात्य स्वभावाची बायको असून नवरा नागोजी माने तिच्या अगदीं अर्ध्या वचनांत वागत असे. तिचा एक नोकर सदबा दळवी म्हणून मोठा धूर्त व खटपटी होता केव्हां नागोजीजवळ तर केव्हां राधाबाईजवळ वागून तो दोघांकडूनही पैदास करून आपली चंगळ करी. राधाबाईने त्याला आपल्या अंतस्थ कारस्थानांत घेऊन

संताजीचा खून करविला आणि त्याचें शीर नागोजी मान्यानें नेऊन बादशहास नजर केलें. हा एकंदर प्रकार कसा बनून आला त्याची हकीकत त्यानें राधाबाईस स्वत: निवेदन केली ती अशी—

**राधा०**—कायरे सदबा, कालच तूं यजमानांबरोबर बादशहाचे छावणींतून आलास. संताजीचें शीर नेऊन त्यांनीं बादशहास नजर केलें. बादशहा फार खूष झाले. त्यांनीं एक लाख रुपये रोख व म्हसवडच्या जागिरीची सनद आमचे यजमानांस करून दिली. हें सगळे काम केवळ तुझ्या चतुराईनें पार पडलें. तुझे आमच्यावर अगणित उपकार आहेत, त्यांची फेड मी करणार आहे. तथापि या प्रकरणाचें सगळें कच्चें वर्तमान ऐकण्याची मला मोठी उत्सुकता वाटत आहे. तर पहिल्यापासून सर्व सांग बघूं कसकसे झालें तें. गुदस्तां संताजीरावांनीं धनाजीरावांचा पराभव केला तेवढें मीं ऐकलें आहे. त्यापुढची बातमी मला कांहीं कळलेली नाही.

**सदबा**—काय सांगूं बाईसाहेब, आज दीड वर्षांत हा आपला दास रानावनांत हिंडून कसा धडपडत होता तें एक त्याच्या जिवाला माहीत. संताजीराव धनाजीचे पाठीस लागत कर्नाटकांतून विजापुराकडे आले. निंबाळकर मंडळी, आपले धनीसाहेब नागोजीराव वगैरे आम्ही पुष्कळ मंडळी धनाजीचे बरोबर जीव बचावून पळत होतों. एकंदर रागरंग पाहिला, आमची खात्री झाली की कपटविद्या लढविल्याशिवाय संताजी-राव आमच्या आहारीं येणार नाहींत. त्यांच्याजवळ जिवास जीव देणारे दहापांच हजार लोक होते. त्यांच्याकडे आम्ही अंतस्थ भेद करून व लांच लालूच दाखवून फितुरीचा बार पूर्ण भरून ठेवला; आणि लढाईस तोंड लागताच सर्वांनीं आयत्या वेळी संताजीरावांस सोडून वाट फुटेल तिकडे निघून जावें असे ठरविलें.

**राधा०**—शाबास तुमच्या बहादुरीची ! मग पुढें प्रत्यक्ष लढाई झाली कारे ?

**सदबा**—विजापुराजवळ संताजीराव येतात तोंच पूर्वसंकेतानुसार एकदम धनाजींनीं त्यांजवर चालून घेतलें. दगड मारतांच पाखरें उडून जातात त्याप्रमाणें धनाजी समोर येतांच संताजीचे सैनिक सैरावैरां चार दिशांस पळून गेले. मग संताजीचा निभाव काय लागणार ! पांच पन्नास जिवाचे सोबती होते तेवढ्यांनिशीं ते जीव बचावून आपल्या शंभु महादेवाच्या रानांत लपून बसले. तेव्हां एक दिवशीं रात्रीं मी उभ्या उभ्या आपणास वर्दी देण्यास आलों त्याची आपणास आठवण असेल.

**रा०**—होय थोडेसें आठवतें. पण सगळा उमज कांहींच पडला नव्हता. आपल्या या म्हसवडच्या शेजारींच आले म्हणायचे. मग त्यांचा माग तुम्ही पुढें कसा ठेवलात आणि शेवटी लाग कसा साधलात बरे !

**स०**—जंगलांत लपून छपून बसण्याचे हे चार महिने आम्ही कसे वनवासांत काढले तें सगळे अकशी वंगाळ बगा. बादशहाचे सरदार बाहेर संताजीच्या पाठीवर होते. त्यांजबरोबरच आम्ही चार मांग मंडळी घेऊन सारखी संताजीवर अहोरात्र पाळत राखीत होतों. इकडे बादशहांनीं जाहीरनामे लावले. संताजीचें शीर कापून आणील त्यास एक लाखांचें बक्षीस देऊं केले. बक्षिसाच्या आशेने सर्व लोक संताजीची पाळत राखूं लागले. शेवटीं संताजीचा सर्व जमाव फुटला. जवळ पैसा नाहीं, माणसे नाहींत, निर्वाहाची सुद्धां पंचाईत. रात्री निजायला देखील निवाऱ्याची जागा नाहीं. एवढया मोठ्या सरदाराची अशी कठिण अवस्था पाहून आमच्या मनास कशा वेदना होतात म्हणून सांगूं. पण घेतली कामगिरी पुरी पाडली पाहिजे म्हणूनच आम्ही या कामाचा पिच्छा सोडला नाहीं.

**रा०**—पापाचे घडे कधीं तरी भरतात ते असे. या संताजींनीं गेल्या पांचसात वर्षांत लोकांना थोडें नाहीं छळले. भली खोड मोडली. बरें मग, शेवटीं लाग कसा साधलात रे ?

**स०**—संताजींच्या पाठीवर माणसें रात्रंदिवस फिरत राहिलीं. दिवसा तर बाहेर पडायची सोय नाहीं. आंघोळ म्हटली तर कैक दिवसांत

माहीत नाही. रात्रीं कुठें घांसभर अन्न व घोटभर पाणी चोरून मिळालें कीं भाग्य. मला वाटतें ते आपल्या जिवास देखील भारी कंटाळले होते. दोनच माणसें खाल्ल्या अन्नाचीं म्हणून त्यांजबरोबर राहिलीं. अशा स्थितींत आपल्या ह्या कारखाळ्याच्या रानांत मध्यें तो मोठा झरा आहे नाहीं का ? दुपार झाली होती; सभोंवार दाट झाडी असल्यामुळें एकदां मनमुराद स्नान करण्यासाठीं ते झऱ्यावर आले. आजूबाजूस पाळतीवर माणसें आहेत हें त्यांस कळले नाहीं. कांठावर कपडे व तलवार ठेवली. जवळ दोन हुजरे होते ते भाकरी करण्याच्या उद्योगास लागले. लोटा घेऊन डोक्यावर ओततात तो आमचे चौघे मांग वाघासारखे धावून त्यांजवर गेले; आणि क्षणमात्रांत संताजीचें डोकें कापून घेऊन ते तसेच पळत नागोजीराव माने धनीसाहेब यांजकडे गेले. संताजीरावांस आपली तलवार घेण्यासही अवकाश मिळला नाहीं. फार वाईट गोष्ट झाली बघा. संताजीरावा एवढा पराक्रमी पुरुष पूर्वी झाला नाहीं व पुढेंही होणार नाहीं.

अशा रीतीनें संताजी घोरपड्याचा अंत मोठा हृदयद्रावक झाला. नागोजी मान्यानें संताजीचें शीर नेऊन बादशहास नजर केलें आणि त्याजकडून बक्षीस मिळविलें. संताजीसारख्या कर्तबगार पुरुषाचा शेवट असा विपरीत झालेला पाहून कोणासही उद्वेग वाटल्याशिवाय राहणार नाहीं. गनिमी काव्याचा पहिला खरा पुरस्कर्ता संताजी होय आणि त्याच कलेच्या सामर्थ्यावर त्यानें अनेकवार औरंगजेबासारख्यास सर्वथा नामोहरम बनविले. त्याला सेवेंत वागवून घेण्याचें चातुर्य राजाराम छत्रपतीला नव्हतें हें तर उघड आहे. तशांत रामचंद्रपंत दूर अंतरावर असल्यामुळें त्यास तो कलह वेळेवर मिटविण्याची संधि मिळाली नाहीं, हेंही या प्रकरणांत व्यक्त होते. पण ह्या प्रकरणाचा एकंदर विजय बादशहाच्या कपटनीतींसच मुख्यत: येतो. पैशानें व भेदनीतीनें त्यानें सर्व मराठमंडळ कसें पोखरून ठेवलें होतें हें लक्षांत घेतलें असतां अंतीं या अशा जहांबाज बादशहाला मराठे जिंकूं शकले हा त्यांचा पराक्रम इतिहासांत निरंतर झळकत राहील.

९

# अतुल पराक्रमी सेवक



**Balaji Vishvanath carried victoriously all his diplomatic points and brought back to Western India a political instrument which is one of the most noteworthy state documents in Indian history and constituted the Magna Charta of Maratha Dominion.**

*—Sir Richard Temple.*

स. १७०३ च्या आश्विनांतली गोष्ट. पुण्याचे सरसुभेदार बाळाजी विश्वनाथ धनाजी जाधवाच्या भेटीला गेले. क्षेमकुशल झाल्यावर धनाजीरावांनीं नानांना विचारलें,—

**धनाजी**—कां पंत, आज मुद्दाम इतक्या तारांबळीने भेटीस येण्याचे काय कारण ?

**बाळाजी**—सेनापतिसाहेब, एक विपरीत बातमी ऐकली. त्यामुळें बेचैन होऊन कांही उपाय निघेल तर पहावा म्हणून मुद्दाम आपली गांठ घेण्यास आलो.

**धनाजी**—आणखी जास्त विपरीत तें काय ऐकलेत ? या बादशहास आतां खराच म्हातारचळ लागला आहे. सिहगड काबीज करून तो आतां खुद्द पुण्यांत पाऊसकाळ काढीत आहे. सातारा, पन्हाळा, विशाळगड असे किल्ले त्याने एकामागून एक घेतले. पण आम्हींही कांहीं कमी केलें नाहीं. तो एकएक किल्ला घेऊन पाठ वळतो तों लगेच आम्हीं ते परत घेतले. आपल्या महाराणी ताराबाई बघा मोठ्या चतुर

व हिकमती. अमात्य, प्रतिनिधि, सचिव अशीं बहुमोल माणसें हाताखालीं वागवून त्यांनीं या म्हाताऱ्या बादशहाची अगदी त्रेधा उडवून दिली आहे. मला तर वाटतें इतक्या वर्षांच्या हालअपेष्टा संपून आतां लवकरच शाहू महाराजांस आपण सोडवून आणून त्यांच्या नांवाने आपले राज्य पुनः थोरल्या महाराजांप्रमाणें चालू करूं.

**बाळाजी**—हा आपला उद्देश साफ फसणार अशी मला बातमी लागली तेव्हांपासून माझा जीव कसा तडफडतो आहे.

**धनाजी**—अशी काय ती बातमी की तोंडांत पडत आलेला घांस फुकट जावा ?

**बाळाजी**—त्या बादशहाला आतां कळून चुकलें कीं मराठे आपणांस साफ गिळणार. गेल्या आठवड्यांतला तमाशा आपण पाहिलाच. आपल्या मार्फत मराठे सरदारांची समजूत करण्याचा घाट घालून त्यानें प्रमुख व निवडक मराठे सरदारांना गौरव करण्याच्या हेतूनें भेटीस बोलाविले. सरदार सर्व जमा झाले. ते एकटे दुकटे थोडेच येणार. सर्वजण आपला जमाव घेऊन आले. पंचवीस हजार मराठे फौज जमली. बादशहास धास्ती पडली की हे मराठे आपणांस येथेंच जिवंत पकडतील. लगेच त्यानें झुल्फिकारखानास बोलाविलें आणि तर्बियतखानाचा तोफखाना सज्ज करून तोफा डागणार तो हे मराठे सैनिक चहूंकडे पांगून नाहींसे झाले. पण या बनावामुळे बादशहानें आतां निराळाच डाव आरंभिला आहे. माझे हेर सारखे बादशहाच्या छावणीत राहून त्याच्या जनानखान्यापावेतों जाप्ता ठेवीत घटके घटकेची बातमी मला आणून देतात. कांही तरी मोठें अरिष्ट येणार असें दिसतें.

**धनाजी**—असे कोणते आणखी अरिष्ट आतां येणार ! शाहूला मारून टाकण्याची तर आतां बादशहाची छातीच नाहीं. त्याच्या वडिलांना मारल्याचें पुरेपूर प्रायश्चित बादशहा अजून भोगतो आहे. आम्ही मराठे आतां भरपूर सूड घेण्यास समर्थ आहों हे तो पूर्ण जाणतो.

प्रत्यक्ष झुल्फिकारखान, रूहुल्लाखान वगैरे त्याचे निकटवर्ती सरदार मला भेटतात ते हेंच सांगतात. त्याचे सर्व सैनिक त्याजवर इतके नाराज झाले आहेत कीं हा मरेल तर बरा, म्हणजे आम्ही आज वीस पंचवीस वर्षे ह्या भिकार दाक्षिणेंत येऊन वनवासांत दिवस कंठीत आहों, त्यांतून आमची सुटका होऊन आम्ही सुखानें उत्तरेंत आपल्या बायकापोरांत जाऊन पडूं, असें ते नेहमीं म्हणत असतात.

**बाळाजी**—एवढेच काय पण बादशहाच्या फौजेतले मोठमोठे राजपूत सरदार देखील हा आतां मरेल तर बरा असेंच इच्छीत आहेत. ते उघड उघड म्हणतात कीं बादशहा मेल्याबरोबर हा शिवाजीचा नातू मराठ्यांच्या राज्यावर येणार आणि आम्ही हिंदुपदपादशाहीची स्थापना करणार. पण हीं सुखस्वप्नें आतां कायमचीं लयास जाणार आणि पुनः महाराष्ट्रावर संकट ओढवणार अशीं दुश्चिन्हें दिसत आहेत. हीच गोष्ट मी आपल्या कानावर घालूं इच्छितो.

**धनाजी**—मग असें आणखी कोणते घोर कृत्य त्या बादशहानें योजलें आहे ? बाकी त्याचा मेंदु मोठा सुपीक आहे खरा. अखेरची मजल आली तरी दगलबाजी सुटली नाहीं. सांगा काय ऐकलेत ते.

**बाळाजी**—आतां लवकरच ईद येत आहेना. त्या दिवशीं शाहू महाराजांची सुंता करून त्यांस मुसलमानी धर्माची दीक्षा देणार असा हुकूम सुटला आहे. तयारी होत आहे.

**धनाजी**—अस्सें ? ज्या शिवाजीमहाराजांनीं स्वधर्म स्थापण्याचें कार्य सिद्धीस नेलें त्यांच्या प्रत्यक्ष नातवावर असा प्रसंग येणें म्हणजे काय ? यापेक्षां तो त्यांचा शिरच्छेद करील तरी वाईट नाहीं. पण मुसलमान करणें किंवा जन्मांध बनविणें हे या बादशहाचे नेहमींचेच खेळ आहेत. त्यानें आपल्या भावाची वाट कशी लावली तें जगजाहीर आहे.

**बाळाजी**—मग आपण याला तोड काय सुचवितां? मी असें ऐकतों कीं शाहूराजे व त्यांची मातुश्री यांनीं ही हकीकत कळल्यापासून रडून आकांत चालविला असून अन्नपाणीही वर्ज्य केले आहे.

**धनाजी**—मग बेगमसाहेबांकडे तुमचा वशिला असेल, त्यांचे मार्फत कांहीं परिहार झाला तर पहा.

**बाळाजी**—ते तर मी करतोंच आहें, आणि आतांच मला बातमी आली की बेगमसाहेबांनीं वडिलास अति गळ घातली तेव्हां बादशहांनीं इतकाच फेरविचार सुचविला कीं, एका शाहूराजांच्या बदली तशाच इभ्रतीचे दोन मराठे सरदार मुसलमानी धर्म स्वीकारण्यास तयार होतील तर मी राजांवरची सक्ती परत घेईन. इदीच्या पवित्र दिवशीं मला स्वधर्म-सेवेचें कांहीं तरी पुण्य अवश्य केलें पाहिजे. ती पर्वणी मी फुकट जाऊं देणार नाहीं.

**धनाजी**—असो. दुःखांत एवढेंच सुख मानायचें. पण असे दुसरे दोन सरदार आतां कोठून पैदा करायचे?

**बाळाजी**—त्यासाठींच तर मी आपल्याकडे आलों. राजांवरचा प्रसंग टाळण्यासाठीं दोन इसम पैदा करा अशी मातुश्री येसूबाईचीही मला अंतस्थ सूचना आली. त्यांनीं असेंही कळविलें, कीं त्यांचेच बरोबर कैद झालेले प्रतापराव गुजरांचे दोन पुत्र खंडेराव व जगजीवन हे बादशहांचे कैदेत आहेत. त्यांस येसूबाईनी विनंती केली पण ते कबूल होत नाहींत. ते म्हणतात, आम्हांस मोठीशी जागीर ताराबाई साहेबांकडून करार करून मिळेल तर पाहूं. असा निरोप मला आला म्हणून मी तसाच आपले भेटीस आलो. आपण ताराबाईना सांगून गुजर बंधूंना त्यांच्या परळीच्या वतनाजवळच नवीन जागीर देवविली पाहिजे, तरच राजांवरचा प्रसंग टळतो.

**धनाजी**—पंत, तुमची योजना मला समर्पक दिसते. प्रथम या दोघांना बादशहाकडूनच जागीर देववा, म्हणजे तीच आम्ही ताराबाई-कडूनही कायम करून घेऊं.

**बाळाजी**—बादशहा काय ? मुसलमान झालेल्यांना जागीर देण्यास सदैव तयारच असतात. मात्र आपण आपले हातचा तसा लेख गुजरांच्या समजुतीसाठी मजबरोबर द्या म्हणजे त्यांची खात्री पटेल.

**धनाजी**—बरें आहे. हे मी पत्र त्यांस देतों आणि संधि येतांच ताराबाईसाहेबांकडूनही त्यांची सनद आणवीन.

झालें. इदीचा समारंभ झाला. बादशहांनी मोठा उत्सव करून खंडेराव व जगजीवन गुजर यांस मुसलमानी दीक्षा दिली. अबदुर्रहीम व अबदुल रहमान अशी नांवे त्यांस देऊन त्यांस परळीजवळ जागीर नेमून दिली. अशा रीतीनें धर्माची बढती केल्याबद्दल बादशहास परमावधीचा संतोष झाला. शाहू महाराजांना त्यांनी मुद्दाम ममतेने जवळ बोलावून त्यांचा गौरव केला आणि सांगितले, कीं “ राजे, तुमची स्वधर्मनिष्ठा पाहून आम्हास कौतुक वाटतें. तुम्ही आपला धर्म पाळा पण मुसलमानी धर्माचा द्वेष करूं नका. सर्व धर्मांना सारखाच आदर दाखवा. तुम्ही फार सच्चे आहां. आज पंधरा वर्षें तुम्ही आमचे छावणीत कष्ट काढून आमच्यावर प्रेम ठेवितां, आमचे कल्याण चिंतितां. तुमचे आजे महा खाष्ट. केवळ सैतान. त्यांनीं आम्हांस एक क्षण चैन पडू दिले नाही. पण तुम्ही त्यांच्यासारखे नाही. तुम्ही साव. तुमचे भले व्हावे असाच आमचा तुम्हांस आशीर्वाद आहे. आमच्यावर निष्ठा ठेऊन वागा. तुमचे दुष्ट आजे यांनीं आमचा बहुत नाश केला. तो निंद्य मार्ग तुम्ही सोडून आमच्या ताबेदारींत वागूं असें वचन द्या, म्हणजे तुम्हांस दक्षिणचें राज्य करण्यास पाठवून देतों. तसेंच तुम्ही राज्य करूं लागल्यावर मुसलमान इसमास किंवा संस्थांस जीं इनामें आम्हीं करून दिलीं आहेत तीं तशींच पुढें चालवा. बेगमसाहेब आमचे पंजे तुम्हांस देतील त्यांची पूजा करीत जा. ते

सांभाळण्यास खतीब आहेत, त्यांस सदैव आपलेबरोबर वागवा, आणि मागे पुढे आमच्या बादशाहीवर कठिण प्रसंग गुदरल्यास फौजेनिशीं धावून येऊन साह्य करा. असें वागाल तर जगांत तुमचा मोठा लौकिक होईल. आम्ही आतां वृद्ध झालों. आज पंचवीस वर्षे मराठ्यांस जिंकण्याचा उद्योग आम्ही चालविला त्यांत यश आलें नाहीं. आतां मरणापूर्वी हे युद्ध संपवून मराठ्यांची आमची गोडी झाली हे पाहिले म्हणजे आम्ही आतां लवकरच सुखानें इहलोक त्याग करून तुम्हांस दुवा देऊं."

बादशहा असे बोलूनच स्वस्थ राहिला नाही. शाहूला मुसलमान करून त्याला दक्षिणचें राज्य द्यावें असा त्याचा पहिला विचार होता तो अशा रीतीने विफल झाल्यावर, त्याला प्रेमपाशांनी आपल्या अंकित आणण्याचे त्यानें मनांत आणिलें. मराठे अगदींच अनावर झाले, त्यांचा कांहीं तरी बंदोबस्त करून शाहूच्या मध्यस्थीनें त्याजवर आपला शह बसविण्याचा हा बादशहाचा प्रयत्न होता. इकडे ताराबाई संपूर्ण स्वातंत्र्याकरितां लढत होती, त्याला तोड म्हणून शाहूला आपला अंकित करून राज्य करण्यास पाठविलें की त्या उभयतांचा कलह लागून मराठे कमजोर होतील, एवढा एकच उपाय त्यास राहिला. तो आतां त्यानें अमलांत आणिला. शाहू या वेळीं २२–२३ वर्षांचा झाला होता. त्याचे लग्न यापूर्वीच झाले पाहिजे होते. येसूबाई व बेगम यांजकडून मधून मधून त्याच्या लग्नाची वाटाघाट होत असलेली बादशहाच्या कानावर होतीच. त्याने लगेच बेगमेस सांगितले दोन जातिवंत मराठ्यांच्या मुली पहा. आपल्या फौजेंत पुष्कळ मराठे सरदार आहेत. त्यांच्यापैकी उपवर मुली पसंत करून आम्हांस कळवा. म्हणजे लग्नसमारंभ उरकून आम्ही पुण्याचा मुक्काम हालवून लगोलग बाहेर स्वारीस निघणार. धनाजी जाधव व पुण्याचे सरसुभेदार बाळाजी विश्वनाथ यांचाही विचार मुली पसंत करण्याचे कामीं घेऊन निश्चय ठरवाल तो आम्हांस मान्य आहे."

हुकूम झाल्यावर विलंब कसचा! रुस्तुमराव जाधव व सिंदे या दोन सरदारांच्या मुली पसत करण्यांत येऊन शाहूचीं दोन लग्नें एकदम पुणें येथें स. १७०३ च्या मार्गशीर्षांत झालीं. स्वतः बादशहानें त्यांत ममतेनें वडिलकीचा मान घेतला. शाहूच्या जीवनयात्रेतला हा पहिला आनंदाचा प्रसंग होय. धर्मांतर टळले, विवाह होऊन आतां सुटका होणार या आशेनें त्याचे मन प्रफुल्लित झालें. बादशहाच्या पायां पडून त्याच्या आज्ञा यावज्जीव अंतःकरणपूर्वक पाळण्याची शपथ त्याने घेतली. बादशहानें पुत्र कामबक्षाचे स्वाधीन शाहूस केलें आणि आपण स्वारीस निघून गेला.

तथापि आपल्या हयातींत शाहूला गादीवर बसविण्याची बुद्धि बादशहास झाली नाही. त्याचे देहावसान झाल्यावर शाहूची सुटका होऊन तो स्वदेशी आला. ताराबाईशीं लढून त्याने मराठ्यांची गादी तर मिळविली, परंतु पांच पन्नास मैलांपलीकडे राज्य म्हणून कांहीं नव्हतें. हाताशीं नाहीं पैसा, नाही माणसें. चिटणीस खंडो बल्लाळ, सेनापति धनाजी जाधव, परसोजी भोसले असे कित्येक गृहस्थ शाहूस सोडण्याच्या खटपटींत पूर्वीपासून होते, तेवढे मात्र त्यास मिळाले. पैकीं धनाजी व परसोजी अल्पावकाशांत मृत्यु पावले.

बाळाजी विश्वनाथाची व शाहूची ओळख पहिलीच होती. पुणें प्रांताचा सरसुभेदार असतांना बादशहाच्या मंडळीशी स्नेह जोडून किल्ले लढविण्यांत व शाहूचा संभाळ करण्यांत त्याने मराठा राज्याची सेवा अप्रतिम बजावली. राजकारण, हिशेब व मुत्सद्दी धोरण इत्यादि बाळाजीचे गुण शाहूच्या नजरेंत चांगले आले होते. फौजेच्या जोरावर ज्या गोष्टी सिद्धीस जावयाच्या त्या बाळाजी अकलेच्या जोरावर यशस्वी करीत असे. हें पाहून शाहूनें त्यास सेनाकर्ते पद देऊन फौज जमविण्याची आज्ञा केली. अशा खाली पांच वर्षें गेलीं. पण बाहेर कोठेंच

शाहूचा जम म्हणून बसेना. इतक्यांत एक भयंकर बातमी येऊन शाहू अत्यंत कष्टी झाला. पुढे काय करावे हे त्याला सुचेना. लगेच पत्र पाठवून त्यानें बाळाजीस भेटीस बोलाविलें. बाळाजी हजर झाला. त्या प्रसंगीं त्यांचे खालील संभाषण झाले.

**शाहू**—या पंत, तुमचीच वाट पहात आहें. कांहीं नवल विशेष बातमी ऐकली का ?

**बाळाजी**—बारामतीच्या बाजूस असतां उडत वर्तमान आले कीं कान्होजी आंग्रे सरखेल यांनीं लोहगड किल्ला काबीज करून बहिरोपंत पिंगळे प्रधान पत वर होते त्यास पकडलें, आणि कुलाबा येथें नेऊन अटकेत ठेविलें. मला नाहीं वाटत ही गोष्ट खरी असेल म्हणून.

**शाहू**—अहो, अशा बातम्या कोठें खोट्या होत असतात ! बातमी खरीच आहे. इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष कान्होजीनें आपल्या माणसा-बरोबर आम्हास धमकीचे निरोप पाठविले आहेत, कीं सातारा राजधानी खाली करून ताराबाई साहेबांचे स्वाधीन करा, तुमचा राज्यावर हक्क नाही. आम्हीच फौज घेऊन साताऱ्यावर चाल करून येत आहों. आज पांच वर्षें कसाबसा निभाव केला, पण आतां अगदीं सीमा झाली.

**बाळाजी**—महाराज, असा धीर सोडून कसें होईल ? संकटें येतात तेव्हांच माणसांची परीक्षा होते.

**शाहू**—उगाच असे तोंडदेखले बोलूं नका. आम्हांस आतां या राज्यांत आधारच काय उरला आहे ! एकामागून एक संकटें येत आहेत तीं पाहिलीं म्हणजे वाटते अशा या स्थितीपेक्षां बादशहाच्या पदरची कैद काय वाईट. ! तेथे स्वतंत्रता नव्हती हें खरें, पण इतर गोष्टींत बादशहांनीं आम्हांस कांहीं कमी केले नाहीं. पण आतां आम्हांस राज्याचा हा पोकळ डौल सहन होत नाहीं. आजपावेतों कोणाचें आम्हीं वाईट चिंतिलें नाहीं. चुलतीला राज्याची हाव आहे तर खुशाल तें तिच्या स्वाधीन करतों,

आणि अंगास राख फासून जोगी होऊन निघून जातों वाट फुटेल तिकडे! अगर दिल्लीस मातुश्री आहेत त्यांच्याकडे जाऊन त्यांच्या पायाची सेवा करून ईशचिंतनांत आयुष्य घालवीन.

**बाळाजी**—असा धीर सोडून कसें चालेल? आपण सर्व कांहीं असे नामर्द बनलों नाहीं. प्रयत्न करणे आपल्या हातीं, फलदाता परमेश्वर. यांतूनही मार्ग निघणार नाहीं असें थोडेंच आहे!

**शाहू**—आतां मार्ग कसचा निघणार? सेनापति चंद्रसेन जाधव बंडावा करून मातोश्री साहेबांस मिळाले. दमाजी थोरात, कृष्णराव खटावकर यांनीं तर सारखा उच्छेद चालविला आहे. कान्होजी आंग्रे बलवान सरदार ते आमच्यावर उलटले आणि त्यांनी आतां प्रत्यक्ष पेशव्यास पकडून कैदेंत ठेविलें. आतां आमची सत्ता ती काय राहिली?

**बाळाजी**—सगळ्या गोष्टी खऱ्या असल्या तरी आमची अक्कल कांहीं कोणी चोरून नेली नाही ना! थोरल्या महाराजांना काय कमी दगे लोकांनीं दिले! राज्य करणे म्हणजे सुळावरची पोळी आहे. आपण धीर न सोडाल तर यांतूनही मार्ग निघेल.

**शाहू**—पैसा व माणसे हाताजवळ असल्याशिवाय मार्ग कसा काढणार?

**बाळाजी**—आपली आज्ञा असेल आणि आम्हांवर भरपूर इतबार आपला असेल तर याही अडचणींतून आपला निभाव होऊं शकेल.

**शाहू**—मग काय विचारावयाचे आहे बोला. तुम्ही सांगाल ते करण्यास आमची तयारी आहे.

**बाळाजी**—आपणांस माझी सूचना कदाचित् अप्रयोजक दिसेल. पण स्पष्ट सांगितल्याशिवाय कळणार नाहीं. आपण त्याचा अर्थ मात्र भलता घेऊं नये.

**शाहू**—बोला ना स्पष्ट काय तें. आपल्याशीं आमचा कृत्रिमपणा बिलकुल नाहीं.

**बाळाजी**—एवीं तेवीं आज आपणाजवळ पेशवा नाही ना? मग दुसरा इसम लगेच नेमून लोकांस आपण जाहीर करा की एक इसम गेला तर दुसरा पेशवा तयार असून कारभार करण्यास समर्थ आहे.

**शाहू**—पण दुसरा इसम आहेच कोण? तुम्ही घेतां का ही जोखीम अंगावर? घेत असाल तर आमची तयारी आहे. उद्यां तुम्हांस वस्त्रें देतो.

**बाळाजी**—आपला व पेशवेगिरीचा पाठिंबा मला मिळाल्यास कांहीं एक चमत्कार करून दाखविण्याची या सेवकास पूर्ण उमेद आहे. अनेक सावकार व पैसेवाले सहज वश करतां येतील. फौज सरदार सर्व कांही तयार आहे. उलट लोकांस काम काय द्यावयाचें हा प्रश्न आहे. मात्र ही सेवा यशस्वी झाल्यास आपण आम्हांस केव्हांही अंतर देऊं नये; आणि छिद्रान्वेषी लोक नानातऱ्हेनें आपला बुद्धिभेद करतील, तें आपण मनावर घेऊं नये.

**शाहू**—पंत, तुम्ही ब्राह्मण आहां. तुमच्या पायांवर हात ठेऊन वचन देतों, की आमची व्यवस्था तुम्हीं यथायोग्य बजावली तर आम्ही तुम्हांस केव्हांही अंतर देणार नाहीं. मात्र जो काय उद्योग करावयाचा त्यांत सर्व सात्त्विक भाग असावा. स्वहित व परहित दोन्ही साधावी. कोणाचा घातपात किंवा तामसी प्रकार होऊं नये. सदाचार सोडून वागणें आम्हांस केव्हांही मंजूर होणार नाहीं. आमचे वडिलांचा दुष्ट प्रकार या छातीवर सदैव कोरलेला आहे, तो मी कसा विसरणार?

**बाळाजी**—ठरलें तर मग. लागतों उद्योगाला.

**शाहू**—अवश्य. उद्यांच तुम्हांस पेशवेपदाची वस्त्रें देतो. उद्यांचा दिवस व आपला हा उंब्रजचा मुक्काम फलदायी होवो. निराळा मुहूर्त वगैरे पाहण्याच्या भरीस आम्ही आतां पडत नाहीं.

ता. १७ नोव्हेंबर १७१३ रोजीं शाहूनें बाळाजीपंतास पेशवेपदाचीं वस्त्रें दिलीं. लगेच प्रयाण सुरू करून ते आंग्र्यांवर चालून गेले. त्यांनीं आंगऱ्यांची भेट लोहगडाखालीं आलेवणास घेतली. केवळ

तोंडजबानीनें आंगऱ्यांची खात्री केली कीं शाहूमहाराजांचाच पक्ष सबळ व राष्ट्रहितवर्धक आहे. ताराबाईचे पुत्र शिवाजी राज्य करण्यास लायक नाहींत. पश्चिम किनाऱ्यावर आंगऱ्यांस सीदी, इंग्रज, पोर्तुगीज लोक फार उपद्रव देतात, त्यांचे बंदोबस्तासाठी त्यांस साह्य करण्याचा पेशव्यानें करार करून दिला. यथावकाश स्वत: आंग्रे महाराजाचे भेटीस साताऱ्यास आले; आणि दोन महिन्याचे आंत सर्वत्र शाहूचें येवढें बस्तान बसले कीं बाळाजीच्या अकलेची तारीफ खुद्द शाहूच नव्हे तर सर्व जनता करूं लागली. अंतस्थ कारस्थान करून बाळाजीने कोल्हापूरचे गादीवर संभाजीची योजना करून ताराबाई व तिचा पुत्र शिवाजी यांस पन्हाळ्यावर अटकेत ठेविलें. अशा रीतीनें घरचा विरोध कमी होतांच शाहू महाराजांची छाप सर्वत्र बसत गेली.

शंकरजी मल्हार या नांवाचे एक मोठे मुत्सद्दी पूर्वी राजाराममहाराज यांचे पाशीं जिजी येथें सचिव होते. तेथें त्यांचा कांहीं अपमान झाल्यावरून वैतागून ते काशीयात्रेस निघून गेले, पण तिकडे संधि येतांच त्यांनीं दिल्लीचे राजकारणांत लक्ष घालून मोठा लौकिक मिळविला. अंतःकरणांत हेतु एकच कीं, मराठ्यांच्या हातून हिंदुपदपादशाही सिद्ध व्हावी. पुढें दिल्लीचा कारभार पराक्रमी सय्यद बंधूच्या हातीं आला, तेव्हां शंकराजीपंत त्यांचे मुख्य सल्लागार बनले. अंगचे गुण कधीं लोपत नसतात. इकडे दक्षिणेंत बाळाजीपंतनानाची पेशवाईवर नेमणूक झाली, त्याच सुमारास बादशहानें हुसेन सय्यद यास दक्षिणची सुभेदारी देऊन इकडे पाठविलें. त्या वेळीं हुसेन खानानें शंकराजीपंतास इकडचा चांगला माहितगार म्हणून आपल्या बरोबर आणिलें. सय्यदांची सत्ता त्या वेळीं कर्तुमकर्तुं होती. तिचा उपयोग करून मराठी राज्याची व्यवस्था यथायोग्य लावून देण्याचा संकल्प शंकराजीनें योजिला. दक्षिणेंत येतांच त्यानें बाळाजी विश्वनाथाची भेट घेतली. त्या वेळीं पुढील बोलणें झालें.

**शंकराजी**—नमस्कार बाळाजीपंतनाना. आपली गांठ घेऊन मनातल्या गोष्टी बोलाव्या अशी कैक दिवस उत्कंठा लागली होती ती सफळ होण्याचा योग आज आला.

**बाळाजी**—मलाही तशीच आपल्या भेटीची जरूर वाटत होती. कीर्ति ऐकून होतों पण आपला प्रत्यक्ष परिचय नव्हता. कोठे कसें भेटावे या विचारांत असतां एकदम आपला संदेश येतांच कैक दिवसांचे मनोरथ सिद्धिस गेले असें वाटूं लागले.

**शंकराजी**—या गोष्टी योगायोगाच्या असतात. आपली आमची ही भेट हा एक उत्कृष्ट शकुनच समजला पाहिजे. कारण शिवाजी महाराजांचे अपुरे राहिलेले उद्योग आतां आपल्या व शाहू महाराजांच्या द्वारा पूर्ण होणार असें समजण्यास हरकत नाहीं. आज या सय्यदांच्या हातीं संपूर्ण बादशाही सत्ता आहे.

**बाळाजी**—तेंच मी आपणांस विचारणार होतों. शाहूमहाराजांसारखा सत्त्वशील, पापभीरू राजा मिळणार नाही. पण धकाधकीच्या मामल्यांत त्यांच्या या गोड स्वभावाचा निभाव कसा लागावा ? शठंप्रति शाठ्यं ही आजोबांची वृत्ति त्यांच्या ठिकाणी बिलकूल नाहीं.

**शंकराजी**—याच त्यांच्या चांगुलपणावर आपण पुढील व्यूह रचिला म्हणजे झालें. राजकारणांत पुष्कळदां निग्रहाचा उपयोग आहे, तसा अनुग्रहाचाही आहे. त्यालाच आपण वाटल्यास अहिंसा म्हणूं.

**बाळाजी**—पण मी नुकतीच घडलेली गोष्ट सांगू का ? तो दमाजी थोरात कसा पुंड बनला आहे, आपण ऐकलें असेल. बेलभंडाऱ्याची शपथ घेऊन आम्ही त्याचे भेटीस गेलों. तेव्हां त्यानें आमच्यावर कसा प्राणांतिक निकर आणला तें जगजाहीर आहे. म्हणतो काय, बेल म्हणजे झाडाचा पाला आणि भंडारा म्हणजे हळद ती तर आम्ही रोज खातों. पुढें त्याच्याशीं समेट करण्याच्या हेतूनें आम्ही मोठ्या प्रयत्नानें वचन देऊन त्यास महाराजांचे भेटीस आणिलें. आम्ही सूचना केली आतां

हा सांपडला आहे तर त्यास कोठें तरी किल्ल्यावर अडकवून ठेवावा, पण महाराजांनीं तें मान्य केलें नाहीं. खुशाल त्यास सोडून दिलें. आतां पुनः तो पुंडाई व दंगा पूर्ववत् करीत आहे. अशा दंगेखोरांना ठेचूनच काढलें पाहिजे.

**शंकराजी**—एखाद्या व्यक्तीची गोष्ट सोडून द्या. पण दक्षिणेंत आल्यापासून एक मोठी गोष्ट माझे नजरेस आली ती अशी कीं पंचवीस वर्षे बादशहांशीं लढून मराठे सरदार व लोक सर्वच बेफाम झाले आहेत. त्यांस कांहीं तरी भरीव कार्यभाग दाखवून त्यांत गुंतवून दिल्याशिवाय तुमच्या राज्याची व्यवस्था लागणार नाहीं.

**बाळाजी**—पण असा कार्यभाग आणावयाचा कोठून? कृष्णेपासून भीमेपर्यंतच्या या लहानशा प्रदेशांतच काय तो आमचा वावर. या टापूच्या बाहेर पाऊल घालण्याची सोय नाहीं.

**शंकराजी**—तशी कांहीं शक्कल आम्हीं सुचविली तर ती स्वीकारण्याची तुमची तयारी आहे का?

**बाळाजी**—अलबत. कां नाहीं असणार. मात्र सर्व कार्यभाग चहूंकडून व्यवस्थित जुळून आले पाहिजेत.

**शंकराजी**—कार्यभाग कांहीं आपोआप नाहींत जुळून येत. ते आपण होऊन मुद्दाम जुळविले पाहिजेत.

**बाळाजी**—मग आपण काय सुचवितां?

**शंकराजी**—हें पहा. हे सय्यद बंधू महापराक्रमी आहेत. त्यांचें व बादशहाचें अत्यंत बितुष्ट आलें आहे. यांस मारून टाकावें, असा बादशाहचा प्रयत्न चालू आहे. आज दक्षिणचा व एकंदर बादशाहीचा कारभार हे मुख्त्यारीनें करीत आहेत. चार दिवसांपूर्वी मला हुसेन सय्यदानें मुद्दाम बोलावून विचारलें. या दुष्ट बादशहाला काढून दुसरा लायक इसम गादीवर बसवावा असा प्रयत्न आम्हीं केल्यास आम्हांस त्या

कामीं मराठ्यांचे साह्य मिळूं शकेल काय ? याचा अंदाज काढण्यासाठीच मी आज मुद्दाम आपल्या भेटीस आलो.

**बाळाजी**—आपली सूचना दुसऱ्या एका दृष्टीनें विचारार्ह दिसते. आपणांस माहीत आहे कीं महाराजांची मातुश्री, कबिले व माणसें दिल्लीस बादशहानें ओलीस ठेविली आहेत, त्यांस सोडवून आणण्याची उत्कंठा महाराजांचे मनांत अहर्निश वागत असून त्यांची त्याबद्दल सारखी टोचणी आमचेकडे चालू आहे. ही त्यांची इच्छा तृप्त झाली तर महाराज वाटेल तें साहस स्वीकारण्यास कबूल होतील.

**शंकराजी**—झाले तर मग. आज त्या सर्व गोष्टी साधतील. सय्यदांची मदत करून आपण त्यांजवर उपकार केलासें होईल. हे सरदार इकडे दंगा करीत आहेत, त्यांस बाहेर काम मिळेल. खर्च सर्व देण्यास सय्यद कबूल आहेत. महाराजांच्या मातुश्रीस सोडवितां येईल, आणि अनायासें दिल्लीच्या राजकारणांत मराठ्याचा शिरकाव होऊन त्या योगानें हिंदुपद-पातशाहीचा फैलाव करितां येईल.

**बाळाजी**—पण दिल्लीपावेतों मराठी फौजा नेण्याइतके सामर्थ्य महाराष्ट्रांत आहे असें आपणांस वाटतें ? नाहीं तर लहान तोंडीं मोठा घांस घेतल्यानें सर्वच गमावण्याची पाळी यावयाची. शिवाय दिल्लीचे मोठमोठे उमराव व बादशाहाच्या पदरचे पराक्रमी राजपूत सवाई जयसिंग, अजितासिंग वगैरे विरोध करूं लागल्यास त्या सर्वांपुढें आपल्या लहान फौजेचा निभाव कसा लागेल याची मला चिंता वाटते.

**शंकराजी**—तशी चिंता करण्याचें कांहीं कारण नाहीं. आपणांस बादशाहीचा मोठा भ्रम वाटतो. पण बडें घर पोकळ वासा, अशी तेथील हल्लीं स्थिति आहे. औरंगजेबाच्या हयातींतच हा प्रकार लोकांस उघड दिसूं लागला होता, आणि आतां तर बादशाही सर्व कोसळून पडत आहे. पूर्वीचा मोगलांचा पराक्रम सर्व लयास गेला. आतां तेथें नेभळटांचा बाजार

झाला आहे. सय्यदबंधू तेवढे पराक्रमी आहेत. त्यांचे मार्फत आपणांस पाहिजे तें साध्य करतां येईल.

**बाळाजी**—पण राजपूत राजे आम्हां मराठ्यांस अनुकूल होतील की विरोध करतील ?

**शंकराजी**—राजपूत राजे तर सर्व आधींच बादशाहीवर उठले आहेत. आपणांस ठाऊक नाही का, की त्यांनीं सुद्धां औरंगजेबाच्या जुलुमास कंटाळून स्वधर्माचा उद्धार करण्याची तयारी केली असून मुसलमानांकडे आपल्या मुली देण्याचा प्रघात अजिबात बंद केला आहे. दोन वर्षें त्यांनीं पुष्करास जमून आणाशपथा घेऊन करार ठरविले आहेत. शाहूमहाराजां-बद्दल तर त्यांना अत्यंत आदर वाटतो. औरंगजेब जिवंत असतांपासूनच त्यांची अशी भावना आहे की हा शिवाजीचा नातू आपल्या आजोबाचे मनोरथ पुरे करणार. सारांश, हे राजपूत आपणांस मदत करण्यास एका पायावर तयार होतील. त्यांस आपण दुखविले नाहीं म्हणजे झालें.

**बाळाजी**—राजपुतांस यत्किंचित् दुखवण्याची कोणाची इच्छा नाहीं. उलट ते व आपण मिळून हिंदुपदपातशाहीच उठवून देऊं. मात्र असें करितांना बादशाहीचा देखील बचाव व्हावा अशी कांहीं तरी योजना केली पाहिजे. आपणांस माहीत असेलच, महाराजांनी औरंगजेबास शपथ दिली आहे, की आपण बादशाहीचे साह्य करूं, उलट उठणार नाही. ही शपथ जीव गेला तरी महाराज मोडणार नाहीत.

**शंकराजी**—मग त्यासही कांही हरकत नाही. बादशाही मोडण्याचें कारण नाहीं. उलट तिचा संभाळ करणेच श्रेयस्कर. म्हणजे मुसलमानांचाही विरोध आपणांस होणार नाहीं. नवीन देवालय बांधण्या-पेक्षां जुन्याचा जीर्णोद्धार करणें जास्त पुण्यप्रद होय, ही जी महाराजांची भावना तीच आपण अंमलांत आणूं. कारभार व मुखत्यारी आपले हातीं

असली म्हणजे पुरे. मग दिल्लीच्या सिंहासनावर प्रत्यक्ष हिंदु राजाच बसला पाहिजे असें नाहीं.

हें जें या मुत्सद्यांचें पुढील उद्योगासंबंधाचें धोरण ठरलें त्यास सय्यदानें लगेच मान्यता दिली. सह्या होऊन करार पुरे झाले. बाळाजी विश्वनाथ, पुत्र बाजीराव, सेनापति खंडेराव दाभाडे, संताजी व राणोजी भोसले असे अनेक पराक्रमी सरदार मोठमोठ्या फौजा जमवून दिल्लीवर जाण्यास सिद्ध झाले. स. १७१८ च्या दसऱ्यास स्वारी निघाली. दररोज ५० हजार रुपये मराठ्यांचे खर्चास मिळत गेले. महिना पंधरा दिवस दिल्लीत मुक्काम करून स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखीच्या सनदा बादशाही शिक्क्याच्या पैदा करून मराठे परतले, ते पुढच्या मृगसालास महाराजांपाशीं साताऱ्यास दाखल झाले. मातुश्री येसूबाई व मदनसिंग वगैरे सर्व मंडळी सुखरूप परत येऊन महाराजांचे मनोरथ सिद्धीस गेले. दिल्लीपावेतों मराठ्यांचा दरारा बसला. राजपूत राजे महाराजांच्या भजनी लागले. नवल नाहीं कीं शाहूला आपला प्रधान बाळाजी विश्वनाथ अतुल पराक्रमी सेवक वाटूं लागला.

## १०

# योग्य निवड



**तेजसां हि न वयः समीक्ष्यते।**

शिवाजीमहाराजांच्या पश्चात् मराठ्यांचें राज्य अनेक संकटांतून निभावून टिकून राहिले आणि महाराजांचा नातू शाहू छत्रपतिपदावर दाखल झाला, तेव्हां एकंदर राष्ट्राला मोठें समाधान वाटूं लागलें. आरंभींचीं पांच चार वर्षे शाहूची परिस्थिति अत्यत बिकट होती. पुढें स. १७१३ मध्यें बाळाजी विश्वनाथास पेशवाई दिल्यापासून उत्तरोत्तर शाहूचा जम चांगला बसत गेला. बाळाजीनें मोठ्या चातुर्यानें मराठी राज्याची विसकटलेली घडी नीट बसविण्याचा आरंभ केला. लोकांकडील वसूल सुरळीत होऊं लागल्याने द्रव्याची अडचण दूर झाली. बाळाजीने मराठी फौजा दिल्लीपावेतो नेऊन शाहूच्या मातुश्रीस सोडवून आणिलें, आणि स्वराज्य–चौथाईच्या सनदा मिळवून मराठ्यांच्या सार्वभौम-सत्तेचा आरंभ करून दिला. पण ही व्यवस्था पुरी होण्यापूर्वीच बाळाजीपंत नाना एकाएकीं सासवड येथें ता. २ एप्रिल, १७२० रोजीं मरण पावला.

बाळाजीपंताच्या या आकस्मिक निधनानें शाहूमहाराजांना फार दु:ख झालें आणि पुढें काय करावें याची विवंचना उत्पन्न झाली. त्यांजजवळ लहान मोठे सरदार पुष्कळ होते. सेनापति खंडेराव दाभाडे, प्रतिनिधि श्रीनिवासराव, नारो राम मंत्री, कान्होजी आंगरे, कान्होजी भोसले अशांसारखी अनेक मंडळी आपापल्यापरी महाराजांचें व राज्याचें

हित पाहणारी होती. पण या सर्वांना एका सूत्रांत गोवून एकंदर राज्यकारभाराचें बाळाजीने ठरविलेले धोरण पुढे चालवील असा पेशवाईच्या लायक इसम महाराजांस कोणी दिसेना, कीं ज्याच्यावर भार टाकला असतां आपणांस निश्चित राहतां येईल. बाळाजीपंताच्या पश्चात् पेशवेपदावर कोणाची नेमणूक करावी म्हणजे राज्याची सर्व कामें सुरळीत चालू राहतील हाच विचार अहोरात्र महाराजांच्या मनांत घोळूं लागला. शाहूमहाराज स्वत: एक प्रकारें अहिंसेचे पुरस्कर्ते होते. रणांगणावरील शौर्यानें किंवा जबरदस्तीने लोकांवर धाक बसविण्याची त्यांना इच्छा नव्हती. परोपकार, दया, कृतज्ञता इत्यादि बंधनांनीं निरनिराळ्या व्यक्तींना वश करावें असें त्यांचें मन त्यांना सांगे, आणि त्यांना ती हातोटीही चांगली साधली होती. पण राज्य सुरळीत चालण्याला या गुणांबरोबर रणांगणावरील शौर्याचीही जरुरी असतेच. तेव्हां तेवढी उणीव आपल्या मनाजोगती भरून काढील असा कोणी तरी इसम त्यांना पाहिजे होता.

शिवाय त्यांना असेंही वाटे कीं बाळाजीपंताचे आपल्यावर अनंत उपकार झाले आहेत. ते होते म्हणूनच या स्थितीस आपण पोंचलों. त्यांच्या उपकारांची फेड त्यांच्या हयातींत आपल्या हातून झाली नाहीं ही जाणीव त्यांस होती. शाहूमहाराजांचा दरबार म्हणजे एक प्रकारचें खाजगी कुटुंब बनलेलें होते. पदरच्या माणसांना केवळ नोकर म्हणून न वागवितां सर्व मंडळीच आपल्या घरची निकट संबंधाची आहेत अशा धोरणानें महाराज सर्वांशीं वागत, त्यांच्या बायकांमुलांचा परामर्ष घेत, आणि लग्नकार्यादि प्रसंगीं सढळ हातानें त्यांना मदत करीत. अर्थात् बाळाजीपंतांच्या कुटुंबांतील व आप्तांतील लहानमोठी मंडळी त्यांच्या चांगली परिचयाची होती. मनुष्याची पारख तर ते जणूं उपजत बुद्धीनेंच करीत. कोणीही मनुष्य पाहिला कीं त्याच्या चालचर्येवरून त्याची लायकी ते तत्काळ ओळखीत. या बाबतींतील त्यांचे अंदाज त्यांच्या एकंदर हयातींत कधीं चुकले नाहींत. मराठेशाहींत जीं हजारों माणसें उत्तरोत्तर

क्रमाक्रमानें प्रसिद्धीस आलीं त्यांचा उगम शाहूमहाराजांच्या वेळेस झाला. ही एकच गोष्ट लक्षांत घेतल्यास महाराजांच्या अंतर्दृष्टीची व उदार वृत्तीची खात्री पटेल. असो.

बाळाजीपंताच्या मृत्युसमयीं बाजीरावाला विसावें वर्ष चालू होतें, धाकटा भाऊ चिमाजी सहा वर्षांनीं लहान होता. एक मुलगी भिऊबाई बाबूजी नाइकाचा भाऊ आबाजी जोशी यास दिली होती आणि दुसरी अनुबाई इचलकरंजीच्या घोरपड्यांकडे दिलेली होती. हे दोघे जांवईही तसेच लायक होते. बाळाजीच्या कुटुंबाचा मुख्य गुण शाहूच्या नजरेला आला होता, तो हा कीं ही सर्व मंडळी अत्यंत यशस्वी आहेत. कोणतेंही बिकट काम सांगितलें तरी तें उल्हासानें पूर्ण करून दाखविणें हाच त्यांचा स्वभावधर्म. सबबी सांगून वेळ मारून नेणें त्यांना माहीत नव्हतें. हात लावतील त्याचें सोनें करतील अशी त्यांच्या अंगीं एक प्रकारची किमयाच होती. तेव्हां या सगळ्या गोष्टींचा विचार करून आणि दूरचें धोरण मनांत आणून बाळाजीच्या पश्चात् बाजीराव अल्पवयी असतांही त्यासच पेशवाईपद द्यावें असा विचार महाराजांनी आपल्या मनांत पक्का ठरविला.

इकडे इतर सरदार व मुत्सद्दी यांचेंही आतां पेशवेपद कोणाला मिळतें इकडे सारखें लक्ष लागलेलें होतें. ज्याला त्याला आपण पुढें यावें अशी इच्छा होतीच, आणि त्या दृष्टीनें प्रत्येकाची आपापल्यापरी महाराजांशीं त्यासबंधानें वाटाघाटही चालली होती. महाराजांनीं मात्र आपल्या मनाचा थांग कोणालाही लागूं न देतां सर्वांचें मनोगत भरपूर काढून घेतलें. त्यांत त्यांना असें आढळून आलें, कीं बाजीरावासारख्या अल्पवयी मुलाला पेशवाईवर नेमल्यास त्याला सर्वांचा मोठा विरोध होणार, आणि त्यामुळें आपला किंवा राज्याचा फायदा होण्याऐवजीं उलट आतां राज्यांत भयंकर द्वेष व विघ्न उपस्थित होणार. तेव्हां ही अडचण कशी टाळावी आणि आपण योजलेल्या बेतालाच सर्वांची

संमति कशी मिळवावी याचा त्यांनीं आपल्या मनाशीं विचार करून एक योजना निश्चित केली आणि ती ताबडतोब अमलांत आणली.

बाळाजीपंताचें निधन एप्रिल दोन तारखेस झालें. दोन आठवडेपावेतों अशौच-निवृत्ति होऊन उत्तरकार्य यथाविधि पार पडलें. लगेच पंधराव्या दिवशी कऱ्हाडनजीक मसूर येथे महाराजांचा मुक्काम होता, तेथें एक मोठा दरबार भरवून पेशवाईचीं वस्त्रें देण्याचे त्यांनीं ठरविलें आणि या दरबाराला राज्यांतील लहान मोठ्या सरदारांना आमंत्रणें पाठविलीं. या जागीं कोणाची नेमणूक होणार याची उत्कंठा प्रत्येकाचे अंतःकरणांत उचंबळूं लागली.

या दरबारचा थाट अनेक दृष्टींनीं अपूर्व होता. दरबारासाठीं एक भव्य तंबू उभारण्यांत आला. सभोवारचे पडदे किनखापी होते. खांबांना रंगीबेरंगी सुंदर कपडे आच्छादून शोभा आणली होती. मध्यभागीं महाराजांचे सिंहासन असून समोर व डाव्या उजव्या बाजूला ज्याच्या त्याच्या दर्जाप्रमाणें व इतमामाप्रमाणें प्रत्येक सरदाराची बसण्याची व्यवस्था केली होती. चैत्र वद्य ६ रविवार हा दिवस उजाडला. दरबारची वेळ सकाळीं आठ वाजण्याची होती. सूर्योदयापासूनच एकेक सरदार, मानकरी व अधिकारी आपापल्या दर्जाप्रमाणें दरबारी पोषाखानें येऊन ठरलेल्या जागीं बसले. देखावा मोठा अपूर्व होता. प्रत्येकाचें अंतःकरण आतां पुढें काय प्रकार होतो हें जाणण्यासाठीं आतुर झालें होतें. चार घटका दिवसास महाराजांची स्वारी "सिंहासनाधीश्वर श्रीछत्रपति शाहू-महाराज की जय!" अशा उच्च घोषांत तंबूंत येऊन दाखल झाली. सर्वांनीं त्यांना उत्थापन देऊन यथाक्रम मुजरे वगैरे केले आणि स्वारी आसनस्थ झाली. सर्वांचें लक्ष महाराजांकडे लागलें आणि जो तो आतां महाराजांच्या मुखांतून काय शब्द निघतात ते ऐकण्यासाठीं उत्सुक झाला.

इतक्यांत महाराज एकदम नेहमींचा प्रघात सोडून सिंहासनासमोर पुढें येऊन बोलूं लागले. सर्वांना त्यांनीं खुणेनेंच आपापल्या जागीं बसून

राहण्याची सूचना दिली आणि आपल्या भाषणाला सुरुवात केली. महाराज स्वतः मोठेसे विद्वान् नव्हते, पण प्रेमळपणा आणि कळकळ यांनीं विद्वत्तेची उणीव भरून निघत असल्यामुळे त्यांचे भाषण त्या वेळीं अत्यंत परिणामकारक झाले. महाराज म्हणाले,

"आज आपण कशाकरितां येथे जमलों आहों हें तुम्ही सर्व जाणतच असाल. पेशवे बाळाजीपंत आपले काम अर्धेच टाकून एकाएकीं स्वर्गवासी झाल्यामुळें राज्याची केवढी हानि झाली आहे हें माझ्याप्रमाणें तुम्हां सर्वांना माहीत आहे. पण हा मृत्युलोक असल्यामुळे झालेल्या हानीबद्दल केवळ शोक करीत बसण्यांत अर्थ नाहीं. काल त्यांच्या उत्तरक्रियेचें गोड जेवण झाले, त्याचा धार्मिक उद्देश आपल्या लक्षांत आला असावा. आतां आपणाला पुढील विचार ठरवावयाचा आहे. आज पंधरा दिवस अहोरात्र आम्हांलाही एकच चिंता लागून राहिली आहे की हा राज्याचा भार आतां कोणाच्या शिरावर द्यावा. बाळाजीपंतांनीं योजलेली कार्यें पुढे चालविण्याचे काम कोणावर सोपवावें? आपण येथें जमलेले सर्व लोक राज्याचें हित कशांत आहे हें जाणतां, मीच तें सांगितलें पाहिजे असें नाहीं. तुम्ही एकाहून एक पराक्रमी आहां. सर्वांचें संगोपन करून राज्याचा उत्कर्ष घडवून आणणे तुम्ही व आम्ही आपलें मुख्य कर्तव्य समजतों. पण आज आमच्या मनाची स्थिति मोठी चमत्कारिक झाली आहे. प्रत्येक इसमाच्या उद्योगाला व पराक्रमाला क्षेत्र कसें मिळू शकेल, आपल्या राज्याचे हित कशानें होईल, त्याचा उत्कर्ष कसा घडून येईल हीच चिंता आतां सर्वांनीं वाहिली पाहिजे. भविष्यकाळाच्या उदरांत काय आहे हें कोण सांगू शकणार? पण एक गोष्ट निर्विवाद आहे, कीं आपण हातीं घेतलेल्या कार्याला सर्वांनीं अंतःकरणाच्या सद्भावनेचा नेट दिला तरच त्यांत यश येईल. सर्व काम एकजुटीनें झालें पाहिजे. बाळाजीपंत नानांचे आमच्यावर जे अनंत उपकार झाले आहेत त्यांची फेड करणें आम्हांस अगत्य वाटतें. त्यांचे

पुत्र बाजीराव हुशार आहेत, तरतरीत आहेत. बापाप्रमाणें ते पराक्रम गाजवितील असे आमचे मन सांगतें; आणि आम्हांला वाटतें तुम्हांपैकीं प्रत्येकाचीही तशीच खात्री असावी. पण ते आज अल्पवयी आहेत, तेव्हां तुमच्या सर्वांच्या साह्याशिवाय त्यांना राष्ट्रकार्य नेटाने पुढें चालवितां येणार नाहीं. आज तुम्हां इतक्यांना इथे बोलावण्याचें प्रयोजन हेच. बाजीराव अल्पवयी आहेत हा कांही त्यांचा दोष नव्हे. आपण सर्व जण असेच लहान होतों. अंगावर काम पडलें म्हणजे मनुष्य अनुभव घेतां घेतां शहाणा होतो आणि त्याचा पराक्रम वाढीला लागतो. अशा अनेक व्यक्तींच्या पराक्रमामुळेंच राज्याची वृद्धि आणि राष्ट्राचा उत्कर्ष होतो हें तुम्हाला सांगावयाला नकोच. काय असेल ते असो, पण हा तरुण मुलगा आपल्या राज्याचा विस्तार करील आणि राष्ट्राचें वैभव वाढवील अशी आमच्या मनाची खात्री आहे. येथें जातीचा प्रश्न नाहीं. हा मराठा, हा ब्राह्मण, हा कोंकणस्थ, हा देशस्थ असले विचार या वेळीं कोणी मनांतही आणूं नयेत. हा आपलाच मुलगा आहे असे सर्वांनी समजावें. बाळाजीपंताच्या मागून त्यांच्या चिरंजीवाला पेशवेपद दिल्यानेंच राज्याचें कल्याण होईल अशी आमची मनोदेवता सांगत असल्यामुळें त्यांनाच हें पद देण्याचें आम्हीं योजिले आहे. तेव्हां आपण येथें जमलेल्या व जे येथे हजर नाहींत त्या बाहेरच्या मंडळींनींही मनोभावानें आमच्या योजनेला पाठबळ द्यावें. ही एकच गोष्ट आपणां सर्वांपुढें आम्हीं पदर पसरून मागत आहो.

तुम्हीं म्हणाल, 'आपण ठरवाल ती गोष्ट तडीला न्यालच, त्यांत आमचें मत कशाला पाहिजे ?' पण तसें नाहीं. मनात आणलेली गोष्ट सिद्धीस नेण्याचे व कोणी विरोध केला तर त्याला शासन करण्याचें सामर्थ्य आमच्या अंगीं आहे ही गोष्ट खरी; पण आम्हांला कोणतीही गोष्ट जबरदस्तीने अगर दंडाच्या धाकानें अंमलांत आणण्याची इच्छा नाहीं. आम्हीं ठरविलेली ही योजना कोणाला पसंत नसेल तर ती कां पसंत

नाहीं त्याचीं कारणें इथें खुशाल स्पष्ट सांगावी, आम्ही त्यांचा विचार करूं. तसेंच कोणाला विरोध अगर द्वैतभाव दाखवायचा असेल तर तोही उघडपणे येथेच पुढे येऊन बोलून दाखवावा; आणि तसें नसेल तर मात्र बाजीराव हे आपलेच आहेत असे नेहमी मनांत वागवून त्यांना सदैव साह्य करूं, अशी शपथ प्रत्येकानें इथे थोरल्या महाराजांच्या पायांचें स्मरण करून आम्हांपुढे घ्यावी. या कामीं कोणी अनमान करील त्याला या मराठी राज्याची पर्वा वाटत नाहीं असें आम्ही समजूं."

इतकें बोलून महाराज थोडा वेळ स्तब्ध राहिले. त्या पुण्यश्लोक महात्म्याचे हे कळकळीचे शब्द सर्वांच्या अंतःकरणास जाऊन भिनले. त्यांचें हें भाषण इतके आपुलकीचे व प्रेमाचे होतें की त्यांना विरोध करण्याचें पूर्वी कोणाच्या मनांत असलें तरी तो भाव आतां जागच्या जागीं विरून गेला. समोर उठून महाराजांच्या इच्छेस विरोध करण्याची कोणालाही छाती झाली नाहीं. तेव्हां शेवटी महाराजांनी पुनः एकदां सर्वांना प्रेमानें बजावलें, कीं आमचा हा विचार ज्या अर्थी सर्वांना पसंत आहे, त्या अर्थी आतां एकेकानें पुढें येऊन गादीला वंदन करून बाजीरावांना मनोभावानें साह्य करण्याचें आश्वासन द्यावें. त्याप्रमाणें एकेक सरदार पुढें झाला, तसेच गादीला मुजरा करून आणि स्वामीच्या पायावर हात ठेवून बाजीरावांना पेशवा म्हणून मान्य करण्याचें वचन देऊन आपापल्या जागीं जाऊन बसला.

यानंतर महाराजांनी बाजीरावाला पुढें बोलाविलें आणि त्यांस उद्देशून ते म्हणाले, "आम्ही हा जो इतबार तुमच्यावर टाकीत आहों तो खरा करून दाखवा. वडिलांच्या कीर्तीत भर घाला. मराठ्यांचें सामर्थ्य सर्वांना जाणवेल आणि मराठ्यांचे साम्राज्य आपल्या या भरतभूमीवर विस्तार पावेल अशी कर्तबगारी करा." अशा प्रकारचा त्यांना उपदेश केल्यावर लगेच ठरलेल्या रिवाजाप्रमाणें आगाऊ तयार करून ठेवलेला

पोशाख व पेशवाईचीं वस्त्रें महाराजांनी स्वहस्तें बाजीरावाला पुढें बोलावून दिलीं आणि सर्वांना हारतुरे दिल्यावर पानसुपारी व अत्तर-गुलाब होऊन हा दरबार बरखास्त झाला.

महाराजांनीं विश्वासानें बाजीरावावर लहानपणींच सोंपविलेले हें कार्य त्यानें पार पाडून केवढें यश संपादिलें हे महाराष्ट्राच्या पुढील इतिहासांत पाहावयास मिळतें.

# ११

# पहिलें सीमोल्लंघन



**बाजीराव चिमाजीआपास लिहितो, "गिरिधर बहादर वहमें करून युद्धास आला, त्याचें आपलें युद्ध बहुत जाहालें, निदानीं त्यास सेनासहवर्तमान बुडवून यश प्राप्त जाहलें हें वर्तमान तपशिलें लिहिलें तें कळलें. वडिलांचे व धन्याचे पुण्येंकरून शत्रूचा पराजय केला यावरून बहुत समाधान जाहलें. श्री सदैव तुम्हांस याच प्रकारें यशस्वी करो."**

हिंदूंच्या सणांमध्यें वर्षांतील सर्वांत मोठा ऐश्वर्याचा दिवस म्हणजे विजयादशमी हा होय. विजय संपादन करायला हा मुहूर्त आपल्या आर्यधर्मांत अगदी प्राचीन कालापासून यशस्वी गणला जातो. सीमोल्लंघन करायचें आणि सोने लुटून आणायचें हे दोन हेतु या सणाच्या मुळाशीं आहेत. हें सीमोल्लंघन जसें शारीरिक तसें पुष्कळ वेळां बौद्धिक व नैतिकही असूं शकतें आणि सुवर्ण लुटून आणायचें तें पिवळ्या धातूच्या तुकड्यांचेच असले पाहिजे असे नाहीं. नानाप्रकारच्या विद्या आणि कला हें एक प्रकारचें धनच आहे आणि तें कमींत कमी वेळांत जास्तींत जास्त संपादन करणे ही एक प्रकारची उत्कृष्ट करामत समजली जाते. जगाचे व्यवहार अशा प्रकारच्या लुटीवरच चालले आहेत. अशोकादि पराक्रमी पुरुषांनीं पूर्वी खरें सीमोल्लंघन करून सर्व आशिया खंडास बुद्धधर्माचा बहुमोल प्रकाश पुरविला. अशाच प्रकारचें सीमोल्लंघन शंकराचार्यांनींही केले. कोलंबसानें अमेरिका खंड शोधून काढतांना जें सीमोल्लंघन केलें त्यानें तर सोन्याचा नवीन पूर उत्पन्न करून जगाचा भावी इतिहास साफ बदलून टाकिला.

मराठ्यांच्या इतिहासाकडे पाहिले तर शिवाजीमहाराजांनीं सीमोल्लंघनाचा खरा अर्थ समजून घेतला म्हणूनच त्यांना स्वराज्यस्थापना करतां आली, आणि त्यांची अतृप्त राहिलेली इच्छा पुढें पेशव्यांनीं पुरी केली ती तरी त्यानी सीमोल्लंघनाचा खरा अर्थ जाणला म्हणूनच. पेशवा बाळाजी बाजीराव व त्याचा भाऊ राघोभरारी हे अटकेवर जातांना 'आम्ही शिवाजीमहाराजांचे बच्चे आहों' अशी फुशारकी मारीत, त्याचा अर्थ आम्ही शिवाजीमहाराजांचे कार्य पुढे चालवायला निघालों आहोंत असाच समजला जात होता. आणि त्यांच्या पूर्वी बाळाजीपंत नानांनीं मराठ्यांस दिल्ली राजधानीचे दर्शन प्रथम घडविलें ते सीमोल्लंघनाची हाव बाळगली म्हणूनच. पण त्याची सार्थकता विशेष त्वरेने आणि तडफेनें करून दाखविण्याचे भाग्य बाळाजीचे दोघे पुत्र बाजीराव आणि चिमाजीअप्पा यांना लाभले. तिशीच्या आंतील या दोन तरुणांची कामगिरी मराठी राष्ट्राला मोठी भूषणावह झाली.

हिंदुस्थानचा सतराव्या शतकाचा इतिहास मुख्यत: औरंगजेब बादशहानेच बनविला असें म्हणण्यास हरकत नाही. त्याचा उद्योग, त्याची शिस्त, त्याचे राज्यकारभाराचे कौशल्य व दक्षता इत्यादि त्याच्या अंगचे गुण अप्रतिम होते. आपणास परमेश्वराने स्वधर्माच्या सेवेसाठीं निर्माण केले असून परधर्मीयांचा पाडाव करून मूर्ति-मंदिरे फोडून इस्लामाची महति वाढवावयाची हेंच त्याने आपलें जीवितसर्वस्व मानले आणि जन्मभर त्याचाच पुरस्कार केला. ही त्याची मोठीच राजकारणी चूक झाली आणि त्यामुळेंच त्याला व त्याच्या राज्याला विपन्नदशा आली. हा दुराग्रह त्याचे अंगी नसता तर मराठ्यांना त्याच्या विरुद्ध उठण्याचे प्रयोजनही उरलें नसते. त्याच्या एकंदर कारभाराचें सूक्ष्म अवलोकन करून त्यांतले गुण व दोष त्याच्या पश्चात् ज्या दोन व्यक्तींनीं बरोबर ताडले त्या व्यक्ति म्हणजे एक बाजीराव व दुसरा त्याचाच समकालीन निजामउल्मुल्क. या दोघांनीं अठराव्या शतकाचा हिंदुस्थानचा इतिहास बनविला. धर्मानें

एक हिंदू व दुसरा मुसलमान. वयानें मात्र त्यांच्यांत मोठीच तफावत होती. निजाम बाजीरावाहून अठ्ठावीस वर्षांनीं मोठा होता.पण तरुण बाजीरावानें त्यास चांगलाच हात दाखविला. बाजीरावाची तडफ व निजामाचें कपट या दोन भिन्न प्रवृत्तींचा झगडा जगास स्पष्ट दिसून आला.

निजाम उल्मुल्क सर्वस्वीं औरंगजेबाच्या तालमीत तयार झाला होता. सर्व सामर्थ्य खर्च करून मराठ्यांचा पाडाव करण्याचे पूर्वीचे बादशहाचें धोरण त्यानें तंतोतंत पुढें चालविलें. याच्या उलट बाळाजीपंत नानानेही औरंगजेबाचा दक्षिणेंतील एकंदर कारभार, त्याचे मराठ्यांशीं चाललेले युद्ध व एकमेकांचे डावपेंच वीस पंचवीस वर्षेंपावेतो चांगल्या रीतीनें पाहिले होते आणि मुसलमानी धर्माचा द्वेष न करतांही मराठी सत्तेचा उत्कर्ष घडवून आणतां येईल ही भावना त्यानें आपल्या मनश्चक्षूंपुढें सारखी वागविली होती. खुद्द शाहूमहाराजांची अशी भावना असल्यामुळें तिचा उपयोग राजकारणांत करून मराठी राज्याची वृद्धि व्हावी असें धोरण बाळाजीने ठरविलें. बाळाजी अकालीच मरण पावला. पण त्याचें मनोगत त्याचा पुत्र बाजीराव याच्या ठिकाणी पूर्णपणें उतरलें होतें; आणि शौर्य व धाडस हे गुण मुलाच्या अंगी जास्त होते. अर्थात् पेशव्यांचा आरंभींचा इतिहास म्हणजे बाजीराव व निजाम उल्मुल्क या दोन सुप्रसिद्ध व्यक्तींचा झगडा होय. त्यांनी एकमेकांवर योजलेले डावपेंच व हर्षामर्ष यांचे सुंदर चित्र पुढील इतिहासांत पाहावयास मिळतें.

पेशवेगिरी मिळतांच बाजीरावाची व निजामाची झटापट सुरू झाली. एकमेकांच्या भेटी झाल्या, एकमेकांवर स्वाऱ्या झाल्या, तह झाले, पत्रांनीं व वकिलांमार्फत उभयतांमध्यें नाना प्रकारचे व्यवहार घडले. परंतु प्रत्येकाचें उद्दिष्ट भिन्न असल्यामुळें त्यांची एकवाक्यता मात्र केव्हांही होऊं शकली नाहीं. पेशव्यांचा उद्देश मराठ्यांची सार्वभौम सत्ता स्थापन करावयाची, तर निजामाचा सर्वस्वीं त्याचे उलट मराठ्यांना हाणून पाडून मुसलमानांची सत्ता दृढ करावयाची, असा परस्परविरुद्ध होता. बाजीराव

व निजाम यांची ही झटापट सारखी वीस वर्षे चालली. प्रथम सामदामादि उपाय कांहीं काळ योजलेले निष्फळ झाल्यावर कोणत्याही तंट्याचा निर्णय करण्याचें मानव जातीचें अखेरचें अस्त्र म्हणजे युद्ध. त्याचाच अवलंब उभयतांकडून करण्यांत आला. वर्ष दोन वर्षें अनेक मोहिमा झाल्या आणि शेवटी स. १७२८ च्या रंगपंचमीला ता. १८ मार्च रोजीं एकंदर राजकारणाचा रंग पालटला. या दिवशी पालखेडवर बाजीरावानें निजामास चांगलेंच रगडून त्याजवर आपला शह बसविला, आणि मुगी शेवगावचा यशस्वी तह पदरात घेऊन छत्रपतीस भेटला. त्याने निजामाच्या दुर्दशेची एकंदर हकीकत महाराजांस निवेदन केली. अशा प्रकारें त्या सालच्या रंगपंचमीच्या दरबाराला अपूर्व रंग चढला, बाजीरावाची सर्वत्र वाहवा झाली आणि शाहूला धन्यता वाटली, कीं पेशवाईची योजना आपण ठरविली ती अशा प्रकारें फलद्रूप झाली.

दक्षिणचें राजकारण जरी वरप्रमाणें यशस्वी झालें तरी आतां पुढें काय हा प्रश्न उभा राहिला. बाजीराव आणि चिमाजी म्हणजे राम–भरतांची जोडी. त्यांच्या अंगी मूर्तिमंत उत्साह संचारलेला होता. चार दोन मोहिमा यशस्वी झाल्या म्हणजे काम झाले असे मानणारे ते नव्हते. त्यांना कांहीं तरी मोठा उद्योग करून दाखवायचा होता. त्या सालचा पावसाळा नाना तऱ्हांच्या वाटाघाटी करण्यांत त्यांनीं घालविला. अनेकांशीं सल्ला मसलत केली. शाहू छत्रपतींशीं मनमुराद बोलणीं केलीं. आपण एकादें साहस अंगीकारलें तर मनापासून साह्य कोण करतील, कोणाचा विरोध होईल, फौज कशी उभारावी, द्रव्याची पैदास कशी करावी, या सगळ्याचा त्यांनीं तब्बल चार महिने कसून खल केला. त्यांचें मन त्यांना सांगे जगांत पराक्रमासारखें अमोलिक शस्त्र नाही. साहसाशिवाय वैभव नाहीं हें तर ठरलेलेंच. विजयादशमी जवळ आली आणि या वर्षी सीमोल्लंघन करावयाचे तें नर्मदोत्तर भागीं माळव्याकडे करावयाचें असें उभय बंधूंनीं ठरविलें.

तारीख १ ऑक्टोबर, स. १७२८ म्हणजे आश्विन शु. १० चा दिवस मराठी इतिहासांत सुवर्णाक्षरांनी झळकण्यास पात्र आहे. या दिवशी हे दोघे बंधु महाराजाचा आशीर्वाद घेऊन शाहूनगरांतून बाहेर पडले. धाकट्याने पश्चिम बाजूनें बागलाण खानदेशाकडून पुढे जावें आणि बाजीरावाने पूर्वेच्या बाजूने वऱ्हाडातून जबलपूर मार्गाने बुंदेलखंडांत उतरावें आणि दोघांनीं एकमेकांची साथ करीत माळवा प्रांत व बुंदेलखंड हे हस्तगत करावे असा बेत ठरविला. मनांत बेत ठरविणे किती सोपें पण ते सिद्धीस नेणें किती अवघड हें सांगण्याची गरज नाहीं. बाजीराव लहानपणीं ज्यांना 'राण्या', 'मल्या', 'उद्या' अशा नांवाने हाका मारी ते लहानपणचे खेळगडी शिंदे, होळकर आणि पवार चिमाजीच्या साह्याला होते. रघूजी भोसले, आनंदराव सुमंत, पिलाजी जाधव वगैरे चांगली पोक्त मंडळी बाजीरावाबरोबर होती. जातांना वाटेंत नवीन फौज वाढवायची, पुढील झगड्याची तयारी करायची आणि वारंवार एकमेकांना खबर देत घेत पुढे चालून जायचें, अशा रीतीनें दोघांचें मार्गक्रमण चालले. त्यांत चिमाजीने तर मोठीच आघाडी मारली. २५ नोव्हेंबरला तो नर्मदेवर दाखल झाला. बरोबर फौज दहा वीस हजारच पण अगदीं निवडक होती. त्याची सारी भिस्त होती ती वर सांगितलेले तीन मुख्य सरदार आणि त्यांच्याच तोडीचे नव्या जोमाचे इतर तरुण वीर यांच्यावर. बाजीराव जरा धीमेपणानें वाटेंतच इतर व्यवहारांची व्यवस्था लावीत, पैसा जमवीत, मुलखाची व रयतेची निगा ठेवीत आणि चिमाजीच्या हालचालींकडे सारखे लक्ष पुरवीत दक्षतेनें व सावधगिरीनें चालला होता.

मराठ्याच्या या हालचालींची बातमी दिल्ली-दरबारला पोचण्यास विलंब लागला नाहीं. बादशहा व त्याचे सल्लागार यांनीं मराठ्यांना अटकाव करण्याकरतां अगोदरपासूनच मोठी फौज व हुशार सरदार रवाना केले. राजा गिरधर बहाद्दुर व त्याचा चुलत भाऊ दया बहाद्दुर

हे दोन हिंदू सरदार पराक्रमी म्हणून नांवाजलेले बादशहाच्या पदरीं होते, त्यांस त्यानें पूर्वीच माळव्याच्या बंदोबस्तास नेमिलें होतें. मराठे चालून येतातसे पाहून हे दोन सरदार प्रचंड तयारीनें युद्धास सिद्ध झाले. ठिकठिकाणीं तोफा रचून मराठ्यांचा संहार उडविण्याची त्यांनी कडेकोट तयारी केली. चिमाजी आप्पांनीं व होळकर-शिंदे-पवारांनीं आपले अनेक हेर पूर्वीच सर्वत्र पसरून त्याजकडून बादशाही तयारीचा शोध आणविला आणि जे घाट मुसलमानांनी अडविले होते ते चुकवून दुसऱ्याच उतारावर ता. २७ नोव्हेंबर रोजीं नर्मदा उतरून त्यानी आपली सर्व फौज पलीकडे नेली; आणि गुप्त रीतीनें एका आडमार्गाने सर्वांनी एकदम पुढे चाल करून आमझेराच्या तळावर मुसलमान फौजांची पिछाडी गांठली. आकाशांतून एकाएकीं विद्युत्पात व्हावा त्याप्रमाणे मराठ्यानी हा अचानक मागाहून हल्ला चढविलेला पाहून बादशाही सैन्य गांगरून गेलें, आणि चार दोन तासांतच मराठ्यांनीं त्याचा फडशा उडविला. दयाबहाद्दुर समोर लढता लढतांच रणांगणावर पतन पावला, आणि गिरधर बहाद्दुर जखमी होऊन पुढें अल्पावकाशांत मृत्यु पावला. हे दोघे मातबर मुख्य पुढारी मरण पावताच उरलेसुरले लोक जीव घेऊन पळाले आणि आमझेराच्या या एका लहानशा लढाईनेंच सबंध माळवा प्रांत मराठ्याच्या काबूंत येण्याची वाट मोकळी झाली. चिमाजीने आतां वेळ न गमावतां लगेच पुढे चाल करून माळव्याची राजधानी उज्जनी शहर गांठलें आणि मराठी सैन्यानें विजयोत्साहाने तो प्रदेश लुटून अपार संपत्ति पैदा केली.

माळव्यातील मराठ्यांच्या विजयाची ही बातमी हांहां म्हणतां चहूंकडे पसरली. बादशहा व त्याचे दिल्लीचे एकंदर उमराव सर्वथा स्तंभित झाले. महाराष्ट्रांत या विजयाची बातमी पसरली तेव्हां लोकांना आनंदाचें केवढें भरतें आले व ठिकठिकाणच्या मराठ्यांचे बाहू वीरश्रीनें कसे स्फुरण पावूं लागले याची कल्पनाच केली पाहिजे. बाजीराव व चिमाजी आप्पा

यांच्यांवर चोहोंकडून अभिनंदनांचा वर्षाव झाला. महाराजांनीं प्रेमभरित अंतःकरणानें त्या दोघां बंधूंना शाबासकी दिली, आणि ज्या मुलाला आठ वर्षांपूर्वी आपण पेशवाई दिली त्यानें आपलें धोरण बरोबर संभाळलें आणि आपले हेतु पूर्ण केले हें पाहून त्यांना धन्यता वाटली.

पूर्वी शिवाजीमहाराज आग्र्याहून सुटून आले तेव्हां लोकांना जसें वाटलें कीं हा कोणी तरी अवतारी पुरुष हिंदूंचा पुरस्कर्ता निर्माण झाला आहे, तशीच भावना पेशव्यांच्या संबधानेही आतां लोकांत लगोलग प्रसृत झाली आणि पेशवे किंवा मराठे हे केवळ महाराष्ट्राचेच मालक नव्हत तर ते आतां सगळ्या देशाचा ग्रास करणार, त्यांच्याशी नमूनच वागले पाहिजे असें वातावरण उत्तर हिंदुस्थानांत निर्माण झालें !

चिमाजी आप्पानें उज्जनींत प्रवेश केला त्या वेळी बाजीरावाचा मुक्काम नागपुरच्या आसपास होता. तो ताबडतोब तसाच पुढें मध्य हिंदुस्थानांतून गढामंडळाच्या मार्गानें बुंदेलखंडांत शिरला आणि त्यानें चिमाजी आप्पाला कळविलें कीं तुम्ही तिकडून पश्चिमेला गुजराथेंत जा आणि तोही प्रांत पादाक्रान्त करून खंडण्यांच्या वसुलानें छत्रपतींचें कर्ज वारा.

बुंदेलखंडाच्या हद्दीवर गढामंडळा येथे बाजीरावाचा मुक्काम असतां त्यास छत्रसालाचें केविलवाणीचें बोलावणें आलें. त्यांत मजकूर असा कीं आमझेरा येथें आपल्या फौजेचा पाडाव झालेला ऐकून बादशहानें आपला दुसरा बलवान सरदार महंमदखान बंगष मोठ्या फौजेनिशीं रवाना केला आहे. तो प्रथम आमची चंदी उडवून मग माळव्यांत मराठी फौजेवर चालून येणार. नक्रानें जशी गजेंद्राची अवस्था केली तशी आमची स्थिति झाली आहे, तर या प्रसंगांतून आम्हांस सोडविणार एक आपणच समर्थ आहांत. तर भगवान् श्रीविष्णुप्रमाणें ताबडतोब येऊन आम्हांस संकटांतून मुक्त करावें.

छत्रसालाची ही हाक ऐकून बाजीराव तसाच विजेप्रमाणें चमकत बंगषावर चालून गेला. त्यानें त्याचा धुव्वा उडवून छत्रसालास सोडविलें आणि मराठी राज्याची हद्द यमुनेस पोंचविली. इकडे चिमाजीनें गुजरातेंत जाऊन तेथें मराठ्यांची सत्ता स्थापन केली आणि दोघांही बंधूंनीं स. १७२९ च्या मृगारंभीं सातार्‍यास येऊन छत्रपतींचें दर्शन घेतलें. त्या वेळीं छत्रपतींना व एकंदर महाराष्ट्राला जो आनंद झाला त्याचें वर्णन कोण करील! धन्य ते छत्रपति व धन्य त्यांचे आज्ञाधारक सेवक! या वेळीं बाजीरावाचें वय केवळ २८ वर्षांचें होतें ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे त्याच्या या पराक्रमाचें कौतुक करावें तितकें थोडेंच असें वाटूं लागतें!

# १२

# अंत्यशय्येवरून



**वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि ।**

मराठ्यांच्या इतिहासांत शिवाजीच्या खालोखाल बाजीराव पेशव्याची योग्यता समजतात. एका अर्थानें शिवाजीचें राज्य महाराष्ट्राबाहेर फारसें गेलें नव्हतें ते बाजीरावाने बहुतेक सर्व हिंदुस्थानभर विस्तारलें. अंतसमयीं शिवाजीचें वय पन्नाशी उलटून गेलें होतें, तर बाजीरावाला चाळिशी संपविण्यास तीन महिने वीस दिवस कमीच होते. दोघांचाही अंतसमय अत्यंत उद्वेगकर बनला; पण त्यांतल्या त्यांत अनेक कारणांनीं बाजीरावाला आपले जिणे दुःसह वाटूं लागले असून, मृत्यू आला तोही कोणाच्या ध्यानींमनीं नसतां एकाएकीं आला. नर्मदेच्या दक्षिणकांठी रावेरखेडी येथें उघड्या छावणींत ता. २८ एप्रिल, स. १७४० रोजीं बाजीरावाचें देहावसान झालें. "वैशाख शु. १३ सोमवार, चंद्र १२ सफर रोजीं रायांस कैलासवास जाहला," अशी नोंद जमाखर्ची कागदांत आहे. आजाराचें वर्णन निश्चित मिळत नाहीं. दोन दिवस अगोदर शनिवार शुद्ध एकादशीच्या दिवशीं रायांस ओवाळून टाकण्यास एक मोहोर खर्ची पडली आहे. तसेच रविवारीं मृत्युंजयाच्या जपास ब्राह्मण व क्लेशदानें यांचे खर्च दाखल आहेत, त्यांवरून शनिवारपासून आशा सुटली असें अनुमान होतें. दोनतीन दिवस ज्वर होता. नदीस्नान आणि पोहणें हें पेशव्यांच्या घरांतले प्रत्येकाचें नित्यकर्म होते. त्यांतून नर्मदेवर असतां वरील क्रम अवश्यच होता. पोहत असतां बुडत होते, जवळच्यांनीं बाहेर ओढून आणलें असा एक प्रवाद आहे, तो अगदींच टाकाऊ

नसेल तर अपघातानेच मृत्यु आला, औषधोपचार वेळेवर होऊं शकला नाहीं, शेवटीं यातना फार झाल्या, विव्हळत होते, असें मानणें गैर नाहीं. मुख्य गोष्ट म्हणजे, परलोकास जातांना कृतार्थतेचा आनंद पुष्कळांना लाभतो, त्याच्या उलट बाजीरावाची मनःस्थिति असल्यामुळें तारुण्याच्या भरांत राष्ट्राच्या ऐन उमेदींना धक्का पोंचवून प्रयाण करण्याची पाळी आपणावर यावी, हा अत्यंत खेदकारक देखावा त्याच्या दृष्टीसमोर उभा राहिला, आणि त्याच्या तोंडून खालील शब्द बाहेर पडले.

" काय ही माझी दशा, आणि काय हा संसार! शेवटी सर्व जंतुजात एकाच धुळीस मिळणार! व्यर्थ आहे मानवी पराक्रम! शौर्य, आशा, उमेदी सर्व कांहीं फुकट!

अहाहा! काय तो वीस वर्षांपूर्वीचा पेशवाईच्या वस्त्रांचा प्रसंग! वडिलांच्या मृत्यूचे आमचें सुतक संपतांच महाराजांनीं उंबरजेवर मुद्दाम सर्व प्रमुख मंडळीना दरबारांत बोलावून आम्हांस वस्त्रें दिली. नुकतीच कुठें मिशी फुटूं लागलेल्या मुलावर राज्याचा भार महाराजांनीं टाकिला. सर्व जन म्हणूं लागले, केवढा हा महाराजांचा अविचार! प्रतिनिधि, दाभाडे, भोसले असे नामांकित सरदार आणि अनेक धुरंधर मुत्सद्दी पदरीं असतां एवढ्या अल्पवयी ब्राह्मण शिशूच्या हातीं महाराज सर्व सत्ता देतात म्हणजे काय! पण वडिलांचा आशीर्वाद मस्तकीं होता, पुण्यशील मातुश्रीचा वरद हस्त आणि प्रत्यक्ष महाराजांच्या पायांची सेवा भरपूर मिळाल्यामुळे जें काम हातीं घ्यावें तें यशस्वी होत गेलें. विरोधकांचीं तोंडें परभारें बंद पडलीं. आम्हांला वडील शोभणारे एवढे कर्ते निजामउल्मुल्क महाराजांस गोत्यांत आणूं लागले, त्याबरोबर आम्हीं त्यांस मराठ्यांचें पाणी चांगलेंच दाखविलें.

चंद्रसेन जाधव महाराजांना सोडून गेले; दाभाडे नडवूं लागले; कान्होजी भोसले उघड बंडखोर बनले; दमाजी थोरात व उदाजी चव्हाण यांनीं तर सन्निध राहून वेळीं अवेळीं महाराजांचा उच्छेद चालविला. पण

त्या सर्वांना हा पठ्ठया एकटा खडे चारूं शकला. लक्ष्मणानें रामचंद्राचा शब्द झेलला नसेल अशी आमची साथ चिमुकल्या चिमाजीनें केली. केवढें आमचें भाग्य, कीं बाईसारखी जगद्वंद्य मातुश्री, बाळाजीपंत नानांसारखे चतुर वडील, चिमाजीसारखा बंधु, पुरंदऱ्यांसारखे पाठीराखे व प्रत्यक्ष शाहूमहाराजांसारखे उदार स्वामी आणि मस्तानीसारखी सहचरी—पण जाऊं द्या, तो विचारच आतां नको !

आज आणि पूर्वी—! छे, नको ती आठवण ! लहानपणचा तो उत्साह ! वडील नेहमीं चिंतेंत व अडचणींत असायचे. सारखे कांहीं तरी बेत व खलबतें यांची चिंता. कर्जें काढा, फौजा ठेवा, भरंवशाचीं माणसें शोधा, असा खेळ सदा चाललेला. आम्हीं तेव्हां लहान, जवळ उत्सुकतेनें बसून पाहायचे. आजचे हे राणोजी शिंदे, सुभेदार मल्हारराव होळकर, धारचे पराक्रमी पवार अशांच्या संगतीत आम्ही तेव्हां उघड्या घोड्यावर मौजेने दौड मारीत रानोमाळ भटकत असूं. भूक, तहान, ऊन्ह, पाऊस कसली म्हणून पर्वा नाहीं. घोड्याच्या तोबऱ्यांत भाजलेले फुटाणे घ्यायचे कीं चालले फाक्या मारीत. भीति म्हणजे काय तें मनांतच नाहीं. वडील-मातुश्रींना दमाजी थोरातानें पकडून हाल केले, तेव्हां असा कांहीं अंगाचा तिळपापड झाला, कीं यांच्या मानेचा घोट घ्यावा ! पण आमचे महाराज पडले शांतिब्रह्म. शत्रू नागव्या तलवारीनें चालून आला तरी हे म्हणणार, 'काप माझी मान आणि घे आपली हौस फेडून !' पण आम्हां पोरांच्या उच्छृंखल लीलांवर महाराजांचें हें सात्त्विक पांघरूण होतें म्हणूनच आम्हांस जय मिळत गेला. आजच पाहा ना. कालचा हा राण्या आज उज्जनीस टोलेजंग वाडे उठवून राजासारखा मिरवतो. हा अजापाल मल्हारजी त्यांतलाच. उदाजीनें तर पूर्वीची परमारांची धारा नगरी निजलेली पुनः उठविली. तो माझा शागीर्द गोविंदा खेर आज पहा सागरास कसा बडेजावानें नांदतो आहे. असे किती तरी पराक्रमी सरदार माझ्यापुढें नाकें घासतात. पण आहे कोठें आज तो बाजीरावाचा पराक्रम !

एवढा जहांबाज निजाम, प्रत्यक्ष औरंगजेबाचा अवतार, महाकपटी व आंतल्या गांठीचा, केव्हां केसानें गळा कापील समजायचें नाहीं. तोंडानें बोलेल एक, कागदावर लिहील दुसरें आणि प्रत्यक्ष करील तिसरेंच. हुलकावणी दाखवील बऱ्हाणपुरची आणि येईल पुण्यावर. कोल्हापुरच्या संभाजीस बगलेंत मारले; शाहूस काढून तुम्हांस साताऱ्च्या गादीवर बसवितो अशी त्यास थाप देऊन आमच्या महाराजांवर गदा आणिली; त्याबरोबर आप्पा व मी चालून गेलों आणि अचानक झडप घालून त्याला पालखेडच्या कैचींत पकडले, तेव्हां आला सुतासारखा नरम ! तोच बाजीराव आज मृत्यूच्या दारांत कसा विव्हळतो आहे पहा !

आज चाळीस वर्षांत या देहास एका घडीची विश्रांति लाभली नाहीं. दुखणे कसें ते ठाऊकच नाहीं. एक दिवस असा नाहीं गेला कीं कांहीं तरी अवचित बिकट प्रसंग येऊन तारांबळ उडाली नाहीं. पण हा बाजीराव निधड्या छातीनें पुढे जातांच हिंमत नाहीं झाली शत्रूची पुढें येण्याची. नुसतें नांव ऐकून विरघळून जात. उगाच नाहीं महाराज म्हणत कीं माझा एकटा बाजीराव एकीकडे आणि लाख सैन्य एकीकडे !

काय ती कीलक संवत्सराची विजयादशमी ! मोठा भाग्याचा दिवस तो. आप्पा व मी महाराजांच्या पायांवर सोनें अर्पून बाहेर पडलों. महाराजांना ऋणमुक्त करण्यासाठी उत्तरेकडे मोर्चा वळविला. चार महिन्यांत माळवा व बुंदेलखंड पालथें घातलें. गिरिधर बहादुर, दया बहादुर, महंमदखान बंगष अशा वीरांना पाणी पाजून छत्रसालांना संकटमुक्त केलें. त्यांनीं तिसरा हिस्सा राज्य व लावण्यवती मस्तानी आमचे पदरीं घातली. मराठी राज्याची हद्द गोदावरीवरून यमुनेस जाऊन भिडली. लगेच आप्पांनीं गुजरातवर शह बसविला. मिळून कीलक संवत्सराचा महिमा हिंदुस्थानचे प्रत्ययास येऊन शत्रूंचीं डोचकीं ठेंचलीं गेलीं.

काशीबाई व मस्तानी दोघी आमचेबरोबर देशीं आल्या, जणूं काय सख्ख्या बहिणीच असें त्यांचें परस्पर प्रेम. मातुश्रींनीं आम्हा बंधूंचें कौतुक करून दृष्ट देखील काढली. महाराजांनी दरबार भरवून आमचा गौरव केला. लहानमोठे सरदार आमच्या भजनीं लागले. खुद्द दिल्लीच्या बादशहाकडून आमच्या सन्मानार्थ पत्रें घेऊन वकील आले. उदेपूरचे राणा संग्रामसिंह, जयपूरचे सवाई जयसिंह, मारवाडचे अजितसिंह व अभयसिंह, वृद्ध छत्रसालजी बुंदेले अशा सर्वांचे वकील साताऱ्यास येऊन हिंदुस्थानचे राजकारण ठरवूं लागले. हिंदुपदपातशाही उभारूं लागली. राजपुतांचा व महाराजांचा प्रेमभाव कायम झाला.

दक्षिणेतही हा परिणाम तसाच बलवत्तर घडून आला. महाराजांनीं प्रतिनिधीस पाठवून कोल्हापुरकर संभाजीचा पाडाव केला. पण कसा झाला तरी तोही आपला बंधुच असें समजून महाराजांनीं त्यास शिक्षा न करितां समारंभानें भेटीस आणिले. स्वतः सामोरे जाऊन गौरव केला. साताऱ्यास आणून त्यास दक्षिणचें राज्य निराळें तोडून दिलें. कोल्हापुरची गादी स्वतंत्र बनली. महाराजांना लोक अजातशत्रु म्हणूं लागले.

पण निजामांना मात्र आमचा हा लौकिक अत्यंत झोंबूं लागला. महाराजांचे वृद्ध सेनापति खंडेराव दाभाडे वारल्यावर त्यांचे चिरंजीव त्रिंबकराव सेनापति झाले. आमचा उत्कर्ष सहन न होऊन त्रिंबकराव निजामास मिळाले. त्यांस हुजूर आणण्यासाठीं महाराजांनीं आम्हांस आज्ञा केली. पण ते समजुतीवर येईनात. आम्हांसच गोत्यांत आणूं लागलेसें पाहून डभई येथें त्यांशीं एकदम गांठ घातली. मोठें रणकंदन झालें. सेनापति धारातीर्थी पतन पावले. आम्ही साताऱ्यास येऊन महाराजांस सर्व प्रकार निवेदन करतांच त्यांनीं सेनापतींची मातुश्री उमाबाई पुत्रशोकानें संतप्त झाली होती, तिची समजूत काढली. असे प्रसंग किती म्हणून या क्षणीं डोळ्यासमोर उभे राहतात.

निजामाला दक्षिणेंत आपलें बस्तान सांभाळणें दिवसेंदिवस अवघड झालें. आमच्याशीं भेटून गोडी करण्याचा घाट त्यांनीं रचिला आणि महाराजांस लिहून आम्हांस भेटीस बोलाविलें. पोटांत भयंकर कपट होतें. भेटीच्या प्रसंगी दगा करून आमचा नाश करावा असा घाट रचिला. मातुश्रीपासून इतर सर्वांनीं मोडा घातला कीं भेटीस जाऊं नये. जिवास अपाय होईल. पण परमेश्वर आमचा वाली. निर्भयपणें निजामाचे भेटीस समारंभाने गेलों. निजामाची व आमची ही भेट अपूर्व थाटाची झाली. औरंगाबाद शहरांतून जेव्हां आमची स्वारी उमद्या घोड्यावर बसून जाऊं लागली तेव्हां आम्हांस पाहाण्यास सर्व शहर लोटलें. पडद्यांत वावरणाऱ्या मोठमोठ्यांच्या मुसलमान स्त्रिया देखील डोळ्याचें पारणें फेडण्यास बाहेर आल्या. खुद्द ज्या दालनांत आमची व निजामाची भेट झाली त्याच्या एका बाजूस चिकाचे पडदे लावून जनानखान्यासाठी पडदपोशीची जागा केली होती. तेथे निजामाचा समग्र स्त्रीपरिवार मुद्दाम या गरजणाऱ्या पेशव्याचें निरीक्षण करण्यासाठीं उत्कंठेनें बसला होता. उघडच आहे, बत्तीस वर्षांचा तरुण, गौरवर्ण, रूपगुणसंपन्न व सर्व हिंदुस्थानास महशूर झालेला असा वीर पुरुष त्यांना दुसरा कोण दिसणार !

अशा प्रकारें आम्हीं हिंदुस्थान पादाक्रान्त करीत चाललों, यामुळें शत्रूंना दहशत बसली. आमचे सरदारही रघूजी भोसले, सिंदे, होळकर, पवार इत्यादि चहूंकडे नवीन राजधान्या निर्माण करूं लागले. त्यामुळे बादशहा व त्याचे उमराव खवळून गेले. उदेपुर, जोधपुर, जयपुर येथील राजांस आम्ही भेटून त्यांजशीं सख्य जमविलें यामुळे बादशहाचा संताप वाढला. मराठ्यांना साफ काढून टाकण्याची प्रतिज्ञा करून त्यांनीं प्रचंड फौजा माळव्यावर रवाना केल्या. यांस एकदां चांगलीच दहशत बसवावी अशा बेतानें आम्ही विजेप्रमाणें थेट दिल्लीवर चाल करून गेलों. त्याबरोबर बादशहाचे पोटांत धडकी भरली. कोटांत लपून बसले.

विनंती सांगून पाठविली, 'शाहूमहाराज आमचे दोस्त. तुम्ही मागाल तें देतों, पण घातपात करूं नये.' त्यावरून मनाशीं विचार केला, थोरांची विटंबना करणें योग्य नाहीं. नाहीं तर पुढील नादिरशाही गाजविण्यास काय उशीर होता! मतलब साधून यमुनेची हद्द कायम करून परत फिरलों. महाराजांस संतोष झाला.

निजामांस मात्र आमचा हा विजय अत्यंत दुःसह झाला. दिल्लीस जाऊन सर्व बादशाही फौज व पैसा हातीं घेऊन ते आमच्यावर पुनः चालून आले. आम्ही जाऊन त्वरेनें सामना केला. भोपाळच्या गढींत त्यांस कोंडून धरिलें. अन्नपाण्यावांचून उपासमार होतांच दांतीं तृण धरून शरण आले. वृद्ध, केलेले पुरुष, अंत पाहूं नये, असा विचार करून त्यांस वाट मोकळी केली. जरूर तितका वचपा घेतला.

इकडे आप्पांनीं पोर्तुगीझांचा पाडाव करून त्यांचें समृद्ध नाविक स्थल वसई काबीज केलें.

पण आप्पा प्रकृतीने अगदींच हैवान; व्यवहाराचें शहाणपण, चिकाटी, दूरदृष्टि इत्यादि गुणांत तो आमच्याहून वरचढ. आम्हीं शत्रूवर विजय मिळवून त्याचा फन्ना उडविल्यावर पुढील उस्तवारी, तह, तडजोड, भरपाई इत्यादि प्रकरणें विल्हेस लावण्याचें जिकिरीचें व खटपटीचें काम बिनचूक सिद्धीस न्यावें आप्पानेच. आम्हीं दिल्लीकडे असतां आप्पानें कोकणांत सीदीसातास मारलें, आंगऱ्यांच्या चढाईस आळा घातला, तेणेकरून मराठी राज्याची पश्चिम मर्यादा निर्वेध बनली.

आमच्या मातुश्रीबाई मोठ्या सत्त्वशील. त्यांच्या पोटीं जन्म आला हेंच आमचे मोठें भाग्य. त्यांनीं आमचें संगोपन यथायोग्य केलें म्हणून आम्हांस या पतित राष्ट्राची सेवा थोडीबहुत करतां आली. मातुश्रींची इच्छा झाली कीं काशीयात्रा करावी. आमचाही धर्म कीं मातुश्रींचे हेतु पूर्ण करावे. तयारी सर्व केली. उणें कांहीं नव्हतें. फक्त बरोबर जाण्यास घरचा पुरुष कोणी नाहीं. आप्पा, नाना, मी सर्व आपापल्या

कामांत. सदाशिव लहान, अवघ्या पांच वर्षांचा. मग आमचे बाबूजी नाईक घरच्यासारखेच होते त्यांस बरोबर दिलें. मातुश्रींचे जावई आबूजी नाईकही बरोबर गेले. वर्तमान जाहीर झालें कीं पेशव्यांच्या मातुश्री यात्रेस जातात. तिकडील राजपूत राजे व मांडलिक यांचीं शेंकडों पत्रें आलीं कीं आमच्या भूमीस मातुश्रींचे पाय लागावे, त्यांच्या आशीर्वादाचें बल आम्हांस मिळावें. नुसत्या हिंदूंचींच नाहीं तर बंगषासारख्या आमच्या शत्रूचींही बोलावणी आलीं. इतक्या कांहीं विनवण्या चहूंकडून आल्या, की मुख्य यात्रा बाजूला राहून पाहुणचार व स्वागत किती व कोणाचें स्वीकारायचें आणि कुठेकुठें म्हणून जायचें याचीच पंचाईत बाईंना व आम्हांस पडली ! खुद्द बादशहांनी आपले खास एक हजार स्वार मातुश्रींच्या बंदोबस्तास दिले. यात्रेस सव्वा वर्ष लागले. उदेपुर, नाथद्वार, जयपुर, आग्रा, मथुरा, प्रयाग, काशी, गया अशा सर्व ठिकाणीं त्यांचा मोठा सत्कार झाला. हिंदुमुसलमानांच्या ऐक्याचे प्रचंड मनोरथ आमच्या मनांत उभे राहिले. महाराष्ट्रास आनंदाचें भरतें आलें. श्रीवर्धनच्या लहानशा ब्राह्मण कुटंबाचें केवढें हें भाग्य !

मस्तानीसारखे गुणसंपन्न रत्न आमचे पदरी पडलें. त्या रत्नानें माझें मन इतकें हिरावून घेतलें, कीं तोल थोडासा सुटला. आपण कांहीं गैर करतों असें कधीं वाटलेच नाहीं. नकळत गोष्टी वाढत गेल्या. आमच्या सोवळ्या घरांत कलहाचें बीज रुजलें.

तशांत मस्तानीच्या पोटीं समशेरबहाद्दुर उपजले. नंतर दोनच महिन्यांनी रघुनाथ जन्मास आला. आम्हांस तर जशा दोनही बायका समान, तसे दोनही पुत्र समान. पण घरांतलें सोवळें पदोपदीं आडवें येऊं लागले. तरी बरें, मस्तानी बिचारी मृदुस्वभावी. कोणाचें मन न दुखावितां प्रत्येक गोष्ट संभाळून नेत असे. आम्ही बाहेरच्या कामांत गुंतलेले, घरच्या भानगडींत पडण्यास फुरसत कुठें होती ! पण परिस्थितीचा परिणाम विकोपास गेला.

सुखांतून दु:ख आणि दु:खांतून सुख अशी ही संसारलीलेची सांखळी परमेश्वर बहुधा प्रत्येक मानवाच्या जीवनांत गोवीत असतो. वडिलांवर संकटें आलीं त्यांमुळेच आमच्या कुटुंबास पेशवाई मिळून त्या योगें मराठी राष्ट्राचा अभ्युदय झाला. पण त्याच अभ्युदयांतून आजची आमची विपन्नावस्था उत्पन्न झाली. आम्ही टीचभर पंचा नेसणारे कोंकणचे सोवळे ब्राह्मण, पांचपन्नास मैलांपलीकडे प्रवासाचा प्रसंग कधीं आलेला नाहीं. पण पुण्यास येऊन पेशवाईची जोखम अंगावर पडतांच आम्हांस आणि आमच्या अनुषंगानें इतरांस शिपाईगिरी पतकरावी लागली. वडिलांना बाळाजीपंत म्हणत तर आम्हांस बाजीपंत न म्हणतां लोक बाजीराव म्हणूं लागले. पण शिपाईगिरी म्हटली, की तींत बऱ्यावाईट अनेक गोष्टी येणारच. नानाविध स्वभावाच्या माणसांना हाताशी वागवायचें म्हणजे त्यांची मर्जी सांभाळावी लागते, त्याच्याशी निकट सहवास करावा लागतो. अनेक युक्त्यांनीं त्यांचे मनोगत ओळखून त्यांस वश केल्याशिवाय मोठे उद्योग सिद्धीस जात नाहींत. आम्ही घरकोंबडे दक्षिणी लोक हजारो मैलांवर सैरावैरा धावत सुटलो. मिळेल तें खावेंप्यावें, प्रसंग पडेल तसे वागावें, बाहेरचे आचारविचार आत्मसात करून सर्व प्रकारच्या व्यसनी-निर्व्यसनी लोकांशीं मिसळून समरस व्हावें, याचेच नांव शिपाईगिरी व यानेच मुलुखगिरी साधते. माळवा, बुंदेलखंड, दुआब, प्रयाग, आग्रा, मथुरा, दिल्ली अशा ठिकाणी वास्तव्य झाल्याबरोबर आमची दृष्टि फांकली. अंगच्या जोरावर आम्ही द्रव्य पैदा केलें. दूरदूरचे प्रदेश जिंकले, त्याबरोबर तिकडचे शृंगार, वेष, आराम, चैन, गाणें बजावणें, नाचरंग इत्यादि विषयसेवनाची राहणी आमच्या अंगीं संचरली. देहाचें व विचारांचें भान थोडेंबहुत सुटलें, हा प्रकार कांहीं खोटा नाहीं. पण तो अपरिहार्य होता. गुण पाहिजे तर अवगुणही स्वीकारला पाहिजे.

शिवाजीमहाराजांना व त्यांच्या मातुश्रींना हा हिंदु-मुसलमानांचा लढा पाहून संताप उत्पन्न झाला. त्यांनीं मोठे मन करून बजाजी निंबाळकर,

नेताजी पालकर अशा थोर गृहस्थांस प्रायश्चित्तानें शुद्ध करून स्वधर्मांत परत घेतले आणि त्यांच्याशीं शरीरसंबंध जोडले. पण आमच्या पुण्याच्या भिक्षुकांस ही दृष्टि कोठून यावी ? मस्तानीला मुसलमान कां समजायचें? हिंदु कां नाही समजायचें ? आई मुसलमान व बाप हिंदु यांमुळें ती जन्मत: अर्धी हिंदु तर होतीच. पुढे आयुष्य गेलें हिंदु नवऱ्याजवळ व ब्राह्मणांच्या घरात. तेच रीतिरिवाज तिने स्वीकारले. आमच्या सोवळ्या गणपतीपुढे सालोसाल तिचें गाणें व नाच होऊन त्या प्रसंगी सर्व शहर लोटायचे, तरी म्हणे ती धर्मबाह्य ! समशेराची मुंज नाहीं करायची तर काय आम्हीं त्याची आपण होऊन सुंता करावी ! आम्हांस मोठी उमेद पूर्वी वाटत होती, की हिंदु-मुसलमानांचे धार्मिक ऐक्य जें अकबर बादशहाच्या पश्चात् बंद पडले ते फिरून बनवावे, धर्मकलह कायमचा मिटवावा म्हणजे हिंदुपदपातशाहीचा शिवाजीमहाराजांचा संकल्प आपोआप सिद्धीस जाईल. आम्ही तरी शिवाजीमहाराजांचे चेले, त्यांचाच उद्योग पुढे चालविणार !

हिंदुपदपातशाही आम्हांस अवश्य पाहिजे, पण ती मुसलमानांशीं सख्य ठेवून बनवायची. पाटणकर, दीक्षित वगैरे आमचे हितचिंतक काशीविश्वेश्वराचे मंदिरावर औरंगजेबाने बांधलेली मशीद पाडून मंदिर पुन: उभारण्यास सांगतात, पण या गोष्टी सिद्धीस जाणाऱ्या नव्हत. महाराजांना तर बादशाहीचा केवढा अभिमान वाटतो. त्यांनीं औरंगजेब बादशहास वचन दिलेलें आहे कीं संकटप्रसंगीं आम्हीं धावून येऊं, बादशाहीचा सांभाळ करूं. नवीन मंदिर बांधण्यापेक्षां जुन्याचा जीर्णोद्धार करणें हेच महाराज पुण्य समजतात. नादीरशहा चालून येतांच महाराजांची आज्ञा निकडीची आम्हांस आली कीं दिल्लीवर जाऊन बादशहाचे सरक्षण करा. आम्ही तयारी करतों तों नादीरशहा निघून गेल्याची बातमी आली. इकडे वसई फत्ते होऊन मराठ्यांचा पराक्रम उच्च कोटीस पोंचला.

पण आमच्या कुटुंबांत मात्र विपरीत प्रकार घडून आला. मातुश्री, आप्पा, नाना यांना आमचा मस्तानीचा सहवास दुःसह वाटून तिची आमची कायमची ताटातूट करण्याची त्यांनीं शिकस्त चालविली. तिला त्यांनीं अटकेत ठेविलें; कायमची नाहीशी करण्याचा प्रयत्न चालविला. आमचा प्राणच हिरावून नेतात अशी आमची स्थिति झाली. आप्पांची पुष्कळ मनधरणी केली, पण समजूत पडेना. ते म्हणत मस्तानीचा त्याग करा आणि गंगोदकानें प्रायश्चित्त घेऊन शुद्ध व्हा. इकडे प्रत्यक्ष मस्तानीनें आपली केविलवाणी स्थिति आम्हांस कळविली. एकदां मनांत आलें, खुशाल पांच पन्नास स्वारांनिशीं शनिवारवाड्यावर जाऊन तिला सोडवून आणावी. दिल्लीच्या बादशहास नमविणाऱ्या या मर्दाला ही गोष्ट अशक्य नव्हती. पण विचार केला, असलें भलतेंच कृत्य करूं नये. आमचा प्राण जाईल तर जावो, मस्तानीचाही जावो, पण दुर्लौकिक करूं नये.

बस्स, आतां जगून काय करायचें! प्रयाणाची वेळ आली. हे सूर्यतनया यमराजा, तूंच आतां या बाजीरावाचा प्राण आपल्या ताब्यांत घे. चाललों. रा............म." एवढा वज्राहून कठोर वीर कुसुमाहूनही मृदु बनला.

# १३

# हूडपणाचें बक्षीस



**सुविक्रान्तस्य लोकस्य सर्वमेव महीतलं ॥**

पराक्रमी माणसाला सर्व जग मोकळें आहे.

" अरे ए गोसावड्या, खबरदार माझ्या त्या धोतराला शिवशील तर, जरा दुरून चाल, मी ते धोतर सोवळ्यासाठीं वाळत घातलें आहे. "

हे शब्द एका दहा वर्षांच्या मुलाच्या तोंडून अभावितपणें बाहेर पडले. ते कोणी कोणाला म्हटले हें कळलें म्हणजे त्यांचें इंगित लक्षांत येईल. हा गोसावडा म्हणजे प्रत्यक्ष शाहूमहाराज असून, मुलगा माहुलीच्या एका कुळकर्ण्याचा स्वच्छंदी पोरगा दोन प्रहरचे पूर्वी कृष्णेच्या पात्रांत स्नान करीत होता.

शाहूनगर येथें महाराज राज्य करीत असतां त्यांना शिकारीचा नाद असे. रोजच्याप्रमाणें ते शिकारीस गेले, तिकडे उशीर झाला, म्हणून ते घाईघाईनें एकटेच खांद्यावर भाला टाकून परत येत होते. बरोबरची मंडळी सर्व मागें शिकारीची व्यवस्था लावीत होती. माहुलीच्या नदींतून जात असतां वरील मुलगा लंगोटी लावून नदींत स्नान करतांना त्यांना दिसला. त्यानें आपलें धोतर बाहेर वाळवंटावर वाळत घातले होतें. शाहू महाराजांना लांब दाढी होती. कंबरेस कांच्या व अंगांत कफनीसारखें साधें अंगडें असा तो त्यांचा वेष एखाद्या बैराग्यास शोभण्यासारखा दिसे.

मुलाचे ते उर्मट शब्द महाराजांनीं ऐकले आणि शांतपणें हसून ते म्हणाले, " नाहीं बाबा मी तुझें धोतर विटाळीत. " एवढेंच उत्तर बोलून

आणि त्या मुलाकडे जरा सूक्ष्म नजर टाकून ते तसेच मुक्कामावर निघून गेले. मागाहून थोड्या वेळाने महाराजांच्या बरोबरची शिकारीस गेलेली मंडळी प्यादे, स्वार, हाकेवाले असे त्याच वाटेनें आले, तेव्हां तो मुलगा थोडा चपापला.

पुढें थोड्या वेळाने महाराजांचे दोन शिपाई त्याजकडे आले व म्हणाले, 'चल तुला महाराज बोलावताहेत.' मुलगा म्हणाला, 'महाराज कोण?' शिपाई म्हणाले, 'नुकतेच या वाटेनें गेले ते. त्यांना तूं गोसावड्या म्हणून हाक मारून धोतराला शिवूं नको म्हणून सांगितलेस नाहीं का! अरे, महाराज ते. त्याना असें बोलावें का!' तेव्हां मुलगा अगदीं घाबरून गेला आणि आतां काय शिक्षा होते कोणास ठाऊक म्हणून कांपतच त्या शिपायांबरोबर तो महाराजांकडे गेला. त्यांना पहातांच मुलानें एकदम जाऊन त्यांच्या पायांवर डोकें ठेविलें आणि म्हणाला, 'मी आपणांस ओळखलें नाहीं, चूक झाली, क्षमा करावी.' हे शब्द ऐकून महाराज थोडे हसले आणि विचारूं लागले, 'तूं कोण? कोणाचा? असा एकटाच नदीवर का आला होतास?' त्यावर मुलगा म्हणाला, "माझें नांव विठू. मी पलीकडील माहुलीच्या कुळकर्ण्याचा मुलगा. सकाळींच आई मला फार बोलली, 'तूं काम करीत नाहींस, तुला जेवायलाच नाहीं घालीत. चालता हो घरांतून.' त्यावरून मी रागानें घराबाहेर पडून नदीवर स्नानाला आलों आणि स्नान झाल्यावर गांवांत मधुकरीला जाणार होतों."

**महा०**—पण आई तुला कां रे बोलली?

**मुलगा**—ती म्हणते, "तूं सांगितलेले काम करीत नाहींस तेव्हां तुला जेवायला घालणार नाहीं, हवा तिकडे जाऊन पोट भर."

**महा०**—मग तूं आई सांगते ते काम कां करीत नाहींस?

**मुलगा**—ती मला वाटेल तें काम सांगते, मला नाहीं तें आवडत!

**महा०**—मग तुला आवडते तरी काय?

**मुलगा**—मला होय? मला घोड्यावर बसून खूप लांब पळावेंसें वाटते. महाराजांचे स्वार रोज रस्त्यानें दौडत जातांना पाहिले कीं वाटतें, असे रानोमाळ धावत सुटावे व स्वार होऊन शिकारीला जावे. किती तरी लोक असे बाहेर जातात आणि मलाच कां आई घरांत डांबून ठेवणार? मी नाहीं तिचे ऐकणार !

महाराजांना त्या मुलाचे कौतुक वाटले आणि त्यांनी लगेच हुकूम केला, "एक महिनाभर याची जेवणाची व्यवस्था वाड्यांत करा. त्याला पागेतलें एक लहान तट्टू द्या; आणि जाऊ दे त्याला पाहिजे तिकडे दौडत ! एक महिना झाला कीं पुनः मला खबर द्या."

मनाजोगते झाल्याबरोबर त्या मुलास अत्यानंद झाला. घरचें काम टळलें. परभारें पोटाची सोय झाली. मनमुराद वर्तन करायला मिळाले. मग काय पाहिजे? त्याने एक टुणटुणीत तट्टू पसंत केले आणि सकाळ संध्याकाळ दौडत चालला. परत आल्यावर त्या तट्टाची चाकरी तो स्वतः आपल्या हातानें करी. त्या तट्टावर त्याचा सर्व प्राण. त्यास चंदी घालणे, खरारा करणे, शृंगारणें हाच त्याचा सर्व नाद. बरे, पागेत आणखी पुष्कळ स्वार होते, त्यांचीं कामे पडतील तीं तो मोठ्या आनंदानें करून देई. महिन्याच्या आंतच तो सर्वांना प्रिय झाला आणि चांगल्या तऱ्हेचा स्वार बनला. पुढे महाराजाच्या स्वारीबरोबर शिकारीसही तो जाऊं लागला.

एक दिवस असेच महाराज शिकारीस गेले असतां त्यांनीं एका डुकराच्या मागें लागून त्याजवर गोळी झाडली, पण नेम चुकून डुकर निसटला आणि थेट महाराजांच्या अंगावर धावून आला. कर्मधर्म-संयोगानें आमचा हा 'विठ्ठल' त्याच बाजूला होता, त्यानें आपला भाला डुकरावर फेंकला आणि त्यास जखमी करून लगेच घोड्यावरून उतरून आपल्या दोन्ही हातांनीं डुकरास अडवून धरलें. शाहूमहाराज मागोमाग आलेच. त्यांनीं हा त्या मुलाचा पराक्रम पाहिला आणि त्याच्या प्रसंगावधानाचें व धाडसाचें कौतुक करून त्याला शाबासकी दिली.

हा मुलगा पुढें नामांकित योद्धा होणार हें त्यांनीं ओळखलें आणि त्याला लगेच शंभर स्वारांची मनसब ठरवून दिली.

हाच विठू मुलगा पुढें प्रसिद्धीस आलेला विठ्ठल शिवदेव विचूरकर होय. पन्नास साठ वर्षं मराठेशाहीची उत्कृष्ट सेवा बजावून वृद्धापकाळी तो मरण पावला. त्याचे वंशज हल्लीं विचूरकर सरदार म्हणून प्रसिद्ध आहेत. शाहूमहाराज माणसाची परीक्षा कशी करीत आणि त्यांच्या पदरीं शेंकडों गुणी माणसे कशीं निर्माण झालीं हें वरील उदाहरणावरून लक्षांत येईल.

## १४

# नववा पुण्यश्लोक



**पुण्यश्लोक नृपावळींत नववा § होवोनि जो राहिला।**
**जो राजा असतां समस्त महिला विश्रांति शेषाहिला॥**
**राष्ट्रोक्तें अवगाहिला बुधजनीं नानागुणीं गायिला।**
**जो शाहू नृप तत्कथौघ लिहिला तो पाहिजे पाहिला॥**

शाहूमहाराज हे उग्रप्रकृति संभाजीचे पुत्र. थोरल्या शिवाजीचे नातू. त्यांचा जन्म ता. १८ मे, स. १६८२ रोजीं व मृत्यु ता. १५ डिसेंबर, स. १७४९ रोजीं झाला. म्हणजे त्यांची हयात ६७ वर्षांची भरते. औरंगजेबानें संभाजीमहाराजांना पकडून त्यांचा क्रूरपणानें वध केला, तेव्हां शाहूचें वय ७ वर्षांचें होतें. शाहू व त्याची मातुश्री येसूबाई यांस बादशहानें पकडून कैदेंत घातलें. ही कैद पुढें १८ वर्षें म्हणजे औरंगजेबाच्या मृत्यूपर्यंत चालली. या बादशहाचीं शेवटचीं पंचवीस वर्षें दक्षिणेतच मराठ्यांशीं लढण्यांत खलास झालीं. तो कधीं पुनः दिल्लीस गेला नाहीं. दक्षिणच्या त्याच्या छावणींतच रानावनांत चाललेल्या संग्रामांत बादशहाबरोबर शाहूची धिंड सारखी चालली. छावणी सोडून मोकळ्या जगांत वावरण्याची संधि अठरा वर्षांच्या अवधींत त्यास बिलकुल मिळाली नाहीं. तो दिल्लीस तर कधींच गेला नाहीं. उलट हा बादशहा संभाजीप्रमाणेंच त्याच्या या पुत्राचा वध करितो, कीं त्यास जन्मान्ध करून ग्वाल्हेरसारख्या किल्ल्यावर फेकून देतो, कीं सुंता करून शिवाजीच्या

§ हिंदु राजवटींत रामचंद्र युधिष्ठिरांपासून झालेल्या पुण्यश्लोकांची गणना केल्यास शाहू नववा म्हणतां येतो.

वैराचा सूड घेतो अशी अनिश्चिति या अठरा वर्षांत शाहूच्या पुढें सारखी कायम असल्यामुळें एवढ्या अवधींत एक दिवस तरी सुखाचा घास त्यास खायला मिळाला असेल असें वाटत नाहीं. बादशहाची कन्या झीनतुन्नसा बेगम इनें स्त्रीसहज वात्सल्यानें येसूबाईचा व तिच्या या पुत्राचा परामर्ष घेतला म्हणूनच शाहूला पुढील दिवस दिसले.

स. १७०७ त औरंगजेब बादशहा मृत्यु पावला आणि त्याचा पुत्र अज्जमशहा उत्तरेंत चालला. बरोबर शाहूचे लटांबरही तिकडे चाललें. आतां पुढें आपल्या जन्माचे आणखी धिंडवडे काय काय निघणार ही धास्ती शाहूस पडली. मला सोडून स्वदेशीं पाठवा अशी टोंचणी त्यानें शहास लाविली. इकडे साताऱ्यावर चुलती ताराबाई कारभार पाहत होती. मराठे अनावर झाले, त्यांस आळा घालण्याचा एकच उपाय राहिला कीं शाहूस परत पाठवून त्याची व चुलतीची झोंबी लावून द्यावी, म्हणजे हे मराठे आपसांत लढून मरतील, असा शेवटचा मंत्र बादशहाने मरतांना पुत्रास शिकविला होता. त्याचा अंमल अज्जमशहाने केला. नर्मदा उलटून भोपाळजवळ शहाचा मुक्काम असतां, मातुश्री, दोघी बायका व मोठा परिवार ओलीस देऊन शाहूनें बादशाही छावणींतून दक्षिणेंत प्रयाण केलें; ताराबाईशीं लढून सातारा राजधानी काबीज केली, आणि सन १७०८ च्या आरंभीं आपला राज्याभिषेक-समारंभ उरकला. तेव्हांपासून पुढें ४२ वर्षें राज्य करून त्यानें देह ठेविला. पेशवाईच्या पूर्वार्धावर अर्ध शतकपावेतों या पुण्यश्लोक प्रभूची छाप विशेष पडलेली आढळते. तिचें प्रतिबिंब तत्कालीन लेखांत पहावयास मिळतें तें असें.

" मार्गशीर्ष वा। ३ भृगुवार पुष्य नक्षत्र शके १६७१ शुक्ल संवत्सर (ता. १५ डिसेंबर, स. १७४९ ) सकाळीं चार घटका दिवसास विष्णुलोकवास केला. सर्व जनांस दुःख जाहलें. मनुष्यमात्र लहानथोर, दासदासी पदरचे त्यांचा बाप, प्रतिपालनकर्ता, तें दुःख स्मरून क्लेश जाले

ते लेहावयास असमर्थता आली. कारण असा प्रभु दयावंत दुसरा जाला नाहीं. धन्याचे राज्यांत अपराधी जाला तरी, हत्यार करून घ्या, परंतु मारा असा शब्द ज्याचे मुखीं आला नाहीं, आजानुबाहु, अजातशत्रु, पुत्र–मित्र–अरि एकरूप व्यवस्थेनी वागवावयाचे. कोणास गैर भाषण केलें नाहीं. असा पुण्यश्लोक राजा निधन पावला ते समयीं राव व पंत सर्व लहानथोर जाऊन बसले. एकच हाहाकार झाला, तेथे यांणी लोकांस किती समजावून सांगावयाचे. अशा आक्रांतीं सकवारबाईच्या सहगमनाची सिद्धता करून हळदकुंकू वाणें दिलीं. महाराजांच्या कानांतील कुड्यांची जोडी प्रसाद म्हणून सकवारबाईनें पेशव्यास दिली. अनेक वाद्ये, घरोघरीं हळदकुंकू समारंभे करून माहुलीस मोठ्या गजरांनीं दोन लाख मनुष्यें जमा झाली. सहगमनविधि झाल्यानंतर सर्वांनीं स्नानें करून शहरांत येऊन दीपदर्शन घेऊन श्रींचे अवलोकनानें पुनीत होऊन घरोघरी गेले. सारे दिवसाचे उपोषित.

नंतर प्रतिनिधि व अष्टप्रधान सर्व मिळोन महाराजांचे नांवाची पाषाणाची लिंगप्रतिमा साळोंका घडोन कृष्णावेणा–संगमीं वाळूवर लिंग ठेवून प्राणप्रतिष्ठा करून स्थापना केली. पूजाअर्चा नैवेद्य याचा बंदोबस्त केला तो चालत आहे. तेथें शाहूमहाराज छत्रपति अद्यापि आहेत. त्यांची मर्यादा जो कोणी ठेवील त्यास न्यून पडणार नाहीं. पेशवे पंतप्रधान रुमालानें प्रथम हात बांधून संगमापलीकडे पायउतारा होऊन नौबती बंद करून छत्रपतींच्या प्रतिमेचें दर्शन घेऊन नंतर साताऱ्यास दर्शनास जात होते. महाराजांनीं यवनांचे नजरबंदींतून येऊन बेचाळीस वर्षे अप्रतिहत आज्ञा पृथ्वीचे ठायीं राज्य करून पुण्यश्लोक होत्साते कैलासवासीं गेले. सर्व हिंदुस्थानांतील राजपूत राजांशीं जयपूर उदेपूर इत्यादिकांशीं बरोबरी किंबहुना वर्चस्व गाजविलें.¶

¶ हिंदु धर्मासाठीं तूं काय केलेंस, मीं काय केलें असा वाद सवाई जयसिंगासीं शाहूनें केलेला आढळतो.

महाराजांचे शरीरीं बालत्वापासोन सत्तर वर्षेपावेतो दुखणें किंवा व्याधि कधीं झाली नाहीं. बहुत दृढ होते. वारा, उष्ण, पर्जन्य उघडे अंगावर सर्व काळ बहुत सोसणें, शिकारींत वगैरेही मस्तकीं पागोटें नाही, विजार किंवा धोतर इतकें मात्र घ्यावें, शालजोडी, पासोडी पुढें पालखींत असावी ऐसें व्रत चाललें. जनानखान्याबाहेर पाऊल पडलें नाहीं. मुली व मुलगे पुष्कळ झाले, जगले नाहींत इतकेंच. चिंचवडचे मोरया देव, कचेश्वरबावा, एकनाथ, तुकाराम, कल्याण गोसावी, पूर्णानंदस्वामी, मनसाराम उदासी, नानकपंथी व मुसलमान संत अशा सर्व धर्मांच्या साधुसंतांस महाराजांनीं नेमणुका बांधून दिल्या. मनुष्यमात्रास ममतेचा वेध लाविला. प्रत्येकास वाटावे कीं आपले इतकी कृपा कोणावर नाही. ज्याचा ज्या कामांत उपयोग त्यांत एखादा अवगुण आहे तरी युक्तीनें झांकून तो त्याजपासून सोडवावा, गुण तितका प्रगट करून द्यावा, माणसें वाढवावीं, याप्रमाणें राज्याची उदयकाल वृद्धि व्हावी हें समजून, पूर्वी वडिलांनीं माणसें दुखविलीं, मारलीं, कारखाने बुडविले त्यामुळें राज्यनाश झाला, उग्रदंड ब्रह्महत्या झाल्या, तें लक्षांत ठेवून देवा ब्राह्मणांचे ठायीं बहुत निष्ठा दाखवून यथास्थित संगोपन करून माणसांचें गुणग्रहण बहुत केलें. आपलेसे करून वेधास लाविले. प्रौढ माणसें सहवासांत ठेवावीं, त्यांच्या युक्ति व बुद्धि ऐकाव्या, सर्वांचा विचार घेऊन कार्यें करावीं. देवा ब्राह्मणांचे इनाम अग्रहार, पूजा नैवेद्य नंदादीप पूर्वील दिले ते चालवून जेथें नाहीं तेथें नवीन बंदोबस्त करून दिले. सेवक लोक बहुत निष्ठेनें आज्ञा तिळप्राय उल्लंघन न करितां चालूं लागले. जें कार्य ज्यास सांगितलें तेथें त्यास यशच प्राप्त व्हावें, ज्यांनीं त्यांनी राज्यवृद्धीस झटावें असें करूं लागले. उग्र दंड करावयाचा नाहीं. शिरच्छेद करणें असल्यास बहुत विवेकें करून कान्होजी आंगऱ्याकडे रवाना करावें. मनसब्यांत बहुत चतुर, सर्व राज्य मोगलाईत गेलें होतें तें मसलतीनें सोडविलें. सर्व लोक आज्ञेंत वागवून नवीन मोठीं माणसें निर्माण केलीं, वाढविलीं. जुनीं माणसें अनुकूल झालीं, त्यांचें चालविलें. शहाण्या पोक्त

माणसांच्या मसलतीने चालावें. विश्वासू सेवक लोकांचे हातून कामे घ्यावीं. लघु मनुष्य, कैफी, व्यसनी, दारूबाज, यांस समीप न ठेवितां मुत्सद्दी लोकांचे हातून कारभार चालविला. मराठे लोकांस शिपाईगिरीचे कामांत ठेविलें. उत्तरदेश सोडवून थोरले महाराजांचा उद्देश सिद्धीस नेला. पूर्वेस दक्षिणेस चतु:समुद्र मर्यादा होऊन चहूं दिशांचें राज्य एक आज्ञा चालू लागले. नीतिन्यायें करून प्रजेचे पालनपोषण केलें. गरीब अनाथांचे ठायीं बहुत दया करून त्यांचें दु:ख परिहार करावें, रयतेस उपद्रव काडीमात्र नाहीं. पर्जन्यवृष्टि यथाकाल होऊन पृथ्वीनें धान्य पीक बहुत द्यावें ऐसें सुभिक्ष झालें."

नशिबाचे खेळ शाहूमहाराजांइतके दुसऱ्या कोणीं अनुभवले नसतील, परंतु ते कधीं डगमगले नाहीत, कीं धैर्य खचूं दिले नाहीं. अर्धा शतकपावेतों त्यांचे सरदार देशभर लढून मराठ्यांचें राज्य वाढवीत होते. स्वकीय व परकीय लोक त्यांची आज्ञा झेलीत. शत्रूंना त्यांचे नांवाचा दरारा वाटत होता. हमेश कोणत्या तरी नवीन विजयाची बातमी येऊन त्यांचें चित्त आनंदानें खुलून जात होतें. वरील दीर्घ काळांत त्यांनीं उदार अंतःकरणानें व थोर मनानें सर्वांचा परामर्ष घेतला, प्रत्येकाच्या कामगिरीचा योग्य मोबदला देऊन सर्वांवर आपला वचक कायम ठेविला. सदैव कारभारांत निमग्न. स्वहस्तानें असंख्य पत्रें लिहिलीं, राज्याचा वाढता व्याप स्वतः संभाळिला. तंटे, भांडणें, मारामाऱ्या, चोऱ्या, दरवडे, खून, अपघात, शिकार, खेळ, बिदाग्या, मेजवान्या, दरबार, सरदारांचे रुसवे व समजुती, विवाहादि समारंभ, बाया पुरुषांचे सत्कार, परराज्यांतील वकिलांचे जाब जबाब, आप्तस्वकीयांचे जन्ममृत्यू अशीं अनेक प्रकरणें रोजच्या रोज विल्हेस लावून, सरदारांस पैसा व फौजा पुरविणें, त्यांचे द्वेष मिटविणे, जयापजयांची खबर ठेवणें अशा किती तरी व्यवहारांचे निकाल जेव्हांचे तेव्हां लावावे लागत. व्याप वाढला तशीं कामेंही वाढलीं. शाहूमहाराजांबद्दल अवमान दाखविण्यास शत्रूंनाही

बुद्धि झाली नाही. खालील मनोरंजक संवाद शाहूची योग्यता यथायोग्य दाखविते. जयसिंगाचा वकील दीपसिंग म्हणून स. १७३० त साताऱ्यास शाहूचे भेटीस आला. शाहूची भेट घेतल्यावर तो औरंगाबादेस जाऊन निजामास भेटला. दीपसिंगाचे व निजामाचें बोलणें झालें ते असें—

**निजाम**—सातारा महाराजांपाशी मातबर मनसुबेबाज ज्यास राजा मानतो ऐसा तुमचे नजरेस कोण आला ?

**दीपसिंग**—याच शोधासाठीं जयसिंगांनी मला साताऱ्यास पाठविलें. बाजीराव पंडितांचें नाव मुलकांत मर्दुमीचे फार आहे. त्यांच्याशिवाय आणिक कोणी सत्यवचनी, प्रामाणिक, पोख्तकारी, चलनसाहेबफौज गिरंदारी दुसरा दिसत नाही.

**निजाम**—राजा खुद्द कसा आहे ?

**दीपसिंग**—राजा बहुतच खुब्या राखतो.

**निजाम**—आम्ही ऐकलें कीं कित्येक गोष्टी हलकेपणाच्या ऐकतो.

**दीपसिंग**—मजलसी सारखे न चालत तर राज्य कसे राहतें. फार पोख्त, शहाणे, विवेकी आहेत. जाबसाल उत्तम करितात.

**नुसता एक बाजीराव शाहूनें पुढें आणला असता तरी त्याचें तें तेवढेंच कृत्य बहुमोल म्हणतां आलें असतें. पण बाजीरावा-सारखीं किती तरी माणसें शाहूनें पुढें आणिलीं व स्वतःचें तेज लोपवून दुसऱ्याचें पुढें आणिलें ! खरोखर असे धनी फार विरळा !**

मराठ्यांच्या राज्यव्यवस्थेंत शाहूमहाराजांनीं प्रचंड रूपान्तर घडवून आणिले. सुईच्या अग्राइतकी जमीन कोणास तोडून देऊं नये, नोकऱ्या किंवा कामें प्रत्येकाच्या लायकीप्रमाणें द्यावीं, केवळ बापाचा पुत्र म्हणून पिढीजाद वारसा कोणाचाही मानूं नये अशा प्रकारचे कडक शिस्तीचे अनेक नियम शिवाजीमहाराजांनीं ठरविले, ते शाहूनें रद्द करून राज्य

कबजांत येण्यापूर्वीच नागपूर, धार, देवास, उज्जैन, इंदूर, बडोदें, सागर, अक्कलकोट, गुत्ती अशा प्रकारच्या मोठमोठ्या जहागिरी त्यानें निर्माण केल्या आणि त्या ठिकाणी नवीन राजधान्या उठवून पिढीजाद अंमल चालविणारी मराठ्यांची घराणीं स्थापन केलीं, हा मोठा फरक एकदम आपल्या मनांत भरतो.

शाहूच्या करामतीचा मुख्य गुण हा की त्याने स्वतःचा स्वार्थ असा कांहीं पाहिला नाहीं. दुसऱ्यास पुढें आणणें, परहित साधणें, दुसऱ्याच्या कल्याणानें संतोष पावणे, परदुःखाने गहिवरणे ही उच्च नीति त्याच्या ठिकाणीं बाणलेली होती. त्याच्या बुद्धीत जातिभेद, धर्मभेद बिलकुल नव्हता. ती बुद्धि निर्मळ पाण्यासारखी निष्कलंक होती. अक्कलकोटकर फत्तेसिंग भोसले, कऱ्हाडकर प्रतिनिधि, नागपूरकर रघूजी भोसले, किंवा सेनापति यशवंतराव दाभाडे अशा किती तरी मंडळींस शाहूने पेशव्यांपेक्षांही कांकणभर जास्त उत्तेजन दिले. पण जगाचा व्यवहार असा आहे की त्यांत अंगची योग्यताच शेवटीं कामास येते, दुसऱ्याच्या साह्याचा फारसा उपयोग पडत नाहीं. पराक्रमास क्षेत्र दाखविणें शाहूनें केले, पण त्या क्षेत्राची मशागत करून त्यांत यश दाखविणें हें ज्याच्या त्याच्या कुवतीवर अवलंबून राहिलें. इतरांच्या मानाने ही कुवत पेशव्यांच्या ठिकाणी जास्त दिसली, म्हणून ते पुढे आले, बाकीचे मागें पडले.

राज्यविस्ताराची विशिष्ट पद्धत शाहूनें स्वीकारली ती अशी: एकदां नागपूरकर भोसल्यांस जवळ बोलावून त्याने सांगितलें, "हे पहा, तुमच्या हातांत पैसा नाही, आमच्याही नाहीं. मुलूख सगळा तुमचा आहे. फौजा जमवा, मुलुखगिरी करा, सोयीस येईल तिकडे जा, हिंमतीनें आपलीं ठाणीं बसवा, वाडे बांधा, वसाहती उठवा, दक्षिणचे हरहुन्नरी लोक बरोबर न्या, उद्योगधंदे व्यापार-सावकारी चालू करा. मंदिरें बांधा, देवाब्राह्मणांचें संगोपन करा; म्हणजे देवही तुम्हांस पावेल. तुमचें दैन्य फिटेल. पैसा नसला तर कर्जें काढा, उद्योग करून ती फेडा." असा

हा स्वावलंबनाचा बिनभांडवली धंदा बादशाही सनदांच्या आधारावर शाहूने लोकांस दाखवून दिला. हां हां म्हणतां मराठे सरदार कंबरा बांधून बाहेर पडले. सावकारांचीं कर्जे घेतलीं. जिवास जीव देणारे साथीदार जमविले, कोणीं नागपुर वसविले, कोणी धारेस ठाणें दिलें, कोणी इंदुरास पेशव्यांच्या पुण्याच्या वाड्याची नक्कल उठविली, मंदिरे बांधलीं, बाजार वसविले, अठरा पगड जातीचे स्वतःचे लोक दक्षिणेतून नेऊन उत्तरेंत छावण्या बांधल्या. म्हणूनच मराठशाहीचा फैलाव देशभर होऊन मराठ्यांचा इतिहास बनला. कोणाचाही हेवादावा न करतां सर्वांचें प्रेम संपादून व स्वार्थावर तिलांजलि देऊन शाहूने हा प्रयोग साधला. गोवधबंदीचे फर्मान सर्व हिंदुस्थानभर सुटले. तीर्थक्षेत्रें निर्वेध झालीं. सावकारी व पेढ्या वाढल्या. उत्तर दक्षिण दिशांमध्यें प्रचंड देवघेव उत्पन्न होऊन महाराष्ट्राचे जीवन पुष्ट झाले.

उद्दाम माणसांस नरम करण्याची शाहूची पद्धत पुढील विशिष्ट उदाहरणांत चांगली दिसून येते.

इंद्रोजी कदम नांवाचा एक लहानसा सरदार चारदोनशें स्वार बाळगणारा पण गर्विष्ठ होता. एकदां महाराजांची व त्याची भेट ठरली. भेट दरबारी थाटाची होती. पेशवे किंवा इतर सरदार दर्शनास येऊं लागले म्हणजे मागें बऱ्याच अंतरावर त्यांनीं नौबती व वाद्यें बंद करून घोड्यावरून उतरून चालत यावें असा रिवाज ठरलेला होता. इंद्रोजी कदमानें मोठ्या डौलाची स्वारी शृंगारली. लोकांना भरजरीचे मोलवान पोषाख देऊन घोड्यांनाही सोन्याचांदीचा शृंगार चढविला आणि अशा थाटानें तो वाद्यें वाजवीत घोड्यावरून न उतरतां तसाच थेट वाड्यापावेतों येऊं लागला. कामदारांनीं महाराजांना हा प्रकार कळवून सांगितलें,–" आम्ही पुढें जाऊन इंद्रोजीला अटकाव करतों. " त्यावर महाराज बोलले, "तुम्ही सर्व स्वस्थ रहा, कांही करूं नका. कदमरावाच्या

वर्तनाची जबाबदारी मी पाहून घेईन." असें म्हणून नेहमीप्रमाणे अंगांत कफनी चढवून संन्यासवृत्तीनें आपण दरबारांत जाऊन बसले, आणि जवळ मोत्या कुत्रा होता त्यास सर्व शृंगार चढवून जवळ बसवून घेतला. पुढे इंद्रोजी कदम आपल्या तोऱ्यानें उद्धट पावलें टाकीत दरबारांत आला त्याबरोबर महाराज बोलले, "या कदमराव, बसा. तुमचा हा थाट पाहून आम्हांस मोठा संतोष वाटतो." इतक्यांत कदमाची नजर शाहूनें शृंगारलेल्या मोत्या कुत्र्याकडे गेली आणि मनचे मनांत तो इतका विरघळून गेला कीं लगेच उठून त्याने सद्गदित अंतःकरणानें महाराजांचे पाय धरले आणि म्हणाला, "मी सहस्र अपराधी आहें. अन्याय क्षमा करावे."

तात्पर्य शांत व गोड स्वभावानें, उदार व परोपकारी वृत्तीनें या जगांत थोर कार्यें सिद्धीस नेतां येतात हा प्रयोग शाहूच्या चरित्रांत पहावयास मिळतो. अशा लोकोत्तर पद्धतीचा अवलंब करून शाहूनें मराठी राज्याचा विस्तार हिंदुस्थानभर करविला आणि जनतेकडून पुण्यश्लोक व अजातशत्रु हीं चिरंतन बिरुदें मिळविलीं. म्हणून राष्ट्रीय दृष्ट्या या पुण्यश्लोकाचें चरित्र स्फूर्तिदायक म्हटलें पाहिजे.

# १५

# ग्रहणांतलें राजकारण



**The fall of the Marathas is rightly attributed to inferiority in discipline, equipment and command** —*Sen*

**" लष्करी टापटीप, लष्करी साहित्य व लष्करी हुकमत या बाबतींत मराठे कमी पडले म्हणून त्यांचें राज्य गेलें.**

**—सेन**

ता. २१ नोव्हेंबर. स. १७५१ मार्गशीर्ष शु।। १५ या दिवशीं रात्रीं खग्रास चंद्रग्रहण होतें. पेशव्यांची स्वारी निजामावर चालून जात असतां त्यांचा मुक्काम त्या दिवशी जुन्नर अलीकडे कुकडी नदीच्या कांठीं झाला. चंद्रग्रहण म्हणजे आपल्या धर्माप्रमाणें पर्वकाळचा योग. यापूर्वी महिना दोन महिने पेशवे-निजामांच्या झटापटी चाललेल्या असून उभयतांच्या फौजा एकमेकींवर टपून बसल्या होत्या. कुकडी नदीवर मध्यरात्रीच्या सुमारास पेशवे व इतर मंडळी स्नान व जपजाप्य करण्यासाठीं गेली होती. आश्रित शागीर्द वगैरे सेवकगण व सुवर्ण-रौप्यादि उपकरणांची मांडामांड पेशव्यांच्या वैभवास साजणारी असून, त्या थाटानें नदीपात्र फुलून गेलें होतें. नदीवर स्नान आटपून पेशवे जप करीत देवतार्चनांत ध्यानस्थ बसले. देव पाण्यांत बुडवून ठेवले. चंद्र खग्रास होत चालला तेव्हां प्रकाशही अंधुक झाला. अशा समयीं ज्याप्रमाणें आकाशांतून वीज कडकडावी त्याप्रमाणें पूजेच्या जागी एकदम तोफांचे प्रचंड गोळे येऊन पडूं लागले कोणाच्या ध्यानीं मनीं हा प्रकार नव्हता आणि लढाईच्या दृष्टीनें कोणी सावधही नव्हते. गोळे येऊन पडूं लागल्याबरोबर जो तो

आश्चर्यचकित होऊन सैरावैरा धावूं लागला! देव, उपकरणीं वगैरे जागच्याजागींच टाकून प्रत्येक असामी वाट फुटेल तिकडे पळत सुटला! पेशव्यांनींही धूम ठोकली! कित्येक माणसें मरून पडलीं. खुद्द पेशव्यांना गोळा लागला नाहीं हें भाग्य! अशा रीतीनें ती रात्र मोठ्या कष्टांत व भीषण अवस्थेंत गेली.

उजाडतांच पेशव्यांनीं फौजा आवरल्या आणि झालें काय याचा तपास चालविला. तपासाअन्तीं असें कळलें कीं निजामानें फ्रेंचांची फौज मदतीला आणून लढाईची नवीनच पद्धति सुरू केली आहे. बुसी नांवाचा एक मोठा युद्धविशारद सेनानी नोकरीत घेऊन उंट व घोडे यांजवर लहान तोफा लादून अचानक शत्रूचा धुव्वा उडवावयाचा अशी ही नवीन शक्कल शत्रूनें काढलेली आढळून आली.

आजपर्यंत मराठ्यांची सर्व भिस्त काय ती गनिमी काव्याच्या युद्धावर होती. ही गनिमी काव्याची पद्धत मलिकंबराच्या वेळेपासून मराठ्यांच्या अंगवळणीं पडली. शहाजी एवढा प्रबळ झाला तो या पद्धतीनेंच. डोंगरांत अडचणीच्या जागीं लहान मोठ्या टोळ्या करून आपण सुरक्षित राहावयाचे, शत्रू खालीं मैदानांत आले म्हणजे अचानक त्यांवर छापा घालून त्यांचा फन्ना उडवावयाचा, आणि त्यांचे वित्त व सामान लुटून पुनः अल्पावकाशांत एकदम दूर कोठे असें नाहीसें व्हावयाचें कीं शत्रूला त्यांचा पत्ताच लागूं नये. शिवाजीनेंही या पद्धतीचा पुष्कळ उपयोग केला. पुढें औरंगजेब जेव्हां आपल्या प्रचंड फौजांनिशीं दक्षिणेत उतरला तेव्हां त्याच्याशीं पंचवीस वर्षें लढून मराठ्यांनीं त्याचा पाडाव केला तो केवळ या आपल्या गनिमी काव्याच्या जोरावरच होय. मोगलांची फौज शौर्यांत कांहीं कमी होती असें नाहीं. पण त्यांचा डामडौल बेसुमार! घोडे शृंगारण्यांतच किती तरी वेळ जावयाचा! सोन्याचांदीचे दागिने व भरगच्ची कपडे जनावरांवर चढविलेले असावयाचे, स्वारांचे पोषाखही

भपकेदार. घोड्यावर बसणाऱ्या स्वाराचा हुक्का सांभाळण्याला एक नोकर बरोबर धावत असावयाचा, मारे जिकडे तिकडे डौल आणि श्रीमंतीचा थाट. अशा प्रकारची बादशाही फौज मैदानी लढाईला कितीही चांगली असली तरी दक्षिणेंतल्या डोंगरी व अवघड प्रदेशांत लहानशा भीमथडी तट्टांना टारगटपणें उडवीत जाणाऱ्या या ऱ्हस्वाकृति मराठे स्वारांपुढें मोगलांच्या प्रचंड सेनेचा कांहींएक इलाज चालला नाहीं. या गनिमी काव्याचा उपयोग करूनच संताजी घोरपड्यानें औरंगजेबास जेरीस आणिलें. त्यानें पूर्व पश्चिम किनाऱ्यांस व्यापणाऱ्या शेकडों मैलांच्या अफाट रणांगणावर मोगलांचा फन्ना उडवून दिला. पुढें पेशवाईत या पद्धतीचा यशस्वी अवलंब मल्हारराव होळकरानें व थोडाबहुत शिंद्यांनींही केला. तोफा अवजड असल्यामुळें आणि त्या ओढण्यास बैल वगैरे पुष्कळ लागत असल्यामुळें लांबलाबच्या मजला मारणाऱ्या मराठी फौजांना त्यांचा उपयोग करतां येत नसे. बंदुकाही त्या वेळीं हल्लींच्या सारख्या सर्वांच्या आटोक्यांत आल्या नव्हत्या. सत्तावन सालच्या प्रसंगापर्यंत हातांत जळती दोरी घेतल्याशिवाय बंदुका पेटवितां येत नसत. वसईसारख्या कित्येक प्रसंगांत मराठ्यांनीं तोफांचा उपयोग केला पण तो तेवढ्याच पुरता. शास्त्रीय पद्धतीनें तोफखाना हें युद्धशास्त्रांतलें एक मोठें उपयोगाचें साधन म्हणून तें आपण हस्तगत करण्याकडे पेशव्यांचें लक्ष पूर्वी गेलें नव्हतें.

पण वर सांगितल्याप्रमाणें त्या ग्रहणाच्या समयीं एकाएकीं तिरपीट उडाली, त्या योगानें पेशव्यांना तोफखान्याचा खरा प्रभाव स्पष्ट दिसला. तोफखाना बाळगायचा म्हणजे त्याच्याबरोबर शीघ्र गतीनें चालणारीं पायदळ पलटणेंही पाहिजेत. तोफांनीं एखाद्या तटाला खिंडार पाडलें की लगेच पायदळानें धावत येऊन ते स्थान काबीज करावयाचे असतें. पण हीं पलटणें कवायतींत मुरलेलीं आणि वरिष्ठांचा हुकूम तंतोतंत पाळणारीं

अशीं असावीं लागतात. आम्हां मराठ्यांची पद्धत म्हणजे केवळ अव्यवस्था व गोंधळ ! शिस्त म्हणून कशी ती त्यांना ठाऊक नाही. एक जेवण करतो आहे, दुसरा बाजारांत गेला आहे, एकानें चोळणा घातला आहे तर दुसऱ्याने लंगोटा कसला आहे, अशीं जितकीं माणसें तितक्या तऱ्हा असावयाच्या ! एकजूट ही त्यांना कधीं ठाऊक नाही. खजिन्यावर मराठ्यांचा पहारा असला कीं जी अव्यवस्था माजे ती पुसूंच नये ! हुक्की आली कीं चिलीम ओढण्यास म्हणून हवालदारसाहेब पहारा सोडून खुशाल निघून जावयाचे ! आणि जेवायला गेले तर तिथेच तास तास बसावयाचे ! शिस्तीची सेना तयार करण्याचें शास्त्र प्रथम पाश्चात्यांनीं पूर्णतेस पोंचविले. त्यांतले पहिले निष्णात पुरुष मराठ्यांच्या ओळखीचे झाले ते क्लाइव्ह व बुसी हे होत. असो.

नानासाहेब पेशव्यांनीं झाल्या गोष्टीपासून लगोलग बोध घेतला. बुसीची सर्व माहिती आणून त्याला आपल्या नोकरींत घेण्याची त्यांनी पराकाष्ठा केली. परंतु बुसीचे राजकारण इंग्रजांना घालवून देऊन फ्रेंच सत्ता पूर्वकिनाऱ्यावर कायम करण्याचे असल्यामुळे त्याला मराठ्यांची पर्वा वाटली नाही. निजामाचें राज्य पूर्व किनाऱ्यापावेतों पोंचलें होतें; आणि पेशव्यांपेक्षां निजामच बुसीला ज्यास्त सोइस्कर व आपल्या फायद्याचा वाटला म्हणून त्यानें पेशव्यांच्या नोकरींत येण्याचें साफ नाकारलें.

पुढें नऊदहा वर्षेंपावेतों निजाम-मराठ्यांचे अनेक युद्धप्रसंग झाले. त्यांत बुसीचें कौशल्य पेशव्यांच्या नजरेंत चांगलेच भरलें. या बुसीनें आपल्या हाताखालीं अनेक मुसलमान योद्धे पाश्चात्य कवाईत शिकवून तयार केले आणि तेही अनुभव घेतां घेतां खुद्द बुसीइतकेच त्या कलेत निष्णात बनले. त्यांतले मुजफ्फरखान व इब्राहीमखान हे तोफखाना व पाश्चात्य कवाईत यांत निपुण असलेले दोन मुसलमान गार्दी पेशव्यांनीं हरप्रयोग करून आपल्या नोकरींत घेतले मुजफ्फरखान तर विशेषच

पराक्रमी होता. त्याजकरवीं पेशव्यांनी आपला स्वतःचा तोफखाना सजविला आणि त्याजवर पानसे नांवाचे ब्राह्मण सरदार मुख्य नेमिले. पण कांही झालें तरी युद्धाच्या या यांत्रिक कलेंत मुसलमान जितके प्रवीण झाले तितके ब्राह्मण किंवा मराठे होऊं शकले नाहीत. आगगाडीचें एंजिन चालविणारा ड्रायव्हर एका हातांत खाणें व दुसऱ्या हातांत यंत्र धरून आपलें काम चालवितो, तो प्रकार हिंदूंना साधला नाही. अन्नोदकादि व्यवहारांत धर्माची आडकाठी हिंदूंना बाधक झाली. नाविक किंवा यांत्रिक व्यवसायांत हिंदु लोक अद्यापि मागे पडलेले दिसतात. असो.

वर सांगितलेल्या मुजफ्फरखानाने पेशव्यांची कामगिरी पांच चार वर्षें बुसीच्या इतकीच व्यवस्थित व उत्कृष्ट बजावून दाखविली. परंतु पुढें कांहीं कारणावरून त्याचें व पेशव्याचें वैमनस्य आलें. मुख्यतः भाऊसाहेबांस तो पाण्यांत पाहूं लागला; आणि एकदां तर भाऊसाहेब दरबारांत सरकारी काम पाहत बसले असतां मुजफ्फरखानाने अचानक येऊन त्यांच्या पाठीत खंजीर खुपसला, पण सुदैवानें तो पूर्ण मारक झाला नाहीं. लगेच भाऊसाहेबांनीं त्याला पकडून तोफेच्या तोंडीं दिले; आणि त्याचा एक चेला इब्राहीमखान म्हणून होता त्याला आपल्या नोकरींत घेतलें. पानिपतावर मराठ्यांच्या तोफखान्याचा मुख्य अंमलदार इब्राहीमखान गार्दी † होता. इब्राहीमखानाने तीनशे तोफांचा उत्कृष्ट संच तयार केला. पानिपतावर निघण्यापूर्वी एकच वचन त्याने भाऊसाहेबांकडून घेतलें कीं, "माझा तोफखाना तुमच्या घोड्यांबरोबर गनिमी काव्यानें पळूं शकणार नाहीं. तुम्ही एकाच जागीं ठांसून उभे राहाल तर मी शत्रूंचा

† **गारदी** हा शब्द इंग्रजी गार्ड याचा अपभ्रंश होय. त्याचा अर्थ पाश्चात्य कवाईत शिकून शिस्तीने वागणारा शिपाई. याच गारद्यांनीं पुढे नारायणरावाचा खून केला.

असा फन्ना उडवीन कीं तुम्ही कौतुकच करावें." भाऊसाहेबांनीं हें त्याचें म्हणणें मान्य केलें, त्यामुळें तो पानपतावर तोफांचा आरावा रचून अबदालीशीं लढला आणि याच संग्रामांत तो पुढें मारला गेला. असो.

सांगावयाचें तात्पर्य असें कीं मनुष्य अनेक कामें, प्रसंगानें शिकत असतो. ग्रहणाच्या वेळीं देवतार्चन एकीकडे टाकून पेशव्याला पळून जावें लागलें. पेशव्यांची पूजा चालली आहे तेव्हां त्यांना आपण या प्रसंगीं त्रास देऊं नये असें बुसीनें मनांत आणिलें नाहीं, यापासून जो बोध घ्यावयाचा तो पेशव्यांनीं घेतला.

# १६

# उत्साहकारी अपजय



**The battle of Panipat was a triumph and a glory for the Marathas. The victorious Afghans never again interfered with the affairs of India** —*Major Evans Bell*

**द्वाविमौपुरुषौलोके सूर्यमण्डलभेदिनौ**
**परिव्राड् योगयुक्तश्च रणेचाभिमुखेहतः ॥**

मनुष्य कोणतेही काम अंगावर घेऊन मनापासून करूं लागला म्हणजे उत्तरोत्तर त्यांत तो निष्णात बनत जातो, ही गोष्ट मराठ्यांच्या इतिहासांत फार चांगली व्यक्त होते. राज्यकारभाराचे काम अंगावर पडतांच मूळचे भट भिक्षुक व क्षेत्रोपाध्ये अल्पावकाशांत सेनानी, मुत्सद्दी, सावकार वगैरेंच्या पेशांत निष्णात बनले. उद्योगास क्षेत्र मिळाले म्हणजे राष्ट्राचा भाग्योदय ताबडतोब होत जातो तसेंच मराठ्यांचे झालें. पाण्यांत पाऊल ठेविल्याशिवाय पोहतां कसे येईल? आज देखील आपली मुख्य कुचंबणा आहे ती हीच.

बाळाजीपंत नानास पेशवाई मिळाल्यापासून माधवरावाच्या मृत्यूपर्यंत जो साठ वर्षांचा काळ गेला त्यांत एकंदर मराठी राष्ट्र सर्व बाजूंनीं वृद्धि पावलें. मुख्यतः लष्करी पेशा ब्राह्मणांनीं देखील पूर्णपणें उचालिला.

बाळाजीपंत नाना प्रथमच दिल्लीला गेले तेव्हां तें एक मोठें प्रचंड धाडसच होतें. बरोबर त्यांनीं आप्त स्नेही अशी बरीच मंडळी घेतली. पण भिक्षुकांचे आप्तही भिक्षुकच असणार! तीर्थयात्रा करीत जाणें हें त्या वेळच्या ब्राह्मणांचें पहिले कर्तव्य. मराठ्यांच्या उत्तर हिंदुस्थानांतील

स्वाऱ्यांत तीर्थयात्रा हें एक नेहमींचेंच प्रयोजन होतें! जातांना बाळाजीपंत नाशकास गेले. तेथे तीर्थविधि उरकला. त्यांचा क्षेत्रोपाध्या महादेवभट हिंगणे म्हणून होता. उत्तरेस जाण्याची निकड. बाळाजीपंतांनीं महादेव-भटास सहज विचारलें, "कां, भटजी, येतां का आमच्या बरोबर स्वारीस?" भटजी म्हणाले, "आमचा हो काय तुमच्या स्वारीला उपयोग? आम्ही बोलून चालून श्राद्धसंकल्प सांगणारे भिक्षुक गडी. यात्रेकरूंना चार मंत्र सांगावे आणि दक्षिणा मिळवून निर्वाह करावा हें आमचें काम!"

**बा०**—पण चार दिवस हे काम बंद ठेवून बाहेर जाऊन पहा तर खरे!

**भ०**—आपण म्हणतां तर येतों. आपल्या कृपेने आम्हांला बाहेरचा प्रदेश दिसेल, तिकडचीं क्षेत्रेंही पहायला मिळतील. एवढ्या अगत्यानें बोलावणारा तरी कोण आहे?

**बा०**—मी तेच म्हणतो. सहज योग आहे, चला जाऊं.

**भ०**—ठीक आहे. आपली इच्छा असेल तर माझी कबुली आहे.

**बा०**—मग करा तयारी. न जाणो कदाचित् एखाद्या कामांत तुमचाही आम्हांला उपयोग घडेल.

अशा रीतीने बोलणें होऊन महादेवभट बाळाजीपंताबरोबर दिल्लीस गेले.¶ स. १७१८च्या कार्तिकांत मंडळी निघाली ती पुढील मृगास परत आली. फाल्गुनपावेतों दिल्लीची कामगिरी आटोपून पेशवे आपल्या मंडळीसह दक्षिणेंत परत निघाले तेव्हां मागें दिल्लींत आपल्या भरंवशाचा कोणी तरी जाणता इसम कायमचा ठेवण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. स्वराज्याच्या बादशाही सनदा कागदावर जरी पेशव्यांच्या हातीं पडल्या तरी त्यांचे प्रत्यक्ष व्यवहार उलगडणें हें कालावधीचेंच काम होतें; आणि

¶ नाना फडणिसाचा आजा बाळाजी महादेव भानु असाच वेळासचा भिक्षुक. हाही स्वारीबरोबर होता. तो याच स्वारींत दिल्ली येथील दंग्यांत मारला गेला.

त्यांत जे कांहीं प्रश्न उद्भवतील त्यांचें निराकरण करून पेशव्यांचें हित दिल्लींत राहून संभाळणे, या कामासाठीं कोण नेमावा, असा प्रश्न उपस्थित झाला, तेव्हां बाळाजीपंतांनीं महादेवभटास विचारिलें, " कां भटजीबुवा; तुम्हीं पत्करतां का हें काम ?" भटजीबुवानीं उत्तर दिलें, " आपला माझ्यावर इतबार असेल तर यथाशक्ति हा देह प्राणासुद्धां आपल्या सेवेंत अर्पण करण्यास मी केव्हांही तयार आहे ! " व्यवहार ठरला, आणि नाशिकचा क्षेत्रोपाध्या दिल्लीचा वकील बनला !

उत्तरोत्तर मराठशाहीचा फैलाव झाला, कामें वाढलीं. उत्तर हिंदुस्थानांतील एकेक प्रांत मराठ्यांच्या कबजांत आले. शिंदे, होळकर, पवार इत्यादि नवीन सरदार तयार होऊन मराठ्यांचा दरारा लखनौ, लाहोर, मूर्शिदाबादपावेतो पोचला. महादेवभटाला चार पुत्र झाले, तेही मोठे बुद्धिमान् व पराक्रमी निघाले. राष्ट्रकाजाबरोबर त्यानीं उत्तर हिंदुस्थानांत उत्तम प्रतीची सावकारी थाटून संपात्तिही भरपूर मिळाविली.

महादेवभटाचे वास्तव्य दिल्लींत २५.२६ वर्षें झालें. दिल्लींतले मोठमोठे उमराव त्याच्या आर्जवांत राहूं लागले. नादिरशहानें स्वारी केली तेव्हां दिल्लींत मराठ्यांचे संधान महादेवभटानें संभाळले. असे होतां होतां पुढें एकदां दिल्लींत मनसूरअलीखान म्हणून एक बडा उमराव बादशाही कामावर मुख्य असतां कांहीं कामानिमित्त महादेवभट त्याच्या भेटीस गेला. भेटींत बोलाचाली होऊन उभयतां वर्दळीवर आले. मनसूरअलीखान जरा संतापून महादेवभटास कांहीं अपशब्द मुसलमानींतच बोलला. ती भाषाही महादेवभटास चांगली अवगत होती. कसा झाला तरी तो मराठ्यांचा प्रतिष्ठित वकील. बादशाही उमराव झाला म्हणून त्याचे अपशब्द तो थोडेच सहन करणार ! आपण काय करतों याच तितकेसें अवधान न ठेवितां महादेवभटानें आपल्या जाग्यावरून उठून उजव्या हातानें खाडकन् त्याच्या एक चांगली श्रीमुखांत लगाविली ! जवळ

खानाचे हत्यारबंद संरक्षक होते त्यांनीं त्याच ठिकाणीं तलवारी चालवून भटाच्या देहाचीं खांडोळीं पाडलीं. भटजींचा एक पुत्र बरोबर होता त्यालाही जखमा झाल्या. हा एकंदर प्रकार निमिषमात्रांत घडून आला. पुढें या प्रकरणाची निवृत्ति काय व्हावयाची ती झाली. मराठ्यांच्या इभ्रतीस कांहींएक कमीपणा आला नाहीं. यःकश्चित् नाशिकचा पंड्या बादशाही उमरावावर हात टाकतो यावरून मराठ्यांचें बल त्या वेळी किती वाढलें होतें हें यांत चांगलें व्यक्त होतें. बाजीरावाचा स्वयंपाकी गोविंदा खेर बुंदेलखंडचा कारभारी होऊन गोविंदपंत बुंदेले या नांवानें प्रसिद्धीस आला, त्याचीही हकीकत अशाच तोडीची आहे. असो.

मराठ्यांची दहशत देशांत बसत चालली. प्रत्यक्ष बादशहानें त्यांचा आश्रय केला. उद्यां हे मराठे मोगलांचें राज्य बुडवून हस्तिनापुरच्या सिंहासनावर आपलाच एखादा चक्रवर्ती निर्माण करतील अशी भीति कित्येक मुसलमानांस पडली. वस्तुतः मोगल बादशाही बुडवावी अशी इच्छा किंवा कल्पना एकाही हिंदूची नव्हती. आपल्या धर्माला मुसलमानांनीं अवरोध करूं नये, हिंदूचीं पवित्र स्थलें हिंदूंच्या कबजांत असावीं, देशाच्या कारभारांत आपणासही अधिकार असावा एवढेंच मराठ्यांचे हेतु होते. पण कित्येक उपद्व्यापी माणसांनीं या हेतूंचा बुद्धिपुरस्सर विपर्यास करून अब्दाली व मराठे यांचा एक नवीनच झगडा उठवून दिला, त्याचें पर्यवसान पानिपतच्या संग्रामांत कसें झालें तो प्रकार खालील संवादांत नजरेस येईल. हा संवाद सगुणाबाई पेशवे व समशेरबहाद्दर यांजमध्यें झांशीच्या मुक्कामीं स. १७५७ च्या फाल्गुनांत झाला. ही सगुणाबाई नानासाहेबाचा धाकटा बंधु जनार्दनपंत तरुणपणीं मेला होता, त्याची विधवा बायको. त्या वेळीं ती काशीयात्रेस गेली असतां अब्दाली दिल्ली मथुरेवर चालून आला होता, आणि समशेर-बहाद्दर,—मस्तानीचा पुत्र—त्या बाजूस बंदोबस्तास होता. सगुणाबाई धूर्त व चाणाक्ष होती हें त्या वेळच्या कागदांत दिसून येतें.

**सगु०**—बाबासाहेब, † अब्दाली मथुरेवर चालून आला, म्हणून आता आमची ती यात्रा अंतरली याचा मोठा खेद वाटतो. पण या अब्दालीचा आम्हां पेशव्यांशी एवढा विरोध कां ? इकडच्या या भानगडी थोड्या समजून घ्याव्या म्हणून मुद्दाम तुम्हास बोलाविलें.

**सम०**—वहिनीसाहेब, मी धर्मानें मुसलमान, पण खुद्द पेशव्यांचा खानाजाद. दिल्लीच्या कारस्थानांतील बिंगे मला कळतात तशी बहुधा दुसऱ्या कोणास कळणार नाहीत. नादीरशहाच्या स्वारीपासून बादशहा अगदीं निराधार बनले. नादीरशहाचा पक्का चेला हा अब्दाली, नादीरशहास ठार मारून त्याचें राज्य बळकावून बसला. हिंदभूमि म्हणजे केवळ कामधेनु. पैशाच्या लोभानें तो इकडे स्वाऱ्या करूं लागला, तेव्हां बादशहानें सिंदे होळकरांमार्फत पेशव्यांशीं लेखी करार करून त्यांची फौज स्वसंरक्षणाला घेतली. याचा उघड अर्थ असा कीं कोणी शत्रु चालून आला कीं बादशहाचें संरक्षण करण्याचें जोखीम मराठ्यांनी पत्करिलें.

**सगु०**—खरें, पण यांत धर्माचा कांहीं संबंध नाही. मुसलमानांचा धर्म कांहीं मराठे बुडवीत नव्हते.

**सम०**—आपलें म्हणणें बरोबर आहे. पण पुष्कळदां राजकारणांत मुद्दाम भलतीच हूल उठविली जाते. नजीबखान रोहिला नांवाचा दिल्लीचा एक पठाण उमराव अब्दालीस सामील झाला. त्यानें नसती उठाठेव करून अब्दालीस चिथवून दिलें, कीं हे काफीर हिंदु आमचा धर्म व आमचें राज्य बुडवितात. वास्तविक या मोगलांना हे पठाण दृष्टिसमोर नकोत. पठाणांचा व त्यांचा उभा दावा आहे. अब्दालीस बाहेर घालवून बादशाहीचा बचाव करावा हाच तर आम्हां मराठ्यांचा मोठा संकल्प आहे. मुख्य खेळ्या हा नजीबखान असून त्याला उठल्या सुटल्या हे मल्हारराव सावरून धरतात. पण नजीबखानाच्या गमजा आतां फार दिवस चालणार नाहींत. दादासाहेब मोठ्या फौजेनिशीं चालून येत आहेत हें ऐकून हा अब्दाली आतां लगेच निघून जाईल. आपण बिलकुल

† समशेरबहाद्दरास घरांत बाबासाहेब म्हणत.

चिंता करूं नये. आपली मथुरा अंतरेल खरी, पण ती पुन: केव्हां तरी सहज सिद्धीस जाईल.

यानंतर सगुणाबाई निघून दक्षिणेत गेल्या. रघुनाथरावदादा येण्यापूर्वीच अब्दालीनें दहा कोटीची मत्ता घेऊन स्वदेशीं प्रयाण केलें. दादांनी दिल्लीचा बंदोबस्त करून पंजाबांत चाल केली. तिकडे अब्दालीच्या फौजा होत्या त्यांस पिटाळून लाहोरचा कबजा घेतला. तसेच लगोलग अटकेवर जाऊन हिंदभूमीच्या सरहद्दीवर त्यांनीं मराठ्यांचे झेंडे उभारले, आणि भीमथडीच्या तट्टांस सिंधूचें पाणी पाजलें. इतकेंच काय, पण पलीकडे अफगाणिस्तानांत आपली लष्करी छावणी बसवून अब्दालीचा कायम बंदोबस्त करावा अशी सूचना त्यांनीं पुण्यास लिहून पाठविली, आणि पंजाबचा बंदोबस्त सिंदेहोळकरांवर सोपवून आपण दक्षिणेत परत गेले.

आपण केलेला डाव फसला यामुळें नजीबखानाचा संताप झाला. त्याने इकडे सिंदे होळकरांस वाटेल तशा थापा देऊन चकविलें, आणि अब्दालीस गुप्त पत्रें लिहून त्यास चेव आणला कीं आपला मुसलमानांचा सर्व उद्योग या मराठ्यांनीं हाणून पाडला हें तुम्हांस मोठें लांछन आहे. अब्रूची चाड असेल तर पुनरपि येऊन या काफरांचा बंदोबस्त करा. एवढें हें आव्हान स्वीकारणें अब्दालीला भाग होतें. तो ताबडतोब मोठ्या तयारीनें चालून आला. दत्ताजी सिंदे दिल्लींत होता, त्यानें उतावीळ करून अब्दालीशीं गांठ घातली. स. १७६० च्या संक्रान्तीच्या दिवशीं दिल्लीजवळ यमुनेच्या निर्जल पात्रांत उभय फौजांचें हातघाईचें रणकंदन होऊन सिंद्याचे पुष्कळ लोक कापले गेले. दत्ताजी सिंदे गोळी लागून घायाळ झाले असतां कुत्बशहा नांवाच्या नजीबखानाच्या सरदारानें त्याचें शीर कापून अब्दालीस नजर केलें. शीर कापतांना कुत्बशहा दत्ताजीस म्हणाला, "क्यौं पटेल, और लढेंगे ?" दत्ताजीनें खाडकन उत्तर दिलें, "जीयेंगे तो औरभी लढेंगे !"

बाजू मराठ्यांवर उलटली. वर्तमाने विजेसारखीं दक्षिणेंत पेशव्याचे कानावर येऊन आदळली. त्याबरोबर हातचीं दुसरीं कामें टाकून पेशव्यानें सदाशिवरावभाऊ व पुत्र विश्वासराव यांस उत्कृष्ट फौजा व साहित्य देऊन लगोलग अब्दालीवर रवाना केलें. स. १७६० च्या गुढी पाडव्यास भाऊसाहेब अहमदनगराहून स्वारीस निघाले. श्रावण शुद्ध प्रतिपदेस त्यांनी दिल्ली हस्तगत केली आणि पुढील संक्रांतीस पानिपतच्या मैदानावर मराठ्यांचा पराजय झाला.

एवढ्या या प्रचंड आख्यानाची गोष्ट रोमांचकारी तर खरीच, पण अनेक दृष्टींनीं आज देखील बोधप्रद आहे. ती खुलासेवार समजून घेण्याची उत्कंठा आज जशी सर्वांस असणार, तशीच ती त्या वेळीं देखील पुष्कळांस होती. प्रत्यक्ष पेशव्याची बायको गोपिकाबाई, जिचा होतकरू पुत्र विश्वासराव समरांगणीं पडला, तिला देखील पानिपतच्या पराभवाचीं वर्तमानें ऐकून सर्व गोष्टी संथपणे समजून घेण्याची अत्यंत हुरहूर लागली. पेशव्याबरोबर ती उत्तर हिंदुस्थानांत ग्वालेरपावेतों गेली असतां पानिपतची विपरीत खबर आली. काशीराज शिवदेव नांवाचा पेशव्याचा एक राजनिष्ठ व चाणाक्ष मुत्सद्दी शुजाउद्दौल्याजवळ वकील असून तो पानिपतावर हजर होता. त्यास पुढे चार महिन्यांनीं गोपिकाबाईनें भेटीस बोलाविलें. त्यांचा संवाद झाला तोच येथें नमूद करणें विहित होईल. §

---

§ याच काशीराजाने पानिपतची बखर फारशी भाषेत लिहिलेली सुप्रसिद्ध आहे. यापूर्वी काशीराजाचें पेशव्यास पत्र आले होते त्यातील मजकूर—

कालचक्रानुसार विपरीतार्थ निदर्शनास आला तो कळलाच असेल. शुजाउद्दौल्याचा व आपला स्नेह अविच्छिन्न व अकृत्रिम आहे तोच आहे. भगवत्सत्ता होती त्यास उपाय काय ? आम्ही आपले सेवक नबाबांस बोध करून महदायासें भाऊसाहेब व रावसाहेबांची शवें रणागणींहून आणून ब्राह्मण मंडळीचे सहित चंदनादि उपचारें संस्कार केला. स्वामी सर्वज्ञ आहेत.' ता. २४ फेब्रुवारी, स. १७६१.

**गोपिकाबाई**—पानिपत झाल्यापासून चहूंकडे जो आकांत व हाहाकार उडाला तो आपण सर्व जाणतो. पण असा प्रसंग घडण्याचीं काय कारणें झालीं, आज पन्नास वर्षें एवढया उमेदीनें कामे चाललीं असतां असा परिणाम कां व्हावा तें तरी खरें खरें कळून यावें म्हणून, पंत, त्यांतल्या मतलबाच्या गोष्टी तुमचे तोंडून ऐकाव्या अशी इच्छा आहे.

**काशीराज**—एकदम एवढें आभाळ कोसळलें. महाराष्ट्रांत तर घर म्हणून सुनें राहिलें नाही कीं ज्याचा कोणी तरी आप्त यांत गमावला नाही. पण आपले राष्ट्र शूर वीरांचे आहे. आज पावेतों विजयाचे शेंकडों प्रसंग अनुभविले, त्यात कालचक्रानुसार असाही एक उलटा प्रकार बनून आला इतकेच. भाऊसाहेब, विश्वासराव, समशेरबहाद्दर, जनकोजी सिंदे, इब्राहीमखान गारदी अशा कितीकांनीं धारतीर्थी देह ठेवून सद्गति मिळविली म्हणून सांगावे! पण यामुळे, बाईसाहेब, हताश होण्याचें कांहींएक कारण नाही. एखादा प्रचंड भूकंप किंवा जलप्रलय व्हावा तशांतलाच हा एक प्रकार घडून आला, पण त्यामुळें मराठ्यांच्या सत्तेस किंवा चाललेल्या उद्योगास कायमचा धक्का बसला अशी आपली समजूत असेल तर ती सर्वथा खोटी होय.

**गो०**—कां बरें, आतां दिल्लींतील मराठ्यांची सत्ता उठून तेथें पठाणांचें राज्य नाही का झाले?

**का०**—बिलकुल नाही. मराठ्यांच्या पराभवापासून अब्दालीचा काडीइतका फायदा झाला नाहीं. कर्जापायी बुडून व असंख्य फौज व सामान गमावून त्यालाही केवळ जीव बचावून स्वदेशीं जाणें भाग पडलें. त्याला अत्यंत पस्तावा झाला. पेशव्यांशीं स्नेह करून वैर कायमचें मिटवावें म्हणून त्यानें आपले वकील मुद्दाम पाठविले आहेत.

**गो०**—पण तो नजीबखान आहे ना त्यास फिरून भर देणारा!

**का०**—बाईसाहेब, नजीबखानाचें माहात्म्य संपलें. अब्दालीची व त्याची अशी कांही बाचाबाची झाली की शहाचे हातून आपण जिवंत सुटलों हेच भाग्य असे त्यास झालें. कृतकर्मांचीं फळें भरपूर पावला. अब्दालीला मराठ्याचे पाणी या दीड वर्षांत चांगलें कळून आलें. हिंदुस्थानच्या भानगडींत पुनः पडायचें नाहीं असा त्याचा निश्चय झाला आहे. म्हणूनच तर सांगतों कीं नुसत्या प्राणहानीच्या पलीकडे या प्रचंड युद्धाचे परिणाम मराठ्यांना अनिष्ट असे कांहीं झाले नाहीत, हें आजच सर्वांस स्पष्ट दिसत आहे.

**गो०**—पण भाऊसाहेबांच्याच चुकीमुळे हें अरिष्ट आपल्या राष्ट्रावर ओढवलें असें नाहीं का जन म्हणणार ?

**का०**—बाईसाहेब, पुष्कळ व्यवहार असे बनून येतात कीं त्यांत कोणाची चूक किती व शहाणपण किती हें ठरविणें अशक्यप्राय होतें. भाऊसाहेबांसारखा मोहरा क्वचितच निर्माण होतो. त्यांच्यासारखें युद्ध-कौशल्य, सर्व प्रकारची पूर्वतयारी, सर्वांचें ऐकून स्वतःचा निश्चय करण्याचें चातुर्य फारच थोड्यांना असतें. आकाश कोसळलें तरी धमक व शौर्य अखेरपर्यंत कायम होतें. तीन लाख जीवांची निगा व तर्तूद अहर्निश मनांत बाळगून ज्या पुरुषानें पांच महिन्यांत गोदावरीपासून दिल्लीपर्यंतचा समस्त प्रदेश सुतासारखा नरम आणिला, त्याचें कर्तृत्व अलौकिक नव्हे काय ? लगेच कुंजपुऱ्यावर जाऊन त्यांनी अब्दालीचें सर्व सामर्थ्य भग्न केलें, त्यांच्या पराक्रमास जोडच मिळणार नाहीं. तीस वर्षांचा आपल्यांतला एक तरुण पुरुष केवढीं अचाट कामे करतो हें लक्षात आणलें असतां भाऊसाहेब म्हणजे आपल्या मराठी राष्ट्राचा चिरंतन अलंकार बनले आणि निर्भयपणें रणकुंडांत उडी घेऊन सूर्यमंडल भेदून गेले, हा प्रकार भारतादि पुराणग्रंथांतच आपण वाचावा. या कलियुगांत तो एकट्या भाऊसाहेबांनींच सिद्ध करून दाखविला. आपले चिरंजीव रावसाहेबही

त्याच तोडीचे. काय ते उभयतांचें प्रेम, केवढ्या उमेदी, एकेक प्रसंग आठवले म्हणजे वाटते, त्यांच्यासारखी सद्गति आम्हां मानवांस महद्भाग्याशिवाय मिळत नसते, आणि एवढे दोनच वीर या प्रकरणांत पुढें आले असें नाही, तर जनकोजी शिंदे, यशवंतराव पवार, इब्राहीमखान गारदी असे त्यांच्याच तोडीचे शेकडो वीर अखेरपर्यंत झगडून राष्ट्राकरितां प्राणार्पण करते झाले. अशीं उदाहरणें इतिहासांत तरी कितीशीं मिळतील! पराजयाचा डाग लागला म्हणून त्यांचे कर्तृत्व कांहीं लोपत नाही.

**गो०**—पण यांच्याच बरोबर कुचराई करणारेही कित्येक प्राणी नाहीं का दिसून आले?

**का०**—मला नाहीं वाटत बुद्धिपुरःसर कोणीं कुचराई केली असेलशी. युद्धासारख्या प्रचंड व दीर्घकालीन प्रकरणांत अनेक मतभेद व विरोधी योजना सुचविल्या जातात त्यांस कुचराई म्हणणें अन्यायाचें होईल. याच कामांत पहाना! अब्दालीशीं ठासून समोर सामना न करितां, धावपळीचे गनिमी युद्ध खेळावें असें प्रतिपादणारा एक अनुभविकांचा बराच मोठा वर्ग होता. पण ही सूचना व्यवहार्य नव्हती. गनिमी काव्यानें अब्दाली जेरीस येत नाही असें सिद्ध झाल्यामुळेंच तर भाऊसाहेबांनी इब्राहीमखानासारखा चतुर गोलंदाज व तीनशे तोफांचा कल्पक योद्धा मुद्दाम बरोबर घेतला. अब्दालीजवळही अशाच तोडीचा तोफखाना जय्यत असल्यामुळें त्यास गनिमी युद्धानें जिंकणें शक्य नव्हते.

**गो०**—मग या इब्राहीमखानाच्या तोफांचा प्रभाव शेवटीं कोठें लपून बसला? खानांनीं निमकहरामी तर नाहीं केली?

**का०**—तोही प्रकार, बाईसाहेब, नीट समजून घेण्यासारखा आहे. खानासारखा स्वामिनिष्ठ शिपाई सहसा आढळायचा नाहीं. निघतांनाच त्यास भाऊसाहेबांनीं वचन दिलें होतें कीं आपण तोफांच्या आराड्याचे युद्ध करूं; गनिमी धावपळ करणार नाहीं. कारण अवजड तोफा माणसांबरोबर घोड्यांच्या वेगानें वाहून नेणें अशक्य असतें. अब्दालीला

मोठी धास्ती होती ती या इब्राहीमखानाच्या तोफांची. आपणांस यांतलें एक इंगित ठाऊक नसेल. पानिपतावर जेव्हां दोन महिने दोनही लष्करें समोरासमोर तळ देऊन सज्ज राहिलीं, तेव्हां अब्दालीनें इब्राहीमखानास कळविले, "अरे तूं मुसलमान होऊन या काफरांची नोकरी कां करितोस! तूं त्यांस सोडून माझ्याकडे ये म्हणजे आपण दोघे तुझ्या तोफांच्या सामर्थ्यानें नुसतें हिंदुस्थानच काय, पण सगळें आशियाखंड जिंकून चंगीझखानासारखा पराक्रम करून दाखवू." पण खानानें ही विनंती झिडकारून उत्तरी कळविलें, "मी भाऊसाहेबांना शपथ दिली आहे, ती मोडून भलताच विश्वासघात कालत्रयीं करणार नाही. यांत धर्माचा संबंध काय आहे? भाऊसाहेब कांहीं धर्मासाठीं लढत नाहींत."

**गो०**—मग या खानांनीं तोफांचा प्रभाव तो काय दाखविला?

**का०**—खानांचा प्रभाव आपल्या कानांवर आला नाहींसें दिसतें. त्यांच्या तोफांनींच तर इतकी निभावणूक केली आणि तीन प्रहरपर्यंत अब्दालीची फौज इतकी मारली कीं त्यालाही आपण निभावतों कसे अशी चिंता उत्पन्न झाली. खरा प्रकार कांहीं वेगळाच बनला. तिसरे प्रहरीं विश्वासरावांस हत्तीवर गोळी लागून ते गतप्राण झाले, तो देखावा पाहून भाऊसाहेबांचे देहभान सुटलें. ठरलेली योजना विसरून ते एकदम रणांत घुसले आणि अदृश्य झाले. त्याबरोबर एकंदर लष्कराचा धीर सुटून पळ सुरू झाला. मग काय विचारावें! कापाकापीच चालू झाली. इब्राहीमखान, जनकोजी आवेशानें लढत असतां जखमा लागून पकडले गेले. शत्रूंनीं त्यांजवर पुरा सूड उगवला. भाऊसाहेब शांत मन ठेवून तसेच जाग्यावर कायम राहते तर त्या प्रसंगीं अब्दालीचाच फन्ना उडाला असता. भवितव्यता म्हणतात ती ही. खरें सांगायचें म्हणजे युद्धनैपुण्यांत अब्दालीचा नंबर वरच लागेल. आशिया खंडभर फौजा नाचवून त्याला दांडगा अनुभव प्राप्त झाला होता.

**गो०**—पण पानिपतच्या तळावर अडीच महिने पावेतों शेवटच्या क्षणाची वाट पहात भाऊसाहेब असे कोंडून कां बसले ?

**का०**—खासा प्रश्न विचारलात. भाऊसाहेब त्वरा करून दक्षिणेंतून आले, त्यांचा उद्देश पर्जन्यापूर्वी यमुना पार जाऊन अब्दालीला गांठून तोफांनीं सडकावे. आग्र्यापावेतो येतात तों यंदा पाऊस लवकर पडून नदी भरून चालली. अवजड तोफा पलीकडे नेतां येईनात. चार महिने सोन्यासारखे फुकट गेले. पुढें उतार शोधीत भाऊसाहेब कुरुक्षेत्रा-पावेतो उत्तरेकडे गेले. कुंजपुरा हस्तगत करून अब्दालीच्या सामानाचा व द्रव्याचा प्रचंड संचय काबीज केला, आणि दत्ताजी सिंद्याचें शीर कापणाऱ्या कुत्ब्‌शहाला यमसदनास पाठवून विजयादशमीचा समारंभ अपूर्व उल्हासानें साजरा केला. इतक्यांत अब्दालीच आपली सर्व फौज घेऊन बागपताजवळ यमुना उतरून अलीकडे मराठ्यांचे अंगावर आला. भाऊसाहेब परत फिरले. एकदम अब्दालीवर घुसणे त्यांस शक्य होतें. पण दक्षिणेंतून नानासाहेबांनीं कळविले, "आम्ही आणखी फौज घेऊन निघालों, तुम्ही उतावळ करूं नका. उत्तरेकडून तुम्ही व दक्षिणेकडून आम्ही असे अब्दालीस चिमट्यांत पकडून धुळीस मिळवूं." पण नानासाहेब वेळेवर आले नाहींत. पानिपतावर आमच्या फौजेची उपासमार होऊं लागली. आरंभीं 'आमची फौज बहुत शेर होती. अब्दालीने स्वदेशास जावें तर मार्ग नाहीं, युद्ध करावें तर परिणाम नाहीं, उगेच बसावें तर भक्षायास नाहीं,' असा जो प्रकार होता तोच उलट बनला. शेवटीं इलाज नाहींसें पाहून मराठ्यांनीं पौष शु. ८ बुधवारीं अब्दालीवर समोर चालून घेतलें, आणि सर्वांनीं एकदिलानें क्षात्रधर्माची शिकस्त करून इहपरलोकीं अखंड कीर्ति मिळविली. दुसरें भारतीय युद्धच बनून आलें.

**गो०**—तर मग पंत, तुमच्या मतें या पराजयानें आपल्या राष्ट्राचा उत्साहभंग होण्याचें कांहीं एक कारण नाहीं ?

**का०**—बिलकुल नाहीं. उलट मोठी उडी मारण्याकरितां एखाद्या माणसाला जसें मुद्दाम चार पावलें मागें येऊन पुनः पुढें जाण्यास जोर येतो, तसाच हा पानिपतचा प्रसंग उत्साहवर्धक होणार ही खात्री ठेवा.

**गो०**—आपल्या या भेटीनें माझ्या जिवास मोठा धीर आला. या तर आतां, नमस्कार.

इतकें होऊन पंत निघून गेले. प्रत्यक्ष परिणाम जरी तसे नुकसानकारक झाले नाहीत, तरी उदयोन्मुख इंग्रज मराठे–मुसलमानांची ही झोंबी आतुरतेनें पाहत होते. त्यांचे हे दोन प्रतिस्पर्धी आपसात लढून हीनबल झाले हा एक पानिपतचा अप्रत्यक्ष परिणाम विचारवंतांना त्या वेळी नाही तरी पुढें दिसून आला.

युद्धांत हजर असलेला पानिपतचा बखरकार रघुनाथ यादव लिहितो,—

पुरुषांत देखणा विश्वासरावसाहेब व बायकांत देखणी मस्तानी, समशेरबहाद्दरांची मातुश्री, हीं दोन माणसें दक्षिणेंत रूपवंत जाहली. श्रीमंत नानासाहेब अंशधारी पुरुष, त्यांत शाहूमहाराजांचा वरदहस्त मस्तकीं तेणें करून जय संपादित आले.

## १७

# मोडल्या झुंजाची तारीफ



**विश्वासराव पेशवा लिहितो, " मल्हारराव होळकरांकडील मजकूर लिहिला, तो साद्यंत कळला. ऐशीयास या गोष्टी त्यांजपासून कदापि घडणार नाहींत. त्यांनीं बहुत देखिलें आहे व ऐकिलें आहे. विचारी पुरुष आहेत अविचारी नाहींत. रुसोन आले, याजमुळें शिपाई आहेत, एखादे समयीं बोलून दाखवितील, इतकेंच."** —पे. द. २६.२३०

पानिपतच्या संहारानें उत्तर हिंदुस्थान खरे म्हटलें तर मराठ्याच्या हातून गेल्यासारखेंच झालें. पण एक वर्षपावेतों मल्हारराव होळकराने पराकाष्ठेची मेहनत करून मराठी राज्याचें संरक्षण केलें ही त्याची कामगिरी इतिहासांत कायमची वाखाणली गेली आहे. संग्रामानंतर काय प्रकार घडला तें आतां सांगावयाचे आहे.

पानिपतचा शेवटचा संग्राम पौष शु० ८ तारीख १४ जानेवारी, स.१७६१ रोजीं झाला. आपल्या फौजांची कुचंबणा झाली आहे ही बातमी कळल्यावरून स्वत: पेशवे नानासाहेब डिसेंबर अखेरीस अहमदनगराहून आणखी फौज व साहित्य घेऊन निघाले ते ग्वालेरपावेतो पोचतात तों त्यांस २२ जानेवारी रोजी बातमी कळली कीं मराठ्यांचा संहार उडाला, " दोन मोती गलत, दसबीस अश्राफत, रुपयों को तो गणति नाहीं," अशा सांकेतिक भाषेंत वर्तमान उडत आलें. त्यानंतरच्या चार दोन दिवसांत खरा प्रकार समजून चुकला. शेंकडों हजारों लोक जीव बचावून

उघडे बोडके, घायाळ, अत्यंत दीनावस्थेंत पेशव्याजवळ येऊन दाखल झाले. मल्हारराव होळकर, नारो शंकर, विठ्ठल शिवदेव, नाना फडणीस, नाना पुरंदरे, भाऊसाहेबांची बायको पार्वतीबाई अशी प्रत्यक्ष घरांतलीच मंडळी जेव्हां भेटली तेव्हां बराचसा उलगडा झाला. तरी खुद्द भाऊसाहेब व जनकोजी सिंदे वगैरे मेलेले कोणीच पाहिले नसल्यामुळे तेही जिवंत पळून आले, घायाळ झाल्यामुळे कोठें तरी असतील, अशा समजुतीनें त्यांचा शोध करण्यांत दोन महिने गेले. एवढ्या अवधींत पेशव्यांच्या छावणींत केवढी रडारोय व आक्रांत उडाला असेल याची आपण कल्पनाच केली पाहिजे. दुःखाचा एवढा धक्का पेशव्यास पोंचला कीं त्याचा कारभारांतील नेहमींचा तोल साफ सुटला. आपला पुत्र, बंधु व मोठमोठे सरदार समरांगणीं पडले त्याबद्दल होळकर, नारो शंकर वगैरे मंडळींवर पेशव्यांचा अतिशय कोप झाला. दोन महिने नरवरास मुक्काम करून ते परत निघाले. स. १७६१ च्या संवत्सर प्रतिपदेस म्हणजे ६ एप्रिल रोजीं त्यांचा मुक्काम इंदुरास झाला. इंदुरास त्यांनी होळकरांची भेट घेऊन एकंदर विचारपूस केली आणि पुढें प्रयाण केलें. जूनच्या आरंभीं पुण्यास दाखल झाल्यावर दोन आठवड्यांनीं तारीख २३ जून रोजीं पेशव्यांचें देहावसान झालें. मल्हारराव ( वय ६८ ), गौतमाबाई त्यांचें कुटुंब ( वय ६३ ) व सून अहल्याबाई ( वय ३६ ) यांचीं पानिपतच्या प्रकरणासंबंधीं कैक दिवस भरपूर बोलणीं झालीं, त्यांचा इत्यर्थ पुढे दर्शविला आहे. गोकुळ अष्टमीच्या दिवशीं इंदूरच्या वाड्यांत गौतमाबाई तापाने आजारी असलेल्या, पलंगावर पडल्या असून जवळ अहल्याबाई अंग रगडीत बसल्या आहेत. इतक्यांत मल्हारराव आंत येऊन बसले आणि विचारूं लागले—

**म०**—बाळ अहल्या, कशी आहे आतां तुमच्या सासूबाईंची प्रकृति? ताप उतरतो आहे का? वैद्य येऊन गेले, त्यांनीं काय सांगितलें?

**अ०**—काय सांगावें महाराज, प्रकृतीला उतार म्हणून कसा तो बिलकुल नाहीं. वैद्य तरी काय करणार! औषध देखील घेत नाहींत, मग

अन्नाचें तर नांव नको. सारखा पाण्याचा शोष. मला तर यांच्या प्रकृतीची मोठी धास्ती वाटते.

**म०**—आणखी काय काय दुःखें पहायचीं आमच्या नशिबीं आहेत कोणी सांगावें ! बाहेर तर सगळा भडकाच उडाला आहे. उगाच घरांत तरी तुम्ही दोघी शाबूद असलां म्हणजे तेवढीच आमच्या मनास निश्चिंति. नेहमी यांची प्रकृति निकोप असतां एकाएकीं कां बरें इतकी बिघडावी !

**अ०**—नाहीं म्हणायला कारण असें मला एकच दिसतें. पानपतचा प्रकार ऐकल्यापासून त्यांनी भलताच वैताग सुरू केला होता. अहोरात्र एक घोष, आता या मराठी राज्याची वाट काय होणार ! त्यांतून परवां पेशव्यांची स्वारी येथें आली. खुद्द यजमानच ते. बरोबर दोन मुलें, गोपिकाबाई, पार्वतीबाई, सर्व दुःखांत पोळून आलेल्या. सासूबाईच्या अंगांत थोडी कसर होतीच, पण अशा वेळी यजमानांच्या समाचारास गेल्याशिवाय कसें चालणार ! आम्ही दोघी गेलों. तेथें चार घटका आम्हां बायकांचा जो काय आकांत झाला, तो सांगायला देखील कठिण वाटतें काय तो प्रसंग ! एकंदर आभाळच फाटलें, तेथें आम्ही तरी बोलणार काय ! नुसत्या रडारोईपलीकडे कोणाच्या तोंडांतून शब्दच निघेना. गोपिकाबाईचा सारखा ध्यास, 'माझा विश्वास कुठें गेला !' कोणाच्या तोंडांतून शब्दच निघेना. तरी बाईंनीं चार गोष्टी बोलून त्यांस धीर दिला आणि पायां पडून आम्ही परत आलों.

**म०**—आणि पेशवे नानासाहेब होते का तिथें ?

**अ०**—पेशव्यांची स्वारी पलीकडच्या दालनांत भुईवर गादी टाकून पडली होती. आम्ही दोघी जाऊन पायां पडलों. नुसतें डोळ्यांनीं त्यांनी पाहिले मात्र आणि आपले दोन अश्रु पुसले. केवढा भव्य पुरुष, पण आतां नुसता अस्थिपंजर राहिला. फार दिवस काढतीलसें चिन्ह दिसलें नाहीं.

**म०**—तीच तर मोठी धास्ती आमच्या मनास खात आहे. त्यांतून खुद्द आम्ही जे कोणी पांच चार प्रमुख पानिपतावरून परत आलों, त्यांजवर तर त्यांनीं अत्यंत कठोर वृत्ति धारण केली आहे.

**गौ०**—पण हिंदुस्थानचें राज्य राखण्याचा पुढला विचार आपल्याशीं नाही का कांहीं ते बोलले ?

**म०**—छे, तो विषय आम्ही पुष्कळ बोललो, पण त्यांचा उद्गार काय तो एकच; 'हे वांचून आम्हांस आपलें काळे तोंड दाखवायला कशास आले! आमचा मुलगा, भाऊ गेला, त्यांबरोबर हेही कां नाही मरून गेले!'

**गौ०**—यजमानांचे हे शब्द आपण नुसते मुकाट्यानी ऐकून घेतले? जबाब द्यावा होता की नाहीं झणझणीत; यजमान झाले म्हणून काय झालें, त्यांनीं देखील सेवक लोकांची कदर सांभाळली पाहिजे.

**म०**—बाई, वेळ प्रसंग कांहीं पाहावा लागतो. त्यांचेही अंत.करण पोळलेलें. त्यांतूनही योग्य तें उत्तर करण्यास आम्ही कांही कमी केलें नाहीं. नारो शंकर, विठ्ठल शिवदेव, आम्ही व यजमान प्रहर दोन प्रहर एकत्रच होतों. झालें तें होऊन गेलें, पण पुढला विचार काय याची आम्हांस मोठी विवंचना होती, ती आम्ही स्पष्ट बोलून दाखविली. परंतु पेशव्यांचें मनच ठिकाणीं नव्हतें त्यास आम्ही काय करणार !

**गौ०**—पण थोरांची खरी परीक्षा अशाच प्रसंगांत होत असते. मोठेपण कांही फुकाचें मिळत नसतें. सांगा काय झालें आपले बोलणें. या पोरीला ऐकूं द्या सर्व, तिच्यावरच आतां पुढचा भार आहे.

**म०**—हो, तेंही खरेंच. मालरावांत मला विशेष पाणी दिसत नाहीं, पण माझी ही अहल्याच मराठी राज्याचा इकडचा संसार सांभाळील अशी माझी बालंबाल खात्री आहे, आणि तिने या गोष्टी प्रत्यक्ष ऐकून ठेवलेल्या बऱ्या.

**अ०**—मलाही पुष्कळ पुष्कळ विचारावेंसें वाटतें. लोक नाहीं नाहीं तें बोलतात. कानांनीं ऐकवत नाहीं. सुभेदारांनीं मोठा राष्ट्रद्रोह केला,

भाऊसाहेबांचें साह्य मनापासून केलें नाहीं म्हणून हे अरिष्ट कोसळलें, हा जनापवाद ऐकला म्हणजे अंत:करणाला कसे घरे पडतात ते काय सांगावे ! आज चाळीस वर्षे ज्यांनीं हाडांचीं काडे करून एवढी ही हिंदुपदपातशाहीची इमारत उठविली, तेच आपण होऊन यजमानांशीं निमकहरामपणा करतील ही कल्पना तरी मनांत कां यावी ! मनास मोठी हुरहूर लागली होती. हा प्रकार खुद्द आपल्याकडून ऐकण्याची आज बरी संधि आली.

**म०**—आता आले ओघास म्हणून सगळें स्पष्टच बोलतों. निदान तुम्ही या पूर्वकथा ऐकलेल्या असाव्या.

**गौ०**—यजमानांच्या डोळ्यांत चरचरित अंजन आपण घातलें कीं नाहीं ? अपमान सहन करण्याचा इकडचा स्वभावच नाहीं. आपल्या मुखांतले चार बाणेदार शब्द कानावर पडणें हेंच मला या क्षणीं औषध होय.

**म०**—पेशव्यांच्या व आमच्या या मुलाखतींत एक वर्षाच्या सर्व उखाळ्या पाखाळ्या बाहेर निघाल्या. मी स्पष्टच बोललों, आम्हीं मराठ्यांनीं गनिमी काव्यानें लढावें. याच मुख्य साधनानें आम्हीं एवढें राज्य कमावूं शकलों. शत्रूसमोर ठासून मैदानी युद्ध खेळणें आम्हांस कधीं साधलें नाही. इब्राहीमखानाचा तोफखाना उत्कृष्ट काम करतो हें आम्हीही जाणतों, पण नुसत्या तोफांनी काम भागत नाहीं. प्रसंग आला तर तोफा आमच्या बरोबर ताबडतोब धावूं शकत नाहींत. त्यासाठीं सर्व लोकांच्या अंगीं ती कवाईत बाणलेली पाहिजे. तशी आपली तयारी नसल्यामुळे आम्ही भाऊसाहेबांना परोपरी सांगितले, आपण सर्व जण आपली धावपळीची लढाई करून अब्दालीस जेरीस आणूं, पण एकाच जागीं सर्वांस गाडून घेऊं नये. अद्यापि मला वाटतें ही सल्ला त्यांनी मानली असती तर आजचा हा दुर्धर प्रसंग ओढवला नसता.

**अ०**—पण यांत आपण राष्ट्रद्रोह किंवा कुचराई ती काय केली !

**म०**—सांगतों ऐका. भाऊसाहेबांनीं आपला निश्चय करून ज्या आज्ञा केल्या त्या सर्व आम्हीं बिनतक्रार पाळल्या, ही गोष्ट जे कोणी हयात आहेत ते देखील कबूल करतात. यजमानांचा मुख्य आराप म्हणजे आम्ही जिवंत परत कशाला आलो !

**अ०**—मग काय सर्वांनी मुद्दाम एकत्र मरून जाण्यांत तरी फायदा कोणता !

**म०**—तेंच तर मी म्हणतों. मला वाटतें खुद्द भाऊसाहेबांनी सुद्धां विश्वासरावांची गति पाहून देहभान सोडून अविचारानें रणकुंडां। उडी घेतली ते अत्यंत गैर होय. अशा आणीबाणींत शांत चित्त ठेवून पुढचा मार्ग पाहणें हें तर खऱ्या सेनानायकाचें मुख्य लक्षण. आम्ही कांहीं मंडळी निभावून आलो ते देखील मऊ बिछान्यावर पडून घरी मरण्याकरितां नव्हे, तर राज्याचा निभाव पुढें यथाशक्ति करावा म्हणूनच. मरण कोणास चुकले नाही, पण जीव जगवून कर्तव्य करीत राहणे यांतच पुरुषार्थ आहे. पण आम्हांस मागे पाय काढून निघून येण्याचें आणखी एक कारण आहे, त्याची साक्ष पार्वतीबाई, नाना फडणीस वगैरे देतील.

**गौ०**—दुसरें आणखी काय कारण असणार ?

**म०**—पानिपतच्या तळावर जेव्हां उपासमार व कुचंबणा होऊं लागली व उद्यां शत्रूवर चालून जाण्याचा निश्चय भाऊसाहेबानीं ठरविला, तेव्हां मध्यरात्रीं मला मुद्दाम बोलावून गहिवराने काकुळतीस येऊन म्हणाले, "काकासाहेब, आतां वेळ प्रळयाची येऊन ठेपली आहे. झाल्या गेल्या गोष्टी सर्व विसरून जा. अधिकउणा शब्द तुमच्याशीं उच्चारला असेल त्याची क्षमा करा आणि निर्वाणीची एक कामगरी सांगतों ती कबूल केल्याचें वचन द्या, म्हणजे मी निश्चिंत झालो.

**गौ०**—अशी कोणती विनंती त्यांनीं केली ? जीव कसा अधीर झाला आहे ऐकायला !

**म०**—आम्ही म्हणालों, ‘ अन्नदात्याचा देह पडेल तिथेंच हाही देह पडणार. निभावलों तर सगळे निभावूं. नाहीं तर अपयश पदरीं घेऊन मी जिवंत म्हणून परत जाणार नाही. ’ त्यावर भाऊसाहेब म्हणाले, ‘सुभेदार, असें भलतेंच बोलूं नका. हा प्रश्न नुसता तुमच्या आमच्या जिवाचा नाहीं. या दोन अडीच लाख माणसांचे प्राण आज आमच्यावर अवलंबून आहेत. ते लोकांचे प्राण नाहक शत्रूच्या हातीं लागूं नयेत, मुख्यतः आपल्याबरोबर बायका आहेत, मोठमोठे कामगार व बिन लढवय्ये बुणगे आहेत त्यांना वांचाविणें जरूर आहे, म्हणून तुम्हांस या गळ्याची शपथ घालून सांगतों, नव्हे निक्षून आज्ञा करतों कीं जर का विपरीत चिन्ह दिसूं लागलें, तर तुम्ही मागें पाय काढून सावधपणानें बायकापुरुषांचा निभाव करून त्यांस देशी नेऊन पोंचवा. नानासाहेब निघालेच आहेत, त्यांच्या स्वाधीन ही सर्व मंडळी करून द्या, म्हणजे तुमच्या आजन्म सेवेचें चीज झालें. ’ भाऊसाहेबांचे हे शब्द ऐकून माझा कंठ दाटून आला. आम्ही काय उत्तर करणार ! ‘ ईश्वर बुद्धि देईल तसें करूं, आपण निश्चित रहा. ’ एवढें सांगून रजा घेतली आणि ही शेवटची वचन दिलेली कामगिरी पुरी करण्याकरितां दुसरे दिवशीं पळापळ होऊन भाऊसाहेबांनीं युद्धांत पुढें उडी घतलेली पाहतांच आम्ही परत निघालों. त्याबद्दल आज आमचे धनी आम्हांवर असा कोप करितात. सेवेचें चीज करणें बाजूला राहिलें, उलट आतांच यजमानांचा लेखी हुकूम हातीं पडला, तो तुम्हांस समक्ष कळविण्यासाठीं म्हणून तर मी मुद्दाम लगबगीनें तुमचे भेटीस आलों.

**गौ०**—काय आला आहे आणखी नवीन हुकूम ?

**म०**—आमची सर्व जागीर व धनदौलत पेशव्यांनीं जप्त करण्याची लेखी आज्ञा पाठविली असून जप्तीसाठीं त्यांचीं माणसें बाहेर उभीं आहेत. आतां या भोगास काय करावें ! तुम्हीच दोघी काय ती तोड सांगा.

**गौ०**—तोड काय दुसरी सांगायची. सांगा त्यांना तुमच्याच सेवेत करतां आली ती कमाई केली, ती सर्व तुमची आहे, खुशाल ताब्यांत घ्या. आम्ही तरी ही दौलत कांहीं शेवटीं बरोबर घेऊन जाणार नाही. परमेश्वराच्याच मनांत हे राज्य राखायचे नसले तर त्यास तुम्ही तरी काय करणार ! पण परवां समक्ष भेटींतच पेशव्यांनीं ही गोष्ट कां नाही केली ! आतां पाठीमागून कां हा निराळा विचार सुचला ?

**म०**—येथे भेटी झाल्या तेव्हां यजमानानी सगळे प्रकार स्पष्टपणे ऐकून आमची उलट वाखाणणीच केली. जवळ दुसरीं पुष्कळ जाणतीं माणसें विठ्ठल शिवदेव, नाना फडणीस वगैरे होते, सर्वांनी आमच्या म्हणण्याची साक्ष पटविली. विठ्ठल शिवदेव तर असेच ठामून बोलले, ‘ साहेब धणी आहेत, सेवकांस वाटेल ती शिक्षा करावी. मृत्यूपुढें इलाज नाहीं. असे लौकिकांत सांगतात, पण आम्ही म्हणतो आयुष्यापुढें इलाज नाहीं. हीही गोष्ट तितकीच खरी आहे. त्या दिवसाच्या चार दोन घटकांच्या अवधीत एकदम आकाश कोसळून जो प्रळय व हाहाकार उडाला, त्यांत आपण कोठे आहो, करतों काय याचें भान राहण्यासही अवकाश मिळाला नाहीं. ज्याला जी वाट दिसली ती त्यानें घेतली. अद्यापि तो प्रसंग डोळ्यांपुढे खेळतो आहे. बाकी विश्वासराव, भाऊसाहेब गेले त्यांचे ऐवजी हे सुभेदार व आम्ही गेलो असतों व ते वांचले असते तर आमच्या देहांचें इतक्या दिवसांच्या सेवेचें सार्थकच झालें असतें. पण एवढे भाग्य आमच्या नशिबांत नव्हते, म्हणून काळाने आपल्या पुत्रबंधूंना ओढून नेलें आणि ही लाजिरवाणीं तोंडें यजमानांस दाखविण्याची आम्हांवर पाळी आली. आतां धन्यांनी गतगोष्टी विसरून पुढील विचार पाहवा एवढेंच सांगणें आहे. ’

**अ०**—अशी सर्वांचीं निखालस बोलणी होऊन मनांतील खळबळ धुऊन निघाली असतां आतां मागाहून ही दुर्बुद्धि यजमानांस कशी सुचली ?

**म०**—आम्हांसही तें एक गूढच वाटतें. आंतून तपास करितां आमचा तर्क निराळाच धावतो. ही सर्व कारवाई पेशव्यांचे बंधु रघुनाथरावदादांची दिसते. ते क्षुद्र दृष्टीचे व द्रव्यलोभी किती आहेत त्याचा अनुभव आम्हांस यापूर्वी पुष्कळ आला आहे. एवढेंच काय, नानासाहेबांचें जें चिन्ह आम्हांस दिसलें त्यावरून ते आतां फार दिवस काढतील असें दिसत नव्हते, आणि आतां तर पानिपतच्या प्रळयाला त्यांच्या देहावसानाची जोड मिळाली म्हणजे हें मराठी राज्य आतां कसें टिकणार! काय भवितव्यता असेल ती खरी. तुम्ही यावर काय सुचवितां!

**गौ०**—आपलें हे सर्व भाषण ऐकून आम्हांस एकच विचार सुचतो. माझ्या या देहाचा आता भरंवसा नाही. मला शेवटचें बोलावणें आलें असून प्रयाणाची वेळ जवळ येत चालली आहे. आजपावेतो पतींची सेवा करण्याची पुण्याई मिळविली, तिचें फल म्हणून असेच सवाष्णपणीं भरल्या घरांत हे डोळे कायमचे मिटावे. मागे ही अहल्या आहे, या आपल्या राज्याचे व राष्ट्राचे नांव भरपूर राखील, आणि दिगंत कीर्ति करून महद्भाग्य संपादील असा हिला माझा पूर्ण आशीर्वाद आहे. मी जर खरी पतिव्रता असेन तर माझा हा आशीर्वाद खोटा पडणार नाहीं; आणि पति या नात्यानें आपणांसही माझी एक शेवटची विनंती आहे. यजमानांनी दौलतीची जसी केली त्याचा खेद करूं नका. त्यांनीं दिलें, त्यांनीं घेतलें. पण प्रसंग सर्व मराठी राज्यावर आहे, एकट्या होळकरांवर नाहीं. शिवाजीमहाराजांनीं अनुपम साहसानें कमावलेले व पेशव्यांनीं वाढीस लाविलेले हे राज्य मरूं देऊं नका. आपला पराक्रम कांहीं कोणी काढून घेऊं शकत नाही. पूर्वींहून द्विगुणित कष्ट करून मोडलेल्या भुजाची बाजू परत उलटवून दाखविणें आपलेंच कर्तव्य आहे. मराठे जिवंत आहेत, मेले नाहींत, हा प्रत्यय पुनः हिंदुस्थानास आणून द्या. यजमान झाला म्हणून आपल्या पुढें काय करणार! पानिपतावर पूर्वीची एक पिढी खलास झाली असली, तरी तिची जागा नवीन तरुण मंडळी

तेव्हांच भरून काढील. पानिपतच्या स्मृतीनें त्यांच्या बाहूंस विशेष स्फुरण चढेल. पानिपतचा हा एकच संग्राम मराठ्यांची कीर्ति यावच्चंद्र-दिवाकरौ उज्ज्वल राखील, आणि कोणत्याही देशाचें राज्य करण्याचा पराक्रम मराठ्यांच्या अंगीं आहे, विजयानें केले नसतें एवढें कार्य पानिपतच्या या विपरीत बनावाने केलें, अशी खात्री हा प्रसंग जगास निरंतर पटवीत राहील, अशी माझी मनोदेवता मला निक्षून सांगत आहे. नवीन होतकरू पेशवे कारभारावर आले आहेत. आपली ही अहल्या त्यांस साह्य होईल आणि त्यांच्या कर्तृत्वानें मराठ्यांचा भाग्यरवि पुनः पूर्वतेजानें तळपेल अशी माझी खात्री आहे. हाच श्रीचरणीं माझा प्रणाम !

यानंतर लवकरच गौतमाबाईचें देहावसान झालें. त्यांचा आशीर्वाद खरा ठरला हें पुढील इतिहास सांगतो.

# १८

# सोळा वर्षांचा मुलगा काय करूं शकतो ?



**वृष्टिंविना पङ्कमहो विचित्रं**
**स्थलद्वये तिष्ठति सार्वकालं**
**दानांबुभिर्माधवरायमन्दिरे**
**विप्रस्य बाष्पैः खलु रामशास्त्रिणाम् ॥ ‡**

सोळा वर्षांचा अल्पवयी माधवराव कारभार करूं लागला तेव्हां चहूंकडे भयंकर अव्यवस्था माजली होती. पानपतावरील अरिष्टाच्या बातमीनें देशभर शत्रूंनीं उचल खाल्ली. निजाम तर एकदम पुण्यावरच चालून आला. तिजोरीत पैसा नाही; बाहेर प्रांतांत अधिकारी होते ते मुख्य सरकारचे पाठबळ नसल्यामुळे निष्क्रिय बनले. सखारामबापू, त्रिंबकराव मामा पेठे, पटवर्धन मंडळी वगैरे सर्व आपापल्यापरी लायक होते, पण त्यांना धाकांत ठेवून काम घेणारा धनी नसल्यामुळें प्रथम घरांतच कारभाऱ्यांचे तंटे सुरू झाले; सखारामबापूचा पक्ष एक, त्रिंबकराव मामांचा दुसरा, आणि सल्ला गोपिकाबाईंची. दादासाहेबांचें बोलणें घटकेंत एक तर घटकेंत दुसरें. अशाखाली चार सहा महिने गेले. माधवराव तर बोलून चालून लहानच. त्याचा हुकूम कोण मानतो ?

---

‡ पर्जन्य नसतांही नेहमी दोन ठिकाणी चिखल आढळतो, हें केवढें आश्चर्य ! एक माधवराव पेशव्यांचे मंदिरांत दानोदकामुळें चिखल असतो व दुसरा रामशास्त्री यांचे घरासमोर ब्राह्मणांच्या अश्रूंनीं असतो. परीक्षेच्या कठोरपणामुळें ब्राह्मण रडतात. या पद्यांत माधवराव व रामशास्त्री यांची योग्यता दाखविली आहे.

पण कांहीं झालें तरी अधिकार त्याच्या हातांत होता. अल्पकाल त्यानें सर्व गोष्टी निरखून पाहिल्या, आणि केवळ आपल्या मनाने वागून हातांतील अधिकार स्वतः वापरावयाचा असा त्याने निश्चय ठरविला. शत्रू चालून आले तेव्हां फौज पाहिजे; सरदार मोठमोठ्या जागिरी खात, पण ' फौज तुमची आणा ' म्हटले की अळंटळं ! माधवरावानें सरदारांस हुकूम सोडले, पण कोणीही मनावर घेऊन फौज म्हणून आणीना.

एके दिवशीं पेशव्यांची स्वारी कचेरींत येऊन बसली. चिटणिसांनी कागद पुढे आणले. सरदारांची नांवनिशी वाचली. कोणी किती फौज आणावयाची त्याचाही आंकडा प्रत्येकाच्या नांवापुढे त्यांनीं मुक्रर केला, आणि कित्येक मंडळीना ' तीन दिवसांच्या आंत आपल्या फौजा घेऊन हजर व्हा, नाहीं तर जागीर जप्त करण्यांत येईल, ' असे हुकूम सोडले. तीन दिवसपर्यंत काय होतें याचा अंदाज पाहून चौथ्या दिवशीं कचेरीस गेले. तपास करतात तों एकही सरदार हजर झाला नाही. सरदारांचा पट मागविला आणि एकेकाची तपासणी केली. प्रथम त्यानी ब्राह्मण सरदारांना वठणीस आणण्याचें योजिलें. त्यांतल्या त्यांत स्वतःचे मातुळ गोपिकाबाईंचे बंधु आनंदराव रास्ते रोज पेशव्यांच्या घरांत पंक्तीस भोजनास असत, त्यांनाच हुकूम लिहून पाठविला की, " रास्ते यांस हुकूम गेला असतांही फौज घेऊन हजर झाले नाहींत, सबब त्यांची जागीर खालसा करण्यांत येत आहे. आजपासून त्यांना सरकारांतून कांहीं एक वेतन देण्यांत येऊं नये. त्याच्या जागीं दुसऱ्या सरदाराची नेमणूक करण्यांत आली आहे. "

या हुकुमाचा अंमल ताबडतोब व्हावा असे सांगून स्वारी घरीं आली. अधिकारी पुरुषाचा हुकूम आला कीं तामिली होण्यास उशीर काय ? रात्री पंक्तीस मामा आले नाहीत. हुकूम ऐकून ते खवळून गेले ! लगेच त्यांनीं आरडाओरडा सुरू केला. मुख्य शस्त्र म्हणजे बहीण. तिच्याकडे जाऊन ते अद्वातद्वा बोलले. " हा कालचा पोर ! हा आतां कारभार

करणार! असले हुकूम करूं लागला म्हणजे राज्य छान चालेल! मोठा शहाणाच झाला कीं नाहीं?" वगैरे प्रकार बोलून झाले. हें सगळें गोपिकाबाईला कळल्यावर त्यांनी चिरंजीवास सांगून पाठविलें की मला तुमच्याशी कांहीं बोलावयाचे आहे, तर मी आतांच तुमच्याकडे येतें. माधवरावाला निरोप कळला. त्याच दासीबरोबर त्यांनीं परत जबाब पाठविला की, "मी आज दिवसभर थकलों आहें. आतां निद्रेची वेळ आहे, तेव्हां मीच सकाळीं आपणांस येऊन भेटतों." आई झाली म्हणून काय करिते? तिलाही रात्रभर स्वस्थ बसणे भाग पडलें. पण जीव संतापाने फणफणत होता. रात्र निघून गेली. माधवरावांनीं तरी मुद्दामच सकाळची वेळ नेमली होती. मध्ये थोडा वेळ गेला म्हणजे चित्तवृत्ती शांत होत असतात, अधिकउणा शब्द तोंडांतून निघत नाहीं एवढाच उद्देश

ठरल्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी सकाळी माधवराव मातुश्रींच्या भेटीस गेले. त्या वेळी उभयतांचा संवाद झाला. माधवरावांची वृत्ति मात्र अगदीं सौम्य व नम्र होती.

**माधवराव**—बाई, तब्यत कशी काय आहे? काल तुम्ही बोलावलेंत तेव्हां उशीर झाला होता. एकदा वाटलें जावें, पण झोप येऊं लागली आणि पाऊलच पुढे टाकवेना. क्षमा करावी.

**गोपिकाबाई**—अरे माधव, बाबा तूं हें काय आरंभिलें आहेस? रास्त्यांची जागीर जप्त केल्याचा हुकूम तूं सोडलास म्हणे. त्यांनी रात्रीं **अन्न** देखील घेतलें नाहीं. तुला ही गोष्ट शोभते का? आपण आपल्याच लोकांना जर असे दूर करूं लागलो तर आपल्या उपयोगीं कोण पडेल?

**माधव०**—बाई, आपण म्हणतां तें सगळें मला कळतें. पण मी तरी काय करूं? आज दोन महिने झाले. एकेका सरदाराला हुकूम सोडून थकलों. अजून एकही सरदार फौज घेऊन हजर होत नाहीं.

तेव्हां राज्याचें रक्षण तरी कसें व्हावयाचें ? आणि मी पेशवा म्हणवून घेतों त्याचा उपयोग काय ?

**गोपिका**—अरे तें सगळें खरें, पण दुसरे मोठमोठे सरदार होळकर, पटवर्धन, पानसे या सर्वांना सोडून तूं प्रथम घरांतल्याच मंडळींच्या पाठीस लागलास हें काय ? आपल्या माणसांना आपणच संभाळून घ्यायला नको का ? आतां त्यांचा जर आम्ही संभाळ नाहीं केला आणि ते उद्यां भिक्षा मागूं लागले तर आपलाच नाही का दुर्लौकिक होणार ?

**माधव०**—बाई, हा हुकूम मी कांही एकट्या रास्त्यांनाच काढला आहे असें नाहीं. सगळ्यांनाच मी तसे हुकूम सोडतो आहें. मी एकट्याच्याच पाठीस लागलो असा प्रकार बिलकुल नव्हे. पण माझ्या हुकुमाचा अंमल मी प्रथम माझ्या घरच्या आप्तांवरही चालवूं शकतों हें जर लोकांना ठळकपणें दिसून, आलें तरच ते माझ्या आज्ञेचा भंग करण्यास धजणार नाहींत. आपल्या माणसांना वगळून इतरांवरच जर मी अंमल गाजवूं लागलो तर मग मला कोणी विचारणार नाही. मामांच्या निर्वाहाबद्दलच म्हणत असाल तर त्यांना तशी पंचाईत पडूं देण्याची माझी अगदीं इच्छा नाहीं. त्यांचा निर्वाह चालण्यास जें कांहीं द्रव्य पाहिजे ते मी आतांच आपल्या हातीं देतो. आपण तें त्यांना पोंचवा आणि त्यांची परभारें व्यवस्था करा. पण माझ्यापर्यंत गोष्ट येऊं देऊं नका. या गोष्टी तोंडावर त्यांच्याशी बोलून त्यांचा अपमान करणें मला बिलकुल पसंत नाहीं. आपण मातुश्री त्याचप्रमाणें ते मातुल. उभयतां मला सर्वोपरी वंद्य आहां. पायां पडण्याच्या प्रसंगीं एकदां सोडून दहा वेळां मी उभयतांच्या पायांवर डोकें ठेवीन.

**गोपिका०**—पण चौघांत त्यांची अब्रू जाईल त्याची वाट काय ? याचा काय तो बंदोबस्त कर एवढेंच माझें तुला सांगणें आहे.

**माधव०**—म्हणजे ? हा त्यांची अब्रू जाण्याचा प्रश्न नाहीं. पेशव्यांचा हुकूम मानला नाही तर काय परिणाम होतो हें सगळ्यांना कळावें म्हणून तर माझा एवढा आग्रह आहे. माझ्या म्हणण्याचा अर्थ लक्षांत आणा. मी आपल्या स्वतःच्या माणसांचीही गय करीत नाहीं हें बाहेर सरदारांना एकदा समजूं द्या आणि मग पहा एकंदर राज्यांत माझा हुकूम कसा पाळला जातो ते !

**गोपिका०**—पण माधव, आतां तरी माझा एवढा शब्द तूं मोडूं नको. कळला हुकूम परत घे म्हणजे मी त्यांना सांगून तुला पाहिजे तशी व्यवस्था त्यांच्याकडून करवितें. त्याची जबाबदारी माझ्यावर.

**माधव०**—बाई, हीं गोष्ट कालत्रयीं घडणार नाहीं. आपल्या शब्दाचा अवमान करणं माझ्या जिवावर येतें. पण हा प्रकार मातुश्रींच्या आज्ञेचा नसून राज्यकारभाराचा आहे. मला दोन कोटी लोकांचा न्यायनिवाडा व संगोपन करावयाचें आहे. तेव्हां याबद्दल मला आपण क्षमा करावी.

**गोपिका०**—मग जिथं माझ्या शब्दाला किंमत नाहीं तिथें मी तरी आपला काळ कसा घालविणार ? आणि मला अन्न तरी कसें गोड लागणार ? त्यापेक्षां तीर्थवास करणें काय वाईट ? तुला जर आपल्या मातुश्रीची एवढीही पर्वा नाहीं तर खुशाल तूं आपलें राज्य घेऊन बैस. मला अशा स्थितीत एक क्षण इथें राहाण्याची इच्छा नाहीं.

**माधव०**—मर्जी आपली ! आपण कुठंही राहिलां तरी पुत्राचें कर्तव्य मी सदैव करीतच राहीन, आणि राज्यकारभार खेरीज करून कोणत्याही बाबतींत आपली आज्ञा मी सदैव पाळीन.

**गोपिका०**—बरें तर, तुला आपलाच हट्ट चालवावयाचा असेल तर तुझ्याप्रमाण माझाही हाच निश्चय कीं मी अतःपर पुण्यांत पाणी घेणार नाही. मी आपली नाशकाला जाऊन तीर्थवास पत्करणार !

हे बोलणे चालले असतां उभयतांचीही मनें आपापल्या परी अत्यंत उद्विग्न झालीं होतीं. शेवटीं दोघांच्याही डोळ्यांत अश्रु उभे राहिले. पण

दोघेंही सारखींच करारी. आई तसा मुलगा ! या पेंचांतून सुटायला कांहीं मार्ग नव्हता. तेव्हां माधवरावांनीं मातुश्रीच्या तीर्थवासाची तजवीज ताबडतोब लावून दिली. त्या ज्या एकदां तिकडे निघून गेल्या त्या पुनः कधीं पुण्यास परत आल्या नाहीत. हाच त्यांचा मुलगा पुढें आसन्न-मरण झाला असतांही त्याला मातुश्रीचे दर्शन घडले नाहीं. सुमारे पंचवीस वर्षें गोपिकाबाई गंगापुरास राहिल्या. असो.

या एका संवादावरूनही माधवरावाच्या राज्यकारभाराचा अंदाज करतां येतो. निजाम पुण्यावर चालून आला हें वर सांगितलेंच आहे. त्याची समजूत करून त्याला परत पाठवितात तो दादासाहेब रुसून घरांतून चालते झाले; आणि फौजा जमवून पुतण्याला पकडण्याची तयारी करूं लागले. माधवरावांनींही आतां फौजा जमविल्या. भीमेच्या दोन तीरांवर दोघांचा तळ पडला. दादासाहेब चालून आले. पुष्कळ लोक मारले जाऊन माधवरावाचा पराभव झाला. आतां काय करावें ही पंचाईत त्याला उत्पन्न झाली. जवळ मोठमोठे अनुभवी सरदार व सल्लागार होते. सगळ्यांनी सांगितले थोडा वेळ माघार घेऊन दूर जाऊ आणि नवीन फौज उभारून आपण दादासाहेबांचा पाडाव करूं. पण ही सल्ला माधवरावाला पटली नाही. आपण आपसांत लढून आपलेच लोक मारावे हें त्यांना बरें वाटेना. मनाशीं पुष्कळ विचार केला. येऊन जाऊन दादासाहेबांचा दोष काय तर ते हलक्या कानाचे. वाटेल त्याचें ऐकतात, आणि भलतेंच करतात. तेव्हां माधवरावानेंही विचार केला, " ही गोष्ट आपल्या फायद्याचीच आहे. मीच जवळ राहून त्यांचें मन कां न वळवावें ? करीनात ते पाहिजेत तर कारभार. त्यांची इच्छा मला अटकेत ठेवण्याची असली तर ती त्यांनीं खुशाल तृप्त करून घ्यावी. "

इतक्यांत दादासाहेब आपण स्वतःच पुतण्याला पकडण्यासाठीं चालून येत आहेत, अशी बातमी आली. तत्क्षणीं इतर सल्लागारांचें कांहीं एक न ऐकतां दोन नोकर बरोबर घेऊन माधवराव आपण

होऊनच दादासाहेबांच्या छावणींत गेले व त्यांच्या स्वाधीन झाले! त्यांनीं दादासाहेबांना सांगितलें, “ मला हें आपसांतलें युद्ध नको. आपण खुशाल कारभार करा. मी आपल्याजवळ कैदेतच राहाण्यास कबूल आहें. घासभर पोटास द्याल ते खाऊन आपल्याजवळ राहीन. एकादी गोष्ट विचारण्याची आपली मर्जी झाली तर सुचेल ते सांगेन, नाही तर पोथ्यापुस्तकें, ईशस्मरण यांतच मी आपला काळ घालवीन.”

दादासाहेबांना आयतेंच आपले काम झाले म्हणून आनंद झाला. त्यांनीं माधवरावांस आपल्याजवळ अटकेत ठेविलें आणि आपण कारभार करू लागले. अशाखाली दीड वर्ष गेले. सातारा, मिरज, नगर इत्यादि ठिकाणीं शत्रूचा बंदोबस्त करीत दादासाहेब फौजेसह हिंडत राहिले. माधवराव बरोबरच होते. निजामानें येऊन नाशकापासून साताऱ्यापर्यंतचा मुलूख बेचिराख केला. त्याचा वचपा काढण्यासाठीं दादासाहेबांनी हैदराबादेपर्यंत स्वारी करून निजामाचा मुलूख जाळला. माधवराव मुकाट्यानें सर्व गोष्टी पाहत होते. अंगांत पुष्कळ चेव येई, पण दादासाहेबांस वचन दिलें तें त्यांनीं खरे केले.

असें होतां होतां एकदां गोदावरीच्या कांठीं राक्षसभुवनावर निजामाचा तळ पडला. निजामाचा मुख्य कारभारी विठ्ठल सुंदर म्हणून होता त्याजकडे सर्व फौजेचें आधिपत्य असून दादासाहेब व माधवराव यांचा मुक्काम मागे दहा मैलांवर झाला. आषाढ व० ३० ता. १० ऑगस्ट, स. १७६३ रोजीं रात्रीं पाऊस व अंधार बेसुमार. गोदावरी तुडुंब भरून चाललेली. चुलत्या पुतण्यांनीं विचार केला की एकदम जाऊन निजामाचा फडशा उडवावा. बेत ठरला. भल्या पहांटे मराठ्यांची फौज आवेशानें निघाली आणि एकदम विठ्ठल सुंदरावर जाऊन घसरली. दोन प्रहर पावेतों तुंबळ रणकंदन झालें. माधवराव अद्यापि तसा मोकळा नव्हता. लढाईचें सर्व काम खुद्द दादासाहेबच चालवीत होते. इतक्यांत माधवरावांना बातमी आली कीं दादासाहेबांच्या हत्तीला वेढा घालून

शत्रूचे लोक त्यांना पकडून घेऊन जात आहेत. ही बातमी कळतांच माधवरावाच्या अंगांत वीरश्रीचा संचार झाला. हजार पांचशांची टोळी जवळ होती, ती घेऊन ताबडतोब त्यांनीं अशा त्वेषानें एकदम चाल केली कीं, हां हां म्हणतां दादासाहेबांचा हत्ती परत वळवून व विठ्ठल सुदराचें शीर कापून ते छावणींत परत आले. खुद्द निजाम आदले दिवशीं नावेंत बसून नदीपलीकडे गेला होता म्हणून वांचला. या वेळीं दादासाहेबांना काय वाटलें असेल तें त्यांनी आपल्या भावजयीस पाठविलेल्या पत्रांतील पुढील उताऱ्यावरून कळून येईल.

“ती. मातुश्रीबाई यास-रघुनाथचे नमस्कार. विनती विशेष. चिरंजीव रायांनीं यंदा मेहनतीत व शिपाईगिरीत कमी केली नाही. आम्हापेक्षां अधिक जाहले. इतके दिवस त्यांनीं लढाई देखली नव्हती. ही पहिली लढाई पाहिली. ह्यांत सर्व प्रकारे तर्तूद अधिक केली. यांचा पुढें कर्तेपणाचा भरंवसा आम्हांस आला सांप्रत कारभार चिरंजीवच करतात. आमचे मर्जीप्रमाणें वर्ततात. तिलमात्र वांकडे चालत नाहींत. ......”

या लढाईने माधवरावांचे कर्तृत्व पूर्णपणे सिद्ध झालें आणि चुलत्यानें आपण होऊन कारभार त्यांचे हाती दिला. माधवराव मुक्त्यार बनले, पण दादासाहेब मात्र खिन्न राहिले. तेव्हांपासून आठ वर्षांत एवढा प्रचंड उद्योग माधवरावानें करून दाखविला कीं त्या योगाने या पेशव्याचें नांव मराठ्यांच्या इतिहासांत सदैव झळकत राहिले आहे.

कर्नाटकांत लागोपाठ स्वाऱ्या करून त्यांनीं हैदरअल्लीस शरण आणिलें. निजामाशीं स्नेह जोडून त्याला आहारी आणिला. नागपूरकर भोसले नेहमीं फुटून वागत त्यांजवर प्रचंड स्वारी करून खुद्द नागपूर शहर जाळून त्यांना इतकें नरम केले, की ते पेशव्यास शरण आले पेशव्यांशी स्नेह जोडून सदैव त्यांच्या आज्ञेत वागण्याचे आणि एकमतानें मराठ्यांचें राज्य वृद्धिंगत करण्याचें त्यांनी शपथपुर.सर लिहून दिलें. माधवरावांनीं शिंदेहोळकरांची व्यवस्था लावून दिली.

अहल्याबाईच्या स्वाधीन होळकराचा कारभार करून तिचा उपयोग राज्याच्या कामीं करून घेतला. महादजी शिंदे, तुकोजी होळकर वगैरे सरदारांस उत्तरेंत पाठवून जाट व रोहिले यांचा पाडाव करून खुद्द शहाआलम बादशहा निराश्रित होऊन बाहेर अलाहबादेस राहिला होता, त्याला आणून दिल्लीच्या सिंहासनावर बसविलें, आणि बादशहाचें व एकंदर उत्तर हिंदुस्थानचे संरक्षण करण्याची जी जबाबदारी वीस वर्षांपूर्वी नानासाहेबांनीं अंगीकारली होती आणि जिच्यामुळें पानिपतचा प्रसंग ओढवला, ती जबाबदारी या वेळीं त्यांनीं पुरी केली; इतकेंच नव्हे, तर क्लाइव्हनें बंगाल प्रांताची दिवाणी पत्करून जो प्रांत हस्तगत केला होता तो सोडवून इंग्रजांचा शिरकाव हिंदुस्थानांत होऊं देऊं नये असाही उद्योग त्यांनीं चालविला पण मृत्यूनें सर्व संपलें.

मध्यंतरीं दादासाहेब स्वस्थ बसले नव्हते. अल्पकाळानें ते पुतण्यापाशीं राज्याचा अर्धा वांटा मागूं लागले. माधवरावांनीं तो मान्य केला नाहीं. त्यांनीं जबाब दिला, " राज्याची वांटणी करणार मी कोण आणि मागणार तुम्ही कोण ? राज्य हे एक आहे. तें करणाराचें असून भोगणाराचें नव्हे. " दादासाहेबांचे कारभाऱ्यास या वेळी माधवरावांनी खालील पत्र लिहिलें,—

" ही दौलत मोठी, या दौलतेस सर्व लहान मोठ्यांनीं अनुकूल असून जेणें करून दौलत नीट होय तेंच सर्वांनीं करावें. तें एकीकडे राहून दौलत दोहोंजागा करावी हेंच तीर्थस्वरूपांचे मानस. त्यास आम्हांस कांहीं करणे नाहीं. कारण कीं, ही दौलत पहिल्यापासून एकांनींच करावी. वरकडांचा भार करणारावर असावा. याप्रमाणे चालत आले असतां आतां वडिलांचें मानस कीं आम्हांस गुजरात द्यावी, आणि सर्व किल्ल्यांचा बंदोबस्त आम्हीच करूं म्हणतात, त्यास आम्हांस कांहींच करणें नाहीं. कां की अशानें ही दौलत चालणार नाहीं व दोहोंजागीं

दौलतीचे वांटे केल्यानें लौकिकही वाईट. यास्तव सर्व वडिलांनींच करावें. आम्ही स्वस्थ भलते जागां राहूं. आपल्या आपल्यांत भांडून दौलत बुडविली हा लौकिक कशास पाहिजे ? सर्व त्यांनींच करावें हें फार चांगलें.... ........"

परंतु या उपदेशाने दादासाहेब थोडेच स्वस्थ बसणार ! त्यांनीं फिरून उठाव केला. वर्ष सहा महिने मोठमोठ्या शहाण्यांनी मध्ये पडून समजूत करण्याची शिकस्त केली. पण मेळ बसला नाही. शेवटीं प्रकरण निकरावर आलें. या वेळीं माधवरावांची तयारी जय्यत होती. त्यांनी चुलत्याचा पाठलाग करून नाशकाजवळ घोडप म्हणून किल्ला आहे त्याच्याखालीं दादासाहेबांचा तळ असतां त्यांना सडकून झोडपलें ! दादासाहेब जीव घेऊन किल्ल्यावर पळून लपून राहिले. माधवरावांनीं त्यांस पकडून आणिलें आणि आपल्या बरोबर हत्तीवर घेऊन बंदीवान म्हणून पुण्यास आणून शनिवारवाड्यांत नजरकैदेत ठेविलें. पुढें मरतांनाही त्यांनीं ताकीद देऊन ठेविली की, "दादासाहेबांना बंदींतून मोकळें करूं नका. ते सुटले तर राज्याचा घात केल्याशिवाय राहणार नाहींत."

अशा प्रकारें या चतुरस्र व कर्तृत्ववान पेशव्याला अल्पावकाशांत जो भयंकर ताण बसला त्या योगानें त्याला क्षयानें पछाडलें. मातुश्रीनें स्वतः पत्र लिहून 'श्रम करूं नका, सूर्याचे नमस्कार घालूं नका,' वगैरे परोपरीनें लिहून कळविलें. त्याला माधवरावानेंही स्वहस्तें बालबोधींत मातुश्रीला जबाब लिहून पाठविला कीं, "आपली आज्ञा प्रमाण. नमस्कार टाकले. फक्त स्नान करून सूर्यदर्शन घेऊन हातानेंच नमस्कार करतों." पण रोग कांहीं हटला नाहीं. शेवटीं प्रकृति अत्यंत क्षीण झाली. थेउरास गणपतीचें स्थान आहे तेथें जाऊन राहिले. परंतु गुण येईना. तेव्हां सर्व राज्याची निरवानिरव करून कार्तिक वा॥ ८ शक १६९४

ता. १८ नोव्हेंबर, स. १७७२ रोजीं प्रातःकाळी हा पेशव्यांचा हिरा हरपला. बायको रमाबाई सती गेली. प्रसिद्ध इतिहासकार लिहितो,—

" पानिपतच्या संहारानें मराठी राज्याचे नुकसान झालें नाहीं इतकें या होतकरू पेशव्याच्या अकाली मृत्यूनें झालें. " अठ्ठावीस वर्षांचा एक तरुण मुलगा दहा वर्षांत वर सांगितलेली अप्रतिम कामागिरी करून दाखवितो हे एकंदर महाराष्ट्रास केवढे भूषण म्हटलें पाहिजे बरें ?

# १९

# न्यायदेवतेचें सामर्थ्य



"Such a noble character as Ram Shastri's made a permanent mark and few people equalled him in the influence he wielded over the public and the respect he received from all"—*Kincaid and Parasnis*

**रामशास्त्री यांचें नांव महाराष्ट्रांत अद्यापि महशूर आहे.**

ता. ३० ऑगस्ट, स. १७७३ सोमवार भाद्रपद शु॥ १३ शक १६९५ ते दिवशी दोन प्रहरीं पुण्याच्या शनिवारवाड्यात नारायणराव पेशव्यांचा गारद्यांच्या हातून वध झाला. हा वध किंवा खून कसा झाला, कोणी केला, यांत गुन्हेगार कोण वगैरे तपशील आतां बहुतेक निश्चित झाले आहेत. झाला हा प्रकार राज्याला अत्यंत अपायकारक ठरला. असल्या दुष्ट कृत्यांनी फायदा तर कोणाचा होत नाहींच, पण नुकसान मात्र सर्व बाजूंनीं होते. तसाच परिणाम याही कृत्याचा झाला. स्त्रीहत्या, पुरुषहत्या व गोहत्या मिळून एकंदर बारा खून त्या दिवशीं दिवसा ढवळ्या पेशव्यांच्या त्या नामांकित वाड्यांत पडले. त्या वेळचा वाड्यांतला देखावा किती भीषण असेल हें कल्पनेनेंच जाणलें पाहिजे. कोणत्या मुहूर्तावर शनिवारवाड्याचा पाया घातला गेला कोणाला ठाऊक, पण या वाड्यांत असला प्रकार घडेल हें भविष्य कोणीं सुरुवातीला वर्तविलें असतें तर त्याची वेड्यांतच गणना झाली असती ! त्या दिवशीं या इतक्या प्रेतांचे अंत्यविधिसुद्धां वेळेवर यथासांग पार पडूं शकले नाहींत !

पेशव्यांचा व इतर खून होऊन थोडा वेळ गेल्यावर कुटुंबांत नेहमीं वागणारा वाड्यांतील जासुदांचा एक वृद्ध व पोक्त नाईक रघुनाथराव-दादांपाशीं आला. ते चौकांत कपाळाला हात लावून बसले होते. हा नाईक त्यांना म्हणाला, "दादासाहेब, वाहवा! फार मोठी करामत केलीत!" त्या जासुदाच्या तोंडचे हे शब्द बाहेर पडतात न पडतात तोंच गारदी जवळ होते, त्यांनीं त्या जासुदाला देखील तेथल्या तेथें तोडून टाकिलें! यावरून गारदी खून चढून कसे बेफाम झाले होते हें कळून येतें. सायंकाळपर्यंत वाड्यांत जाण्याचा कोणास धीरच होईना. गारद्यांनीं वाड्याचे दरवाजे बंद करून घेतले होते, आणि केलेल्या कृत्याची फुशारकी मारीत व देऊं केलेला पैसा टाका म्हणून आरोळ्या ठोकीत ते आंत दादासाहेबांस वेढा घालून बसले होते!

बाहेर मोठमोठे सरदार, कारभारी व लष्कर जमा झाले व तोफाही आणल्या. पण आंत मेले कोण, जिवंत कोण याची बातमी बाहेर न लागल्यामुळे वाड्यावर तोफा तरी कशा डागायच्या? आंतून फक्त रडारोय ऐकूं येत होती. पण निश्चित बातमी बाहेरच्यांस कांहीच लागेना. भवानराव प्रतिनिधि, मालोजी घोरपडे, बाबूजी नाईक वगैरे कित्येक प्रतिष्ठित गृहस्थ या वेळीं पुढें झाले, पण ते चवताळलेले गारदी कोणासच शस्त्र घेऊन पुढें येऊं देईनात. त्यामुळें त्यांनाही मोठ्या मुष्किलीनें शस्त्रें बाहेर ठेवल्यावर आंत जाण्यास प्रवेश मिळाला. रघुनाथरावांच्या मार्फत गारद्यांना नऊ लाख रुपये मिळावयाचे होते, ते आधीं टाका आणि मग काय ते बोला हे गारद्यांचें म्हणणें. शेवटीं वरील तिघांनीं दादासाहेबांना व गारद्यांना भेटून कबूल केलेल्या पैशाची जामीनगत पटविली, तेव्हां उशीरां मध्यरात्रीच्या सुमारास गारद्यांनीं वाड्याचे दरवाजे मोकळे करून अंत्यविधीला परवानगी दिली.

प्रेतें उचलण्यास माणसेंही मिळेनात. पुष्कळ मोल देऊन कित्येक तेलंगी ब्राह्मण मुद्दाम बोलावून आणण्यांत आले. नारायणरावाच्या

शरीराचे तर छिन्न विछिन्न झालेले तुकडे इतस्ततः पडले होते. त्यांची मोट एका वस्त्रानें बांधून पेशव्याचें शव तसेंच स्मशानांत नेण्यांत आलें आणि मध्यरात्रीनंतर त्याला कसाबसा अग्नि देऊन मंडळी परत आली. यःकश्चित् सामान्य माणसाच्या शवाला जो संस्कार घडतो तो देखील या पेशव्याच्या शवाला मिळूं शकला नाहीं! भवितव्यतेचा केवढा हा भीषण खेळ! असो.

पुढें यथावकाश रघुनाथरावानें छत्रपतींकडून आपल्या नांवानें पेशवाईचीं वस्त्रें आणवून प्रधानपदाचा स्वीकार केला. त्याला बारभाईंनीं पुढे गुप्त कारस्थान रचून कसा विरोध केला, आणि त्यामुळें इंग्रजांशीं आठ वर्षें-पावेतों युद्ध कसे जुंपले, हा प्रकार इतिहासांत भरपूर वाचावयास मिळतो.

त्या वेळीं पुण्यांत सुप्रसिद्ध रामशास्त्री प्रभुणे मुख्य न्यायाधीश होते. न्यायासन हा राज्यासनाचा केवढा बळकट आधार असतो याची पुष्कळ वेळां आपणाला कल्पना नसते. वरच्यासारख्या प्रसंगाने मात्र त्याची प्रतीति कळून येते. पेशव्यांच्या वाड्यांत घडलेल्या वरील भयंकर बनावाची हकीकत रामशास्त्र्यांना कळल्याबरोबर त्यांनी लगेच दुसऱ्या दिवशी त्या प्रकरणाचा अत्यंत बारकाईनें व्यवस्थित तपास सुरू केला. सुमारें दोन महिनेपावेतों तपासाचें काम चालले होते.

चौकशी पूर्ण झाल्यावर रामशास्त्र्यांनीं आपला अभिप्राय इतर मदतनीस शास्त्री मंडळींच्या व अंमलदारांच्या सल्लयानें तयार केला, आणि पेशवे रघुनाथराव यांस सांगून पाठविलें कीं, “ आम्हांस आपल्या भेटीची जरूर आहे, केव्हां कोठें भेटावयाचें तें कळवावें. ” या वेळीं रघुनाथरावांचा मुक्काम पुण्यापासून तीस चाळीस मैलांवर भीमेच्या बाजूस होता. त्यांनीं तिकडेच शास्त्री यांस भेटीस बोलाविलें. तेव्हां रामशास्त्री पुण्याहून पेशव्यांच्या भेटीस त्यांच्या मुक्कामावर गेले. रिवाजाप्रमाणें दरबारांत सरदार, कारभारी, पेठे, प्रतिनिधि वगैरे बसले असतां भेट झाली.

औपचारिक प्रश्नोत्तरें झाल्यावर दादासाहेब म्हणाले, 'कां शास्त्रीबोवा, आज मुद्दामसें येणें झालें ? विशेष काम काय आहे ?'

**शास्त्री**—आमचें दुसरें कसलें काम असणार ? जें आम्हांस सरकारनें सोपिलें आहे तेंच काम.

**दादा**—मग त्याचा आज आमच्याशीं काय संबंध ?

**शास्त्री**—दादासाहेब, हें काय आपण विचारतां ? माझ्या येण्याचें प्रयोजन आपणांस न समजण्यासारखें का आहे ? एवढा मोठा प्रसंग पुण्यांत घडला, त्याचा न्याय जर राज्यकर्त्यांकडून झाला नाहीं तर त्याला राज्य कोण म्हणणार ? आणि बाहेर इतर गोरगरिबांची निभावणूक तरी कशी होणार ?

**दादा**—व्हायचे ते प्रकार होऊन गेले. आतां त्याची चर्चा कशाला पाहिजे ?

**शास्त्री**—दादासाहेब, असें कसें म्हणतां ? गुन्हा घडल्यावर त्याचा तपास करणें आणि गुन्हेगारांना न्यायासनासमोर शिक्षा फर्माविणें हें कोणत्याही राज्यकारभारांतले पहिले व मुख्य अंग नाहीं काय ?

**दादा**—पण हें प्रकरण कांहीं इतर प्रकरणांसारखें नाहीं. पेशव्यांच्या घरच्या भानगडींत इतरांना पडण्याचें प्रयोजन काय ? तुम्हांला या उठाठेवी कोणी सांगितल्या ? आमच्या आज्ञेशिवाय तुम्ही तपास करणारे कोण ?

**शास्त्री**—दादासाहेब, आज निदान पंचवीस वर्षें तरी आपण पेशव्यांच्या राज्यांत सज्ञानपणें वागत आहां; तेव्हां राज्यकारभाराच्या मूलभूत तत्त्वाची जाणीव आपल्याला नसेल असें आम्हीं कसें मानावें ? आम्ही पेशव्यांच्या न्यायासनाचे मुख्य अधिकारी आहों. एकंदर राज्यांत कोठेंही कसाही गुन्हा घडला तरी त्याचा तपास लावून न्याय सांगणें हें आमचें पहिलें कर्तव्य आहे. तें कर्तव्य एकंदर राज्यकारभाराच्या

अंगभूतच आहे. त्याबद्दल स्वतंत्र हुकूम घेण्याची आम्हांस बिलकुल आवश्यकता नाहीं. जर गुन्हा घडला नसेल आणि खोटा तपास होईल तर त्याचाही मार्ग शास्त्रांत आहेच. गुन्हा घडला नाहीं असें का आपण म्हणतां ?

**दादा**—बरं, केला तपास तो केला. पण तुमच्या तपासांत काय निष्पन्न झालें आहे ?

**शास्त्री**—आमच्या तपासांत पुरुषहत्या, स्त्रीहत्या व गोहत्या असे एकंदर बारा खून वाड्यांत घडले असे दिसून आले आहे.

**दादा**—आणि त्यांत अपराधी कोण कसे आहेत याचा बरोबर शोध तुम्हांस लागला काय ?

**शा०**—होय, तोही तपास लागला आहे. सर्व अपराधी लोकांची यादी मी बरोबर आणली आहे, आणि त्यांना काय शिक्षा द्यावयाच्या त्याचा अभिप्रायही मी आपल्यापुढे मांडणार आहे. शिक्षा सांगणे हें न्यायाधीश या नात्यानें माझें काम मी करीन, पण त्या योग्य रीतीनें अंमलांत आणणें हें काम आपले आहे. मी आपल्यास गुन्हेगार दाखवितों, त्यांना शिक्षा कशा प्रकारें करावयाची ती आपण विचारपूर्वक ठरवा.

**दादा**—बरं, पण कोण कोण गुन्हेगार आहेत त्यांची नांवे तर ऐकूं द्या.

**शा०**—( एक यादी पुढें करून ) हे पहा तेरा गारदी. यांत आठ हिंदु आणि पांच मुसलमान आहेत.

**दादा**—( यादी वाचून व थोडा विचार करून ) बरं, आणखी कोण ?

**शा०**—( दुसरी यादी पुढे करून ) हे सात मराठे आहेत.

**दादा**—( यादी वाचून ) काय म्हणतां ? या सगळ्यांचा या प्रकरणाशीं संबंध येतो ?

**शा०**—होय. (तिसरी यादी पुढे करून) आणखी ही पहा तिसरी यादी. यांत २६ ब्राह्मण आणि ३ प्रभु आहेत.

**दादा**—ब्राह्मणांचेंही अंग या प्रकरणांत होतें तर मग?

**शा०**—अवश्य. मोठमोठ्या ब्राह्मणांचेंही अंग निःसंशय होतें. ब्राह्मण म्हणून यांचा मुलाहिजा करावा असें मला वाटत नाही.

**दादा**—बरं, आणखी काय तुम्हांला सांगायचें आहे?

**शा०**—आणि शेवटी दादासाहेब, आतां मी स्पष्टच बोलणार आहें. हे सर्व गुन्हेगार असले तरी या एकंदर प्रकरणाच्या मुळाशीं या कृत्याचा मुख्य चालक तर निराळाच असल्याचें तपासांत बाहेर आलें आहे. दादासाहेब, तो संबंध प्रत्यक्ष आपल्याशी येतो.

**दादा**—(एकदम वर उठून) शास्त्रीबुवा, आपण हे शब्द कोणासमोर उच्चारीत आहां याचें तुम्हांस भान आहे काय?

**शा०**—(शांतपणे) काय हा आपला प्रश्न? मी देहभानावर नाहीं असें का आपल्याला वाटते? मी कोणासमोर उभा आहे, काय बोलतों, या बोलण्याचा परिणाम काय होईल हें सुद्धां मला समजत नाही अशी का आपली समजूत आहे? न्यायासनाला भीडभाड माहीत नसते. आपण या मराठी राज्याचे मुख्य चालक आहां, पण गरीब आणि श्रीमंत, सत्ताधारी आणि सत्ताहीन, सबल आणि दुर्बल हा भेद न्यायदेवता ओळखीत नाही. खऱ्याला खरें म्हणणें, खोट्याला खोटें म्हणणें, आणि पुढें आलेल्या पुराव्यावरून न्याय सांगणें हें तिचें काम. न्यायाचा निवाडा देण्याचें आमचे काम आम्ही केलें आहे.

**दादा**—(गोंधळून) पण आम्ही कांहीं पुतण्याचा वध केला नाहीं; आणि आमच्याकडे तो अपराध लागू होणें शक्य नाही.

**शा०**—स्वतः आपण पुतण्यावर शस्त्र उगारलें नाहीं ही गोष्ट खरी आहे; पण हा एकंदर कट उभारणें, गारद्यांना पैसे भरणें, आणि

त्यांच्याकडून हीं नानाविध अनन्वित कृत्यें करविणें या सगळ्यांचे मुख्य सूत्र आपल्याकडे लागू होतें ही गोष्ट आमच्या तपासांत निर्विवाद सिद्ध झाली आहे. इतर गुन्हेगार कोण याची यादी मी आपल्याला दिलीच आहे. त्याना त्यांच्या गुन्ह्याच्या मानानें कमी जास्त शिक्षा करणें आपल्या मर्जीची गोष्ट आहे. पण या कामीं मुख्य गुन्हेगार दादासाहेब, आपण आहां हें स्पष्टपणें सांगणे मी माझें कर्तव्य समजतों.

**दादा**—( अत्यन्त संतप्त मुद्रेने ) आणि तुम्ही या मुख्य गुन्हेगाराला शिक्षा करावी म्हणणार ? कोणती शिक्षा तुम्ही याला सांगणार ?

**शा०**—शिक्षा दुसरी कोणती असणार ? एकंदर बारा हत्या झाल्या, तेव्हां शास्त्राने सांगितलेली देहान्त शिक्षा हीच आपल्याला लागू पडते.

**दादा**—( रागाने पाय आपटीत व तोंड फिरवीत ) बस्स ! आम्हांला तुमचें बोलणें ऐकून घेण्याची इच्छा नाहीं. हा तुम्ही पेशव्यांचा उघड उघड अपमान करीत आहां; आणि शास्त्रीबोवा, याचें प्रायश्चित्त तुम्हांला पुरेपूर भोगावें लागेल !

**शा०**—( शान्तपणे ) दादासाहेब, धन्य आहे आपली ! मला सुपूर्त केलेल्या न्यायासनाच्या पावित्र्यरक्षणासाठीं खरें तेंच बोलणें आणि न्याय्य तेच सांगणें हा आपल्याला गुन्हा वाटत असेल, तर हा मी येथें आपल्या-समोर हजर आहें. बारा हत्या घडल्या त्यांत आणखी एकीची भर घालावयाची असेल तर खुशाल घाला. माझी तयारी आहे. आपला लौकिक चिरंतन होईल. घ्या काय करायचें असेल तें करून !

रामशास्त्र्यांची ती गंभीर व निश्चयी मुद्रा आणि धीरोदात्त वर्तन पाहून दादासाहेबांची मति कुंठित झाली. त्यांचें अंग थरथरां कांपूं लागलें, डोळे पाण्याने भरून आले. काय करावें हें त्यांस सुचेना. ते तसेच उठून जाऊं लागले तेव्हां शास्त्रीबुवांनी त्यांच्या अंगरख्याचा पदर धरून हटकलें, " दादासाहेब, मी आपल्यासमोर जो प्रकार मांडला त्याचा निकाल काय तो सांगा. न्याय केल्याशिवाय चाललांत कुठें ? "

**दादा**—आम्हांस या गोष्टीचा कांहींएक निकाल करावयाचा नाहीं. घडलेला प्रकार आमच्या घरांतला खाजगी आहे. त्याचे निराकरण आमचें आम्ही सुचेल तसें करूं. त्यांत बाहेरच्या न्यायाधीशाची ढवळाढवळ आम्ही बिलकूल मानणार नाहीं.

**शा०**—बस्स ! झाले माझे काम ! ज्या राज्यांत न्याय नाहीं त्या राज्यांत राहण्याची आमचीही इच्छा नाहीं, एवढेंच नव्हे तर आपल्या या अन्यायी राजवटीत अतःपर नुसते पाणी घेणे देखील मी पाप समजतो. हा मी इथूनच चाललो ! आपण हे खेळ खुशाल असेच चालवा. मराठी राज्याचा नाश अशा रीतीनें करण्याचाच परमेश्वरी संकेत असेल तर आम्ही मानव तो कसा टाळूं शकणार !

असें म्हणून शास्त्रीबुवा तेथून निघाले, ते सातारा जिल्ह्यांत आपल्या राहत्या गांवीं गेले.—हा गांव निजामाकडून वडिलार्जित इनाम असल्यामुळे मराठी राज्यांत मोडत नव्हता.

नारायणरावाच्या खुनाचा न्याय जरी प्रत्यक्ष रघुनाथरावाच्या हातून या वेळीं झाला नाहीं तरी तो न्याय यथावकाश झाल्याशिवाय मात्र राहिला नाहीं. त्यास यातायात फार पडली व अवधिही पुष्कळ लागला एवढेंच. कारण रघुनाथरावाकडे पेशवाईपद टिकूं द्यावयाचें नाहीं अशा हेतूने नाना फडणीस, सखाराम बापू वगैरेंनीं बारभाईचें कारस्थान निर्माण केलें, नारायणरावाची बायको गंगाबाई गरोदर होती तिला पुरंदरावर बंदोबस्तानें ठेविलें, आणि रघुनाथरावावर फौजा रवाना केल्या. दादासाहेब निघून इंग्रजांच्या आश्रयाला सुरतेस गेले. आठ वर्षे युद्ध चाललें आणि शेवटीं नाना फडणिसांनीं त्यांस कबजांत घेतलें.

या सगळ्या प्रकारानें कोणाची अत्यंत दैन्यावस्था उडाली असेल तर ती पेशव्यांची मातुश्री गोपिकाबाईची होय. बिचारीला पुष्कळ पुत्र झाले, त्यांतले तीन मोठे होऊन पराक्रमी निघाले. पहिला विश्वासराव विसाव्या वर्षी पानपतावर पडला; दुसरा माधवराव दिगंत लौकिक

करून अठ्ठाविसाव्या वर्षी क्षयाच्या व्याधीने अकालीं मरण पावला; आणि तिसरा नारायणराव हा एकोणिसाव्या वर्षात पाऊल टाकतो तोंच गारद्यांच्या तलवारीस बळी पडला. अशा प्रकारें तीन मोठे मुलगे एकामागून एक नाहींसे होऊन ती अनाथ अबला निपुत्रिक बनली, तेव्हां तिला काय वाटलें असेल याची कल्पनाही दुःसह आहे. ती नाशकानजीक गंगापुर येथे राहत होती. नारायणरावाच्या वधाचे वर्तमान कळतांच तिने खरोखरीची नारळाची आई हातीं घेऊन भिक्षा मागण्यास सुरुवात केली ! पुढे सवाई माधवरावाचा जन्म होऊन मराठी राज्याचे सुदैव फिरून उदयास आले तेव्हां कारभाऱ्यांच्या आग्रहावरून तिने ते भिक्षांदेहीचे व्रत सोडून दिले. तरी ती अखेरपर्यंत तशीच व्रतस्थ राहिली. पुण्यास कधी आली नाही.

कालिपुरुष रघुनाथराव यानें एकंदर पेशव्याच्या कुटुंबाची व राज्याची कशी वाट लावली हें सर्व महाराष्ट्र जाणत होता; आणि त्यालाही पुढें आपल्या पापाची खंत वाटूं लागली. शेवटीं त्यांना इच्छा झाली, मातुश्रीसमान वडील भावजयीची भेट घ्यावी. पण ‘ तुम्ही सर्वांसमक्ष भर गंगेंत उभें राहून स्वमुखानें एकदर पापाचा उच्चार करून, यथाविधि प्रायश्चित्त घेतल्याशिवाय तुमचे मुखावलोकन मी करणार नाही. ’ असे तिनें त्यास निक्षून कळविलें. तेव्हां नाइलाजानें नाशिक क्षेत्रीं विधिपूर्वक प्रायश्चित्त घेऊन गोदावरीच्या पवित्र जलांत कृतकर्मांचा एकंदर पाढा त्यानें स्वमुखानें वाचला, तेव्हांच त्याला त्या पुण्यशील बाईचें दर्शन घडलें ! त्यानंतर अल्पावधींत त्याचा इहलोकचा वास संपला. आठ वर्षें पेशवेपदासाठीं धडपड आणि पुढलीं दोन वर्षें बारभाईचा सासुरवास मिळून दहा वर्षें त्याला अनंत यातना सोसाव्या लागल्या. त्याच्या सर्व साह्यकर्त्यांचा सूड बारभाईनीं पुरेपूर घेतला. एवंच हे सारे कष्ट पाहिले म्हणजे देहान्त प्रायश्चित्तापेक्षांही भारी शिक्षा त्याला भोगावी लागली असें वाटल्याशिवाय राहत नाहीं.

नारायणरावाचा खून ही पेशवाईच्या इतिहासांतली एक अद्वितीय घडामोड होय. रामशास्त्र्यानी त्या प्रकरणाचा तपास केला त्यांत त्यांना जे कागदपत्र सांपडले ते इतिहासकार ग्रँट डफ याला वाचायला मिळाले होते असें त्याने लिहून ठेविले आहे. 'ध' चा 'मा' केलेली चिठ्ठी सुद्धां शास्त्रीबुवांच्यापुढे रुजू झालेली, ग्रँट डफला पहायला मिळाली होती. सामान्य समज असा आहे कीं हा खून रघुनाथरावाने किंवा त्याची बायको आनंदीबाई हिने करविला. पण तपासांत जें सत्य दिसून आलें तें अभ्यासकांनी लक्षांत ठेवणें जरूर आहे.

थोरले माधवराव पेशवे वारले त्यापूर्वीच त्यांनीं रघुनाथरावास सक्त नजरबंदींत ठेविले होतें. मरतांना त्यांनी एक दहा कलमी शेवटचा हुकूम म्हणून लिहून ठेविला, त्यांत त्यांनी बजावलें होतें कीं दादासाहेबांना मोकळे सोडू नये. मोकळे सोडल्यास ते राज्यास अपाय करतील. त्यांना हव्या त्या सुखसोई द्याव्या पण कायमचे अटकेंत ठेवावें. बंधूचा हा हुकूम नारायणरावाला पाळावा लागला. माधवरावांची छाप एकदर राज्यांत अप्रतिम असल्यामुळे त्यांच्या विरुद्ध दादासाहेबांना कांहीं एक करतां आलें नाहीं. परंतु नारायणरावाचा कारभार सुरू झाला तेव्हां दादासाहेबांनीं आपले पूर्वीचे ढग पुनः चालविले आणि निरोपानें व पत्रांनी त्याजविरुद्ध कारस्थाने चालू केलीं. त्याबरोबर नारायणरावानें दादासाहेबांची कैद अधिकच सक्तीची केली, त्याचा त्यांना त्रास होऊं लागला आणि कसेंही करून नारायणरावास कैदेत घालून आपण मोकळे व्हावे आणि पेशवेपद मिळवावें असा घाट त्यांनी कांही मंडळींच्या साह्याने रचला. पण या गोष्टी गुप्त राहिल्या नाहींत. थोडी बहुत कुणकूण बाहेर कित्येकांस लागली. नारायणरावानें मात्र त्याजबद्दल सावधपणा ठेवावा तो ठेविला नाही. त्याचें इतर वर्तनही थोडेबहुत तुसडेपणाचें होते, त्यामुळें नाना फडणिसासारखे कारभारी त्याच्याशीं जितक्यास तितकाच संबंध ठेवीत.

पण नारायणरावास ठार मारावें असा विचार खरें पाहतां कोणाचाच नव्हता. रघुनाथरावाची इच्छा देखील एवढीच होती की पुतण्यास बंदींत टाकून आपण राज्य करावें. नारायणरावास पकडण्याची कामगिरी त्यानें गारद्यांस सांगितली. पण राज्यासनावर असलेल्या पुरुषास पकडणें हाही एक जिवावरचा खेळ असतो. नारायणराव सहजासहजीं हातीं लागण्याचा संभव नव्हता. म्हणून गारद्यांनीं दादासाहेबांकडून आपली अशी सोडवणूक करून घेतली, कीं नारायणरावाला पकडतांना जर त्याच्या जिवाला आपणांकडून अपाय झाला तर त्याची जबाबदारी आम्हांवर असूं नये. तितक्यापुरती सोडवणूक रघुनाथरावानें लिहून 'नारायणरावास धरावें' असा हुकूम दिला. पुढें त्या गारद्यांनीं म्हणा किंवा खुनाच्या पश्चात् गारद्यांना वांचविण्यासाठीं दुसऱ्या कोणी म्हणा, दादासाहेबांच्या त्या हुकुमांत 'ध' च्या ठिकाणीं 'मा' हें अक्षर दाखल केलें, असा त्या चिठ्ठीचा निष्कर्ष निघाला.

दादासाहेबांची बायको आनंदीबाई ही विशेष धूर्त होती. आपल्या कुटुंबांतील सामान्य रिवाजाप्रमाणें अशा बिकट व्यवहारांची चर्चा पुरुष मंडळी बायकांशीं बहुधा करीत नसत. दादासाहेबांनीं नारायणरावाविरुद्ध कारस्थान चालविलें आहे याची थोडीबहुत वार्ता कदाचित् आनंदीबाईच्या कानावर गेली असेल, पण रघुनाथरावांना कैदेंत जो जाच होत होता, तो दूर करण्यापुरताच त्यांचा प्रयत्न चालला असेल, अशी तिची समजूत होती. त्यास मारावें असा तिचाही मनोदय नव्हता. खुनाचा प्रकार घडला तो अवचित एकाएकीं बनून आला. शेवटींसुद्धां नारायणरावानें चुलत्याचे कमरेस मिठी मारली तेव्हां दादासाहेब स्तब्ध राहिले, त्याचा बचाव करण्यास ते धजले नाहींत. कदाचित् त्यांचें मन फिरून, चुलते पुतणे एक होऊन आपणा सर्वांनाच एकदम ठार मारतील अशा भीतीनें तुळ्या पवार व गारदी यांनीं नारायणरावास दादासाहेबांकडून निकरानें ओढून तेथेंच त्याचे तुकडे

केले. नवऱ्याला पेशवेगिरी मिळावी अशी जरी आनंदीबाईची इच्छा असली तरी त्यांत नारायणरावाच्या जीवाला अपाय व्हावा असें तिच्या मनांत नव्हतें, असा निष्कर्ष तपासाअती दिसून आला.

सवाई माधवरावाचे नांवाने पेशवाईची वस्त्रे आणून बारभाईंनी कारभार चालविला, तेव्हां त्यांनी पुनः रामशास्त्री यांस विनंती करून न्यायाधिशीवर रुजू केलें. परतु न्यायाचे कामांत कारभारी ढवळाढवळ करितात, म्हणून ते काम आपण स्वीकारणार नाहीं, असें रामशास्त्र्यांनीं निक्षून कळविलें. त्यावर सखारामबापू व नाना फडणीस यांनी त्यांस शपथपूर्वक लेख लिहून दिला, तेव्हांच ते पुनः कामावर रुजू झाले. त्या लेखांत पुढील मजकूर आहे. "न्यायाचे कामीं आपणांस चौघांचा उपरोध होतो, सबब आम्ही आपले तर्फेनें शपथपूर्वक लिहून देतों की आपण आमची अगर इतर कोणाची भीड न धरतां ईश्वरास स्मरोन न्याय विल्हेस लावीत जावा. याउपर येण्यास अनमान करूं नये."
(तारीख २६ सेप्टेंबर, स. १७७४.)

२०

# लेखणी व तलवार



**" With Nana Fadnis departed all the wisdom and moderation of the Maratha Government. "**

—*Resident Palmer*

पानिपतच्या भीषण अरिष्टांतून दोन व्यक्ती केवळ आयुर्मर्यादेमुळें जीव बचावून परत आल्या, एक नाना फडणीस व दुसरे महादजी सिंदे. भाऊसाहेब गर्दीत घुसलेले पाहतांच नाना दोघां सोबत्यांसह वस्त्रत्याग करून लंगोट्या लावून पळूं लागले. त्यांस कापण्यासाठीं मुसलमान पाठीवर आले. सोबत्यांस तोडलें. नाना भगवत्कृपेनें निभावून महिनापंधरा दिवसांनीं मागें पेशव्याचे तळावर येऊन पोचले.†

दुसरे महादजी सिंदे जवळजवळ सदाशिवराव भाऊच्या वयाचे, पानिपतच्या समरभूमीवर जखमी होऊन पळत असतां एका खड्ड्यांत पडून बेशुद्ध झाले. दैवगत्या राणेखान नांवाचा पेशव्यांचा भिस्ती त्या वाटेनें जात होता. जवळ कोणी कण्हतांना ऐकून तो पाहूं लागला त्याला महादजी आढळले. लगेच त्यानें त्यांस आपल्या बैलावर बांधून सुरक्षित जागीं आणिलें म्हणून वांचले. मात्र कायमचे लंगडे झाले, त्यामुळें महाराष्ट्रांत त्यांना थट्टेचें नांव 'तांडव कृष्ण' असें पडलें होतें.

उत्तर मराठशाहीचा एकंदर इतिहास बनविण्याचे महद्भाग्य या दोन व्यक्तींना लाभलें. एकानें दक्षिणेंत व दुसऱ्यानें उत्तरेंत मराठ्यांची सत्ता

† या आपल्या पळाचें हृदयद्रावक वर्णन त्यांनीं स्वतःच लिहून ठेवलेलें वाचण्यासारखें आहे.

व इभ्रत शिकस्त करून कायम राखिली. एकाचें बुद्धिसामर्थ्य व दुसऱ्याचें युद्धनैपुण्य अशी ही लेखणी–तलवारीची अपूर्व जोड निर्माण झाल्यामुळें मराठी राज्याचें आयुष्य पांचपन्नास वर्षांनीं वाढलें. नाना महादजीहून सुमारें बारा वर्षांनीं लहान, पण रेखीव वर्तन, मोजका शब्द व हिशेबी करडा कारभार हे गुण माधवराव पेशव्यांच्या समागमांत पैदा करून त्यांनीं राज्याची अप्रतिम कामगिरी करून दाखविली. महादजीची तऱ्हा त्यांचे उलट होती. युद्धाचें धोरण, मनुष्याची पारख आणि संकटांत न डगमगणारी शांत वृत्ति, या गुणांच्या जोरावर ते मराठी राज्याची अप्रतिम सेवा करूं शकले. उभयतांमध्यें पुष्कळदां तीव्र कलह उत्पन्न होई, पण दोघेही समंजस, कितीही ताणलें तरी तुटेपर्यंत पाळी आणली नाहीं. उभयतांची कर्तबगारी व्यवहारांत एकमेकांस पूरक ठरली. नुसत्या लेखणीनें किंवा नुसत्या तलवारीनें राज्याचें काम भागणारें नव्हतें. दोहोंचा योग जमला हेच विशेष.

पानिपतानंतर मराठी राज्यांत कांहीं विशिष्ट प्रकारची चमत्कारिक परिस्थिति निर्माण झाली. साडेतीन शहाण्यांची आख्यायिका प्रसिद्ध आहे, तींत या परिस्थितीचें चित्र उमटलेले दिसतें. पेशव्यांचा कारभारी सखाराम बापू बोकील, निजामाचा कारभारी विठ्ठल सुंदर व भोसल्यांचा कारभारी दिवाजीपंत चोरघोडे हे तिघे समकालीन पुरुष पुणें, हैदराबाद व नागपुर या तीन ठिकाणीं आपापल्या धन्यांसाठीं विशिष्ट कारस्थानें रचून एकमेकांवर बुद्धिकौशल्याची मात करीत. त्या त्यांच्या लीला पाहून लोकचर्चेत ते तीन शहाणे निर्माण झाले. पुढें पुण्यास नारायणरावाचा वध होऊन रघुनाथरावदादा पेशवाईवर आले. परंतु पुतण्याच्या वधाचें पातक त्यांजला बाधलें. त्यांचें मुखावलोकन करूं नये अशी लोकांची भावना पाहून सखारामबापू व नाना फडणीस यांनीं हिंमत धरून बारभाईचें कारस्थान उभारलें. महादजीच्या तलवारीने या कारस्थानास जोर चढला. रघुनाथरावदादा हद्दपार झाले. नारायणरावाची बायको

गंगाबाई गरोदर होती, तिला पुत्र होऊन थोरल्या माधवरावानेच पुनः अवतार घेतला अशा भावनेनें राष्ट्राला धीर येण्याकरितां त्या बालकास सवाई माधवराव हें नांव देण्यांत आले. रघुनाथरावाशी वैर बांधल्याचा जिवावरचा खेळ नाना महादजींच्या कर्तबगारीनें यशस्वी झाला. एवढे मोठे तीन शहाणे पण त्यांच्यावर नानासारख्या अर्ध्या शहाण्यानें ताण केली हें आश्चर्य ' साडेतीन शहाणे ' या शब्दप्रयोगांत व्यक्त होतें.

नोकर कितीही हुशार असले तरी वर कोणी कर्तबगार धनी असल्याशिवाय व्यवहार सुरळीत चालत नाही. प्रस्तुत रघुनाथराव शत्रु, धनी बालपेशवा, बाराभाईंचीं तोंडे बारा दिशांस असा प्रकार होऊन नाना व महादजी यांजमध्यें वितुष्ट उत्पन्न होण्यास काय उशीर ! नाना फार तर एक हुशार कारकून, आपण सरदार युद्धासारखे जिवावरचे खेळ खेळतों असें महादजीस वाटे. अशा भावनेंत उभयतांमध्यें वारंवार तेढ उत्पन्न होऊन राज्याचें नुकसान होऊं लागलें. त्या वेळीं हरिपंत फडके म्हणून एक चतुर सेनानी व धोरणी मुत्सद्दी बारभाईंचे उद्योग समेटून नेणारा जवळ होता. त्याने नाना–महादजींच्या दरम्यान शिष्टाई करून त्यांचें सौरस्य जमवून आणिलें. हरिपंताच्या मध्यस्थीनें नाना व महादजी यांनीं एकमतानें वागण्याची शपथक्रिया केली आणि ईश्वरसाक्षीनें एकमेकांस लेख लिहून दिले, त्याचा नमुना खालील पत्रांत नमूद आहे.

"रा. बाळाजीपंत नाना गोसावी स्नेहांकित महादजी शिंदे दंडवत. आम्हांकडील अर्थ रा. रामचंद्र शिवदेव यांणीं आपणांस सांगितल्यावर आपण शपथपूर्वक खातरजमा करून श्रीवरील तुळसी देतों असें निश्चय-पूर्वक बोललां, आणि सरदारी माझी व फडणिशी त्यांची, बंधुत्वाप्रमाणें वर्तन करूं, ज्यांत सरदारीचें कल्याण तें संधान चालवूं, जो अनिष्ट चिंतील त्याचें पारिपत्य करूं म्हणून बोललां, तो मजकूर मशारनिल्हेनीं लिहिला तो सर्व समजोन चित्तास परमसंतोष जाला. आम्हीं श्रीवरील

बेलभांडार पाठविला आहे, व हें पत्र शपथपूर्वक लिहिलें आहे. आपण बंधुत्वाविषयीं संशय न मानावा. मशारनिल्हे बोलतील तें आमचें बोलणें जाणावें. ही सरदारी आपली व फडणिशी आमची असा निश्चय झाला. जेथें आपण आहां तेथें मी आहे हें शपथपूर्वक जाणावें."

(ता. १५ मार्च, स. १७७९)

या शपथक्रियेप्रमाणे पुढे उभयतांनीं वर्तन केलें हें त्यांस भूषणावह आहे. असो.

बालपेशव्याचें संगोपन उत्कृष्टपणें करून रघुनाथराव व इंग्रज यांनी राज्य बुडविण्याचा प्रसंग आणला होता, तो त्यांनी हाणून पाडला. सदाशिवराव भाऊंचा तोतया निर्माण होऊन त्यानें बंड उभारलें, त्याला पकडून त्यांनीं ठार मारले. पेशव्याच्या लग्नाचा टोलेजंग समारंभ करून हिंदुस्थानभर आपला दरारा वाढविला. हैदरचा पुत्र टिपू सुलतान मराठ्यांच्या अंमलास उपद्रव करीत होता त्याचा पाडाव केला. महादजीनें तर सगळें उत्तर हिंदुस्थान जिंकून माधवरावाच्या वेळचें मराठ्यांचें वर्चस्व पुनः दाक्षिणोत्तर स्थापन केलें. गुलाम कादरनें बादशहाची विटंबना करून त्याचे डोळे काढले, त्याचा शिरच्छेद महादजीने केला आणि तमाम हिंदुस्थानांत कोठेंही प्रसिद्धपणें गोवध होऊं नये अशा प्रकारचे जाहीर फर्मान बादशहाकडून मिळवून महादजी ऐश्वर्यसंपन्न होऊन पुण्यास आला. नंतर तेथें मोठा दरबार भरवून तें फर्मान जाहीर करण्यांत आलें व बादशहानें पेशव्यांना दिलेले सन्मानाचे किताब व चिन्हें महादजीनें त्यांना अर्पण केली. तो पुण्यास दोन वर्षे राहिला त्या अवधींत नाना महादजींनीं त्या होतकरू पेशव्याला राज्याचा कारभार समजावून दिला. येणेकरून त्या पेशव्यालाही आपल्या परिस्थितीची जाणीव उत्पन्न होऊन उत्तरोत्तर पुष्कळ कामें तो स्वतः अंगावर घेऊन निकाल करूं लागला. घाशीराम कोतवालाचें प्रकरण व सचिवांचें

प्रकरण या दोन कामांत या पेशव्याचें चातुर्य व हुकमत हीं चांगलींच प्रगट झालीं; आणि मराठी राज्याची सत्ता पूर्वीप्रमाणें हिंदुस्थानभर चालू झाल्याबद्दल मराठमंडळाला एक प्रकारचा अभिमान व आनंद वाटूं लागला.

अशा या आनंदाच्या भरांतच पुण्यास महादजीची प्रकृति एकाएकीं बिघडून जवळच वानवडीच्या छावणीत त्याचा अंत झाला. मराठशाहीची तलवार गळून पडली आणि मागे लेखणी तेवढी अल्प काळ राहिली. वानवडी येथे महादजीची छत्री प्रेक्षणीय आहे. महादजीच्या मृत्यूनंतर तीन महिन्यांनीं हरिपंत फडकेही मरण पावला, त्यामुळें नाना फडणीस असहाय बनले. तरी त्यांनीं समस्त मराठे सरदारांस एकत्र जमवून निजामावर विजय मिळविला तो स्मरणीय आहे.

महाराष्ट्रांत पेशवे–निजामांचा उगम समकालीन असून आरंभापासूनच ते एकमेकांचे प्रतिस्पर्धी बनले. बाजीराव पेशव्याने निजामउलमुल्कचा अनेकवार पाडाव केला. त्यानंतर नानासाहेबानें त्यास समूळ उखडून काढण्याचा योग आणिला असतां तें प्रयोजन अर्धवट टाकून मराठी फौजांना पानिपतावर जावे लागलें. तेणेंकरून निजामाचें सामर्थ्य वाढत गेलें आणि उत्तरोत्तर त्यानें मराठ्यांचा उच्छेद चालविला. तेव्हां सवड होतांच नाना फडणिसांनीं पुनः मराठमंडळ एकत्र जमवून निजामावर मोहीम केली. स. १७९५ सालीं मराठ्यांच्या फौजा तरुण पेशव्यास बरोबर घेऊन निजामावर चालून गेल्या. रंगपंचमीच्या दिवशीं लढाई झाली. खर्ड्याच्या गढींत निजामाला कोंडून त्याजकडून पूर्वीचे हक्क मराठ्यांनीं उगवून घेतले. मोठ्या विजयानंदानें पेशव्याची स्वारी पुण्यास परत आली.

पण हा विजय मराठ्यांचा शेवटचा ठरला. त्याच सालच्या पावसाळ्यांत पेशव्याची प्रकृति बिघडली. रोज थोडा थोडा ताप येऊं लागला. गणपतीचा उत्सव अशा तापांतच कसाबसा निभावला. दिवसेंदिवस प्रकृति क्षीण

झाली. शुक्रवार विजयादशमीचा दिवस उगवला. सबंध वर्षातला मोठा लष्करी सणाचा तो दिवस. त्या दिवशीं मालकांना इतकी कृत्ये करावयाचीं असत कीं चांगल्या भक्कम माणसाला सुद्धां शीण वाटल्याशिवाय राहत नसे. जवळच्या फौजांची हजिरी घेऊन मग सीमोल्लंघनास जावयाचें, नंतर दरबारांत सरदारांचे गौरव व सन्मान करावयाचे. अंगांत ताप असतांनाच पेशव्यानें या गोष्टी कशा बशा निभावल्या. सायंकाळी हत्तीवर बसून स्वारी सीमोल्लंघनास निघाली. अंगांतील तापामुळें तोल सांवरेना. तसेंच दुपेट्यानें हौद्यांत बांधून कसेबसे वाड्यांत परत आणले. दुसऱ्या दिवशीं एकादशी. अंगांत ताप होताच. तिसऱ्या दिवशीं रविवारीं द्वादशी. सकाळीं ताप निघाला. पण शक्ति अगदी नाहीं. प्रकृति अत्यंत क्षीण. सज्जांत आणून बसविलें. वैद्यांनीं येऊन नाडी पाहिली. औषधाची योजना केली. आजी—ताई साठे—येऊन जवळ बसली. थोडा वेळ बोलून ती निघून गेली. इतक्यांत जवळ कोणी नाही, नोकर होते ते आजीबाई बोलत असतां दूर होते, अशा स्थितींत आजीबाई निघून जातांच पेशवे उठून उभे राहूं लागले, तों तोल गेला. सज्जाचा कठडा लहानच होता. खालीं कारंजें होतें. तोल गेला तो सांवरला नाहीं आणि वरच्या सज्जावरून खालीं घसरून कारंजावर आले. बेशुद्ध झाले. मांडी मोडली. सोमवार कसाबसा गेला आणि मंगळवारी चतुर्दशीच्या दिवशीं काळानें डाव साधला. महाराष्ट्राचा भाग्यरवि पार मावळला !

हा शेवटचा प्रसंग खालीलप्रमाणे वर्णिलेला आढळतो.

“ द्वादशीचे दिवशीं श्रीमंतांस ज्वरांशांत वायु झाला होता. प्रातःकाळीं गणपतीचे दिवाणखान्यावर रंगमहाल आहे, तेथे निद्रेचें स्थान, तेथें गेले. पलंगावर बसले होते. वायूचे भिरडीत काय मनास वाटलें नकळे. पलंगावरून उठून दक्षिणेकडील खिडकींत उभे राहिले. खिजमतगार यानें शालेस हात लाविला, कीं येथें उभें राहणें ठीक नाहीं. तों एकाएकींच

तेथून उडी टाकली. खालीं दीड भाला खोल कारंजी हौद आहे, तेथें कांठावर आपटून आंत पडले. उजवी मांडी मोडून हाड बाहेर निघालें. दांतांची कवळी उघडी पडली. नाकावाटे रक्त निघाले. तेथून उचलून नानांनीं ऐनेमहालांत नेले. तबीब आणून हाड बसवून, टाके देऊन शेक केला. चहू घटकेनंतर शुद्धीवर येऊन डोळे उघडले. वायूचा प्रकोप होताच. कांहीं सावध होऊन बोलत, कांहीं वेळ भ्रंश होऊन बोलत. आश्विन शु|| १४ सात घटकानंतर पौर्णिमा मंगळवार, ते दिवशीं प्रथम घटका रात्रीं कैलासवासी जाले."

पेशवाईचें भाग्य संपलें. पुढील इतिहास निराळाच बनला.

# २१

# शनिवारवाड्यावर इंग्रजांचा झेंडा



**“ पेशव्यांचे वंशांत बाजीरावासारखा बेहिमती, दुसऱ्याचा विश्वास नाहीं, जवळ शहाणें मनुष्य ठेवायचें नाहीं, अंगीं शिपाईगिरी नाहीं, त्याची वर्णना काय करावी ! इंग्रजांनीं राज्याचा आटोप केला. ” —पे. ब.**

**श्रीमता बाजिरायेण प्रासादो वै समंडपः**
**गंगासरस्वतीशस्य निर्मितोयं महाफलः ॥**

बिठूरच्या घाटावरील बिठूर मंदिराचा शिलालेख, स. १८३०

मराठमंडळांत अनेक लहान मोठे सरदार असून छत्रपति जरी सर्वांचा पहिला धनी, तरी शेंपन्नास वर्षांच्या प्रघातानें पेशवे हेच मराठ्यांचे पुढारी बनले होते. इंग्रजांचा पाय हिंदुस्थानांत थोडाबहुत स्थिर होतांच त्यांनीं हें मराठमंडळ फोडून एकेका सरदारास पेशव्यांच्या वर्चस्वांतून अलग केलें. अशा सरदारांत गुजरातचे गायकवाड हे एक बलवान सरदार होते. परंतु बाजीरावानें वसईचा तह करून इंग्रजांचें संरक्षण स्वीकारण्यापूर्वीच गायकवाडांनीं पेशव्यांचें नियंत्रण झुगारून इंग्रजांचे छत्र पत्करिलें. अर्थात् बाजीराव व गायकवाड यांजमध्यें पूर्वीच्या देवघेवी-संबंधें पुष्कळ तंटे उपस्थित झाले. पांच पन्नास वर्षांचें देणें घेणें तपासून त्याचा निकाल करणें पत्रोपत्रीं भागेना, म्हणून इंग्रजांनीं पेशव्यांस सुचविलें कीं, ‘ गायकवाडांचा एक वकील समक्ष बोलणें करण्याकरतां तुमचेकडे येईल तर या भानगडी लवकर मिटतील. ’ गंगाधरशास्त्री

पटवर्धन या नांवाचा एक हुशार गृहस्थ बडोद्यास रेसिडेन्सींत नोकर होता. त्यालाच गायकवाडांनी इंग्रजांची जामीनगिरी घेऊन पुण्यास बाजीरावाकडे हिशेबाचा निकाल करण्यासाठीं पाठविलें. सुमारें दीडदोन वर्षें गंगाधरशास्त्र्याचा मुक्काम पुण्यास झाला. पण त्याचा शिरजोरपणा आणि ताठून बोलणें बाजीरावास बिलकूल खपलें नाहीं. हा शास्त्री इंग्रजांच्या पाठिंब्यामुळें फार उपद्व्यापी बनला आहे असें वाटून गायकवाडांतलेही पुष्कळ लोक त्याजविरुद्ध वागत होते. संधि साधेल तर त्यास मारून टाकावा असे विचार कित्येकांचे मनांत घोळत होते.

त्या वेळीं त्रिंबकजी डेंगळे हा बाजीरावाचा मुख्य सल्लागार होता. 'हिशेबाचा निकाल होत नाहीं तर तुम्ही आतां परत जा' असें बाजीरावानें गंगाधरशास्त्र्यास कळविलें. इतक्यांत आषाढी एकादशी आली. दरसाल त्या दिवशी पंढरपुरास जाऊन देवदर्शन करण्याचा बाजीरावाचा रिवाज होता. त्यावरून त्यानें शास्त्री यास कळविलें कीं, 'तुम्ही थोडे दिवस आमच्याबरोबर पंढरीच्या यात्रेस चला आणि देवदर्शन करून मग परत बडोद्यास जा.' त्याप्रमाणें स. १८१५ सालीं बाजीरावाची स्वारी त्रिंबकजी डेंगळे, गंगाधरशास्त्री व मोठा लवाजमा घेऊन पंढरपुरास गेली. आपल्या जिवाला अपाय होईल अशी शास्त्री याला धास्ती बिलकुल नसल्यामुळें तो अगदी बेफिकीर होता. परंतु बाजीराव आणि त्रिंबकजी डेंगळे यांचे त्यासंबंधानें कांहीं गुप्त बेत चालू होते. बडोद्याचेही कित्येक हेर पुणें–पंढरपुरच्या दरम्यान वावरूं लागले होते. एकादशीचा समारंभ पार पडला. पारणीं वगैरे सुटलीं. पुढें दोन दिवसांनीं आषाढ शु॥ १४ तारीख २० जुलै या दिवशीं संध्याकाळीं पेशवे देवदर्शन करून मुक्कामावर परत गेले. त्रिंबकजी डेंगळे मात्र मंदिरांतच बसला. त्यानें शास्त्री यास दर्शनासाठीं बोलावणें पाठविलें. शास्त्री यानें परत निरोप कळविला की, 'आज मला थोडेंसें बरें वाटत नाहीं म्हणून मी आतांच दर्शनास येत नाही.' त्यावर त्रिंबकजीनें पुनः

निरोप पाठविला, ‘ आतां उद्यां आपल्यास परत निघावयाचे, मंदिर जवळच आहे, थोडा वेळ येऊन दर्शन घेऊन जा.’ फारच आग्रह पडल्यामुळें शास्त्री दोनचार माणसें घेऊन हलके हलके चालत मंदिरांत गेला. दिवस मावळून अंधार पडूं लागला होता. देवदर्शन झालें. नंतर मंदिरांत घटकाभर बसून त्रिंबकजी व शास्त्री यांच्या गप्पागोष्टी झाल्या आणि शास्त्री परत निघाला. मुक्कामावर जाण्याची वाट लहानशा बोळांतून होती. त्या वाटेनें अंधारांतून शास्त्री व त्याचीं माणसें चाललीं असतां पाठीमागून चारपांच दांडगट लोक ‘पैस, पैस, रस्ता सोडा,’ असें ओरडत धावत आले आणि शास्त्री मागें वळून कोण आहे म्हणून पाहतो तोंच त्यांनीं तलवारीनें त्याचे तेथल्या तेथे तुकडे केले! क्षणमात्रांत ते मारेकरी चार दिशांनीं कोणीकडे पळून नाहींसे झाले तें कळलें नाहीं. एकंदर प्रकार आकस्मिक घडला. त्या वेळीं इंग्रज रेसिडेंट एल्फिन्स्टन वेरुळास लेणीं पहाण्यास गेला होता. त्याचा आसिस्टंट पुण्यास होता. त्यानें ही खबर लगेच वेरुळास कळविली. त्रिंबकजी डेंगळे व पेशवे आस्ते आस्ते पंढरपुराहून पुण्यास परत आले.

शास्त्री जेव्हां बडोद्याहून पुण्यास आला तेव्हां त्यास इंग्रजांनीं ‘तुमचे जिवास अपाय होणार नाही’ अशी जामीनगत पत्करली होती हें वर सांगितलेंच आहे. एल्फिन्स्टनला खुनाचा प्रकार कळतांच त्यानें लगोलग येऊन तपास केला. तपासांत त्याची समजूत झाली कीं या खुनाचा मुख्य उत्पादक त्रिंबकजी असून त्यास बाजीरावाची फूस आहे. त्यानें लगेच ‘त्रिंबकजीस आपल्या स्वाधीन करा, तो आमचा गुन्हेगार आहे, त्यास आम्ही शिक्षा करणार’ अशी बाजीरावाकडे मागणी केली. बाजीरावानें ती साफ झिडकारून दिली आणि ‘या खुनाशीं आमचा कोणाचा कांहीं एक संबंध नाहीं’ असें कळविलें. त्यावरून एल्फिन्स्टननें वरिष्ठांकडे लिहून बाजीरावास धमकी घातली कीं, ‘त्रिंबकजीस तुम्ही आमच्या स्वाधीन न कराल तर तुम्हांस राज्यास

मुकावें लागेल.' तेव्हां शेवटीं नाइलाजानें बाजीरावानें ती गोष्ट कबूल केली, आणि त्रिंबकजी इंग्रजांचे कबजांत गेला. त्यांनीं त्यास ठाण्याच्या तुरुंगांत बंदोबस्तानें ठेविलें. बाजीरावाची सूचना होती कीं, 'त्रिंबकजीस काशी येथें ठेवा, अनायासें त्यास तीर्थवास घडेल.' एल्फिन्स्टनची सूचना होती कीं, 'बाजीराव मोठा हिकमती आहे, त्रिंबकजी इकडे जवळ असला तर तो नाना युक्त्या करून त्याच्याशीं संधान बांधील. सबब त्याला दूर एका बाजूस अलाहबादसारख्या ठिकाणीं ठेवावा म्हणजे बरें.' परंतु तिकडेही इंग्रजांचे दुसरे असे अनेक कैदी ठिकठिकाणीं असल्यामुळें गव्हर्नर जनरलनें उत्तरीं कळविलें कीं, 'त्रिंबकजीस तिकडेच कोठें तरी बंदोबस्तानें ठेवा. वर पहारा गोऱ्या शिपायांचा ठेविला म्हणजे त्याला बाहेरचे लोक सामील होऊं शकणार नाहींत.'

जवळ जवळ एक वर्ष त्रिंबकजी ठाण्यास राहिला. त्याजपाशीं नेहमीं एक गोरा रखवालदार हजर असे. त्रिंबकजीची बंदिवासाची खोली वरच्या मजल्यावर असून खालीं या गोऱ्या अंमलदारांचे घोडे बांधण्याचे तबेले होते. तेथें मोतद्दार घोड्यांची चाकरी करीत. बाजीरावाने आपला एक इसम पढवून ठाण्यास पाठविला. त्यानें त्या तबेल्यात मोतद्दाराची नोकरी पत्करली. घोड्यांची चाकरी करतांना मोतद्दार लोक पुष्कळदा तोंडानें कांहीं तरी गाणीं म्हणत असतात. तशीं गाणीं म्हणण्याचा पाठ या मोतद्दारानें कैक महिने चालविला. कित्येक वेळां त्याची साथ म्हणून त्रिंबकजीही तशीच एकादी गाण्याची लकेर आपल्या वरच्या कोठडींतून तोंडाने बोले; किंवा केव्हां शीळही घाली. हा प्रकार कैक दिवस चालला. साहेबाला मराठी भाषा समजत नसे; आणि गाण्याचे शब्द तर मुळींच कळत नसत! कुठें एकादी लावणी, कुठें एकादा अभंग, त्यांतच एकादें घोड्याचें गाणें, पण त्यांत 'खालीं तबेल्याची भिंत पडली आहे, तिथें मी भोंक करून ठेवलें आहे, तुम्ही अमुक वेळीं बहिर्दिशेस म्हणून खालीं या. भिंतीच्या बाहेर घोडे हजर ठेवितों. तडक बाहेर निघून

जातां येईल,' असा आशय त्या मोतद्दारानें आपल्या गाण्यांत त्रिंबकजीस कळविला. होतां होतां उभयतांचा संकेत ठरला आणि त्याप्रमाणें ता. १२ सेप्टेंबर, स. १८१६ रोजीं त्रिंबकजीनें तुरुंगांतून पलायन केलें, आणि लगोलग नाशीकच्या बाजूस जाऊन एकदम प्रचंड बंडावा मांडला ! असो.

सवाई माधवराव मेल्यावर पेशवाईस धनी कोणीच उरला नाहीं, तेव्हां नाइलाजाने नाना फडणिसाने बाजीरावास पेशवाईवर आणिलें होतें. पुढें नाना फडणीस वारला, त्याजबरोबरच मराठी राज्याचे सर्व तेज नाहींसें झाले. यशवंतराव होळकरानें पुण्यावर चाल केली. बाजीराव पळून वसईस गेला आणि इंग्रजांच्या फौजा मदतीस घेऊन पुनः त्यानें पेशवाईपद मिळविलें, या गोष्टी अभ्यासकांस माहीतच आहेत. एवढ्यावर बाजीराव संतुष्ट राहता तर आज सुद्धां कदाचित् बडोदें, कोल्हापुरसारखें एखादे राज्य पुण्यास पेशव्यांचें संस्थान म्हणून टिकलें असतें. पण बाजीरावाच्या अंगीं राज्य करण्याची लायकी नव्हती. 'राज्य करणाराचें आहे, भोगणाराचें नव्हे' हा कित्ता त्याच्या वाडवडिलांनी पाळला, त्याच्या अगदीं उलट समजूत बाजीरावाची. गोडबोल्या, पाताळयंत्री व हिकमती पुरुष बाजीरावाइतका दुसरा बहुधा सांपडणार नाही. पण तितकाच भेदरट, विषयलंपट, चंचल बुद्धीचा, खरेपणाची तर चाडच नाहीं, कर्मठपणाचें ढोंग मात्र पुरेपुर करणारा असा तो होता. पहिले पहिले दोन तीन इंग्रज रेसिडेंट पुण्यास आले, त्यांनीं त्याच्यापुढें हात टेंकले. पण शेवटी एल्फिन्स्टन हा जहांबाज गृहस्थ रेसिडेंट होऊन आला, त्यानें त्याची पुरी खोड मोडली. शास्त्री याच्या खुनाचा फायदा घेऊन त्यानें त्रिंबकजीला कसें कबजांत आणिलें ही गोष्ट वर सांगितलीच आहे. शेवटीं त्रिंबकजी व बाजीराव ह्यांनीं इंग्रजांशीं युद्ध करण्याचा निश्चय केला. इंग्रजांच्या सामर्थ्यापुढें आपला निभाव कसा लागेल याचा त्यांना पोंच राहिला नाहीं.

बापू गोखले हा बाजीरावाचा मुख्य सेनानायक होता, त्याने आपल्या धन्याची नोकरी मरेपर्यंत कसून बजावली. तारीख ५ नोव्हेंबर, स. १८१७ रोजीं रेसिडेंटच्या बंगल्यावर हल्ला करून बाजीरावाने लढाईस सुरुवात केली. बापू गोखल्यानें पेशव्यास परोपरीनें सांगितलें कीं, ' आपण मालक सतत फौजेबरोबर रहा, म्हणजे सर्व लोक मनापासून लढतील. ' पण इतका दम बाजीरावास निघाला नाहीं. त्यानें बापू गोखल्यास निरोप पाठविला कीं, " आम्हीं येथून जीव बचावून बाहेर जातों, तुम्ही इंग्रजांशीं युद्ध करा आणि ते खुद्द आमच्यावर चालून आले तर आमचाही बचाव तुम्हींच करा ! "

पहिल्या चार दोन दिवसांतच पेशव्यांच्या फौजेचा पराभव होऊन बाजीराव पळत सुटला. पुणें, सातारा, मिरज, पढरपूर, जुन्नर, नाशिक अशी वर्तुलाकार धावपळ बाजीरावाची चालू झाली. बापू गोखल्यानें एका बाजूस बाजीरावाचें रक्षण करावयाचें आणि दुसऱ्या बाजूनें इंग्रजांशी लढावयाचे, असा प्रकार चालला. पेशव्यानें भल्या पहांटे उठावयाचें, स्नान, देवपूजा, भोजन वगैरे आटपून दिवस उगवण्यापूर्वींच घोड्यावर बसून पळायला लागावयाचें आणि बापू गोखल्यानें मागचीं पुढचीं लढाईचीं दोन तोंडें संभाळायचीं ! होतां होतां पढरपुरनजीक गोपाळआष्टीजवळ बाजीरावाचा मुक्काम झाला. सायंकाळचीं भोजनें होऊन सगळी निरवानिरव करून बापू गोखले पेशव्यांना भेटून रात्रीच्या विश्रांतीस गेला.

मोठ्या पहांटेस बापूस खबर आली कीं, ' इंग्रजांचा सेनानी स्मिथ साहेब मोठ्या फौजेनिशीं चालून येत आहे आणि तो केव्हां येऊन आपल्यास गांठील याचा नेम नाही. ' तसाच बापू गोखले कपडे चढवून घोड्यावर बसून घाबऱ्या घाबऱ्या पेशव्याकडे गेला. पेशवे नित्यनेमाप्रमाणें स्नान व देवपूजा आटपून प्राणाहुति घेणार इतक्यांत बापू गोखले

आंत येऊन बोलला, " स्मिथसाहेब चालून आला. आपण तावडतोब निघावें. नाहीं तर तो एकदम येऊन आपणांस गांठील."

**पेशवे**—वाहवा बापू ! हेच का तुम्ही आमचे सेनापति ? आम्हाला घांसभर स्वस्थ जेवूंही देत नाहीं. मग तुमच्यासारखे सेवक पदरीं बाळगून काय उपयोग ?

**बापू**—ठीक आहे ! सेवक सेवा काय करतो ती तो आतांच दाखवील. हा मी स्मिथसाहेबाशी गांठ घालायला निघालों ! बचावून परत आलों तर आपली सेवा आहेच आणि तिकडेच खपलों तर आपण आपलें संरक्षण मर्जीप्रमाणें करावें. हाच माझा शेवटचा नमस्कार !

असें बोलून बापू तडक चालता झाला. बाजीराव भोजन आटपून बायकांसह घोड्यावर चढून पळून गेला. सगळ्या फौजेला ताकिदी देण्याला बापू गोखल्याला सवडच झाली नाहीं. स्वतःचे चार दोनशें स्वार तयार होते तेवढ्यांनिशीं तो स्मिथसाहेबावर चालून गेला आणि अल्पावकाशांत जखमावर जखमा लागून त्याने समरांगणावर देह ठेविला. बाजीरावाची सद्दी संपली !

इकडे बाजीराव आपण होऊन पुणें सोडून गेला, हा प्रकार एल्फिन्स्टन यास इष्टच वाटला. पुण्यांत बाजीराव असता तर शहराचा कबजा घेणें इंग्रजांना अवघड गेलें असतें. कदाचित् शहरांतच लढाईचा प्रसंग पडला असता. राजधानीच्या शहरांत पेशव्यांच्या राहत्या वाड्यांत बाजीरावाला पकडणें किंवा कैद करणें सहज शक्य झाले नसतें, आणि ती गोष्ट लोकांनाही दुःसह वाटली असती.

पुणें शहराची त्या वेळची हवाल कशी झाली होती पहा,–

" शु॥ ९ ता. १७ नोव्हेंबर, १८१७ सोमवारीं ऊन पडतांच तोफांचे दोन गोळे शहरावर टाकले, आणि बुधवारचे रस्त्यानें हजार स्वार पळत

गेला. फिरंगे यांनीं सरकारचे तळावरील डेरे येऊन जाळले. गांवांत आईस लेंकरूं पुसेनासें झाले. रस्त्यांत वाट मिळेनासी झाली. कोणी पर्वतीचे डोंगरांत, कोणी कोणीकडे अशी गेलीं. नवरा एकीकडे बायको एकीकडे अशी अवस्था झाली. गांवांत बातमी, आतां इंग्रज पुणे जाळतो. इतक्यांत गोसावीपुऱ्यांतील बंगला जाळला. त्यानें लोकांची फार हवालदिल झाली. इतक्यांत 'गोखले यांची हवेली कोणती?, पुरंदरे यांची कोणती?' असें पुसत बुधवार रस्त्यानें एक सांडणीस्वार गेला. सरकारचे चारी वाडे ओस पडले. एक शूद्र की ब्राह्मण राहिला नाही. तो दिवस दोन प्रहर आला. तेव्हां गांवांत बातमी आली, की इंग्रज नाकेबंदी करतो. बाहेर कोणास जाऊं देत नाही. थोड्या वेळानें गावांत दौंडी आली की, "द्वाही बाबासाहेबांची, हुकूम कंपनी बहादरांचा. लोकांनीं दुकानें उघडावी. आमचेकडून उपद्रव होणार नाही." हरेश्वरभाई नगरशेट यास एल्फिन्स्टनसाहेबांनी बोलावून नेले. बाळाजीपंत नातू आणखी चार साहेब बसले होते. साहेबाने हरेश्वरभाईस विचारलें, 'पुण्यास धनी कोण? जशी आमच्या बेटाची अवस्था केली तशी आम्ही करूं.' तेव्हां भाई बोलले, "रयत गरीब, त्यांजकडे काय आहे?" त्या वेळेस बाळाजीपंत नातू यांनींही तीच विनंती केली. त्यावरून साहेब बोलले, 'शहर राखणें असेल तर निशाणे लवकर लावा.' असे ऐकतांच साहेब व बाळाजीपंत नातू तीनशे कुडतीवाले घेऊन शहरांत शनिवार-वाड्यापाशीं येऊन किल्लया आणून दरवाजे उघडले. उभयतांनीं आंत जाऊन गादीस कुर्निसा केल्या आणि आकाशदिव्याचे काठीस निशाण लाविलें, आणि शंभर लोक वाड्यापाशीं ठेवून पुढें बुधवारचे हवेलीपाशीं आले. तेथें आठ आसामींचा पहारा ठेवून इतर वाड्यांत जाऊन तसेच पहारे ठेविले. तों अस्तमान झाला. तोफेचे गोलंदाजास शिरस्त्याप्रमाणें तोफ सोडावी म्हणून सांगितलें. तो म्हणाला, 'दारू नाहीं व गज नाहीं!' दुसरे दिवशीं बंदोबस्त करून दिला. ............"

अशा रीतीनें बाळाजीपंत नातूनें पुढाकार घेऊन वाड्यावर इंग्रजांचें निशाण लाविलें, म्हणून शहराचा बचाव झाला. नाहीं तर इंग्रजांनी शहर लुटून संपत्ति सर्व नेली असती; आणि हजारों लोकांची प्राणहानि झाली असती ती वेगळीच. बाळाजीपंत नातू इंग्रजांच्या पक्षाला मिळाल्याबद्दल पुष्कळ लोक त्याला दूषणें लावितात; परंतु खुद्द पेशवा निघून गेला, इंग्रजांचें राज्य स्थापन झालें, हा प्रकार उघड दिसत असतां युक्तीनें बाळाजीपंतानें रक्तपात टाळून इंग्रजांचें निशाण पेशव्यांच्या वाड्यावर लाविलें. याबद्दल त्याची प्रशंसाच करणें युक्त होईल. असो.

बाजीराव पळत पळत नर्मदेच्या बाजूस गेला, आणि शेवटीं ३ जून, स. १८१८ रोजीं मालकमसाहेबास शरण जाऊन नर्मदेच्या कांठीं त्यानें राज्याची सोडचिठ्ठी लिहून दिली. इंग्रजांनीं त्यास नंतर कानपुरजवळ बिठूर ऊ० ब्रह्मावर्त येथें नेऊन ठेविलें. अशा रीतीनें शिवाजीमहाराजांनीं स्थापिलेलें मराठ्यांचें राज्य संपलें. त्याबद्दल बाजीरावास काय वाटलें असेल तें असो; पण दुसऱ्या एकाही पेशव्यास न लाभलेलें शहात्तर वर्षांचें दीर्घायुष्य भोगून ब्रह्मावर्तास तेहतीस वर्षें वास केल्यावर हा शेवटचा पेशवा ता० १४ जानेवारी, स. १८५१ रोजीं मरण पावला.

**इथुनि अतां प्रारंभ दिसंदिस अद्भुत प्रळयाला**

—प्रभाकर